मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय दादर शाखेच्या विद्यमानें :

# म हा रा ष्ट्री य  सं त

## वा ङ्म य  व  जी व न

हें सारस्वताचें गोड । तुम्हींचि लाविलें जी झाड ॥
तरि अवधानामृतें वाड । सिंपौनी कीजो ॥
मग हें रसभावफुलीं फुलैल । नाना फलभारें भरैल ॥
तुमचेनि प्रसादें होईल । उपयोगु जागा ॥

—ज्ञानेश्वरी ११-१९-२०.

मूल्य चार रुपये

: प्रकाशक :
गो. ना. रेळेकर
य. द. भिडे

: कार्यवाह :
मुं. म. ग्रंथसंग्रहालय
दादर शाखा
दादर, मुंबई २८.

★

: वेष्टन :
अंधूटकर

★

आवृत्ति १ ली : १९५२


★

: मुद्रक :
ग. बा. नेवाळकर
अत्रे प्रिंटिंग प्रेस,
वि. प. रोड, मुंबई ४

# थोडेसें प्रास्ताविक

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय-दादर शाखेनें जी 'संतवाङ्मय परिचय' व्याख्यानमाला गुंफली त्या व्याख्यानमालेंतील कांहीं पुष्पें प्रकाशित करण्यास आम्हांस आनंद होत आहे. ही व्याख्यानमाला दि. ५ आगस्ट १९५० ते दि. २६ मे १९५१ पर्यंत दादरच्या वनमाळी सभागृहांत गुंफली गेली. प्रत्येक महिन्यास दोन याप्रमाणें या मालेंतील व्याख्यानें झालीं.

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचें ध्येय 'मराठी साहित्याची सेवा करणें व ज्ञानप्रसाराला सहाय्य करणें' हें आहे. त्या ध्येयाला अनुसरूनच 'संतवाङ्मय-परिचय व्याख्यानमाला' गुंफण्यांत आली होती. संतवाङ्मयाचें महत्व-मापन व्हावें व संतांनीं केलेलें कार्य, मराठी भाषेस त्यांच्या वाङ्मयानें लावलेलें वळण, संतांमुळें महाराष्ट्राची झालेली घडण इत्यादी गोष्टींचीं मराठी भाषेचा अभिमान असणाऱ्या प्रत्येक महाराष्ट्रीयास माहिती असावी ह्याच उद्देशानें ही व्याख्यानमाला सुरू करण्यांत आली होती. याखेरीज विश्व-विद्यालयीन विद्यार्थ्यांस त्यांच्या अभ्यासाच्या दृष्टीनें संताच्या काव्याचें रसग्रहण करतां येऊन काव्याचें वैशिष्टय काय, संतांचें जीवन कसें होतें, तत्कालिन सामाजिक व राजकीय परिस्थिति कशी होती याचें मार्गदर्शन व्हावें हाही एक हेतु होता. त्या व्याख्यानमालेचा विश्वविद्यालयांतील विद्यार्थ्यांप्रमाणें सर्वसामान्यतः संतवाङ्मयाच्या सर्व लहान थोर अभ्यासकांनींहि फायदा घेतला.

'संतवाङ्मय परिचय व्याख्यानमाला' अतिशय लोकप्रिय व यशस्वी झाली, त्याचें कारण म्हणजे महाराष्ट्राच्या वाङ्मयाचा उत्कृष्ट भाग संत वाङ्मयाने व्यापलेला आहे. सुशिक्षित अशिक्षित, आबाल-वृद्ध, स्त्री व पुरुष ह्या सर्वांचा म्हणून संतवाङ्मयाकडे अतिशय ओढा आहे. शिवाय 'संत वाङ्मय परिचय' व्याख्यानमालेंतील सर्व व्याख्यानें अधिकारी व तज्ज्ञ व्यक्तींनी दिलीं होतीं व तीं सर्व विवेचनात्मक व अभ्यासपूर्ण अशींच होतीं.

विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें महत्वाचीं, संदर्भ म्हणून उपयोगी पडावीं अशींच व्याख्यानें ह्या ग्रंथांत समाविष्ट केलीं आहेत. अधिकारी व्यक्तींनी विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें दिलेल्या ह्या व्याख्यानांचा संग्रह संदर्भाच्या दृष्टीनें उपयोगी पडेल असा आम्हांस भरंवसा आहे.

व्याख्यानमालेंतील सर्वच व्याख्यानें, हस्तलिखितें वेळेवर हातीं न आल्यामुळें ह्या पुस्तकांत समाविष्ट केलेलीं नाहींत. शक्य झाल्यास या पुस्तकाच्या द्वितीय खंडांत तीं संकलित करण्यांत येतील.

व्याख्यानमाला यशस्वी करण्यास सर्व व्याख्यात्यांनीं आमच्याशीं सहकार्य केलें त्याबद्दल आम्ही त्या सर्वांचे आभारी आहोंत. त्याचप्रमाणें आमच्या इतर मित्रांनीही आम्हांस अनेक प्रकारें सहाय्य केलें आहे. प्रा. र. वि. हेरवाडकर व श्री. व. न. झुरळे यांनीं व्याख्यानमालेची कल्पना निघाल्यापासून व्याख्यात्यांचीं व्याख्यानें घडवून आणणें, त्यांच्याकडून व्याख्यानें लिहून घेणें इत्यादी गोष्टींत आपुलकीनें जें सहकार्य केलें त्याबद्दल त्या दोघांचाही नामोल्लेख करणें आवश्यक आहे.

| | |
|---|---|
| मुं. म. ग्रंथसंग्रहालय<br>दादर शाखा<br>दादर, मुंबई २८. | गो. ना. रेळेकर<br>य. द. भिडे<br>—कार्यवाह |

*

ज्ञा ने श्व र

ना म दे व

श्री ध र

रा म दा स

तु का रा म

वे णा बा ई

मु क्ते श्व र

वा मो पं त

मो रो पं त

*

# श्री ज्ञानेश्वर

डॉ. म. अ. करंदीकर

**पवित्र तें कुल पावन तो देश ।**
**जेथें हरिचे दास जन्म घेती ॥**

तुकारामांच्या वरील उक्तीप्रमाणें धन्य तो महाराष्ट्रदेश कीं ज्या ठिकाणीं ज्ञानेश्वरादि संत निर्माण झाले ! या देशाला पूर्वी दंडकारण्य हें नांव होतें. परंतु या दंडकारण्यांतच हा भक्तीचा मळा पुढें फोफावलेला आढळतो. या भक्तिरसाच्या त्रिवेणीचे हिमालय म्हणजेच ज्ञानेश्वर होत. त्यांच्या ज्ञानदेवीची भाषा जुनाट वाटली तरी आज केवळ वारकरी पंथांतच नव्हे तर इतरत्रहि त्यांच्या ज्ञानेश्वरीच्या अध्यायांचें व अभंगांचें पठण व कीर्तन चाललेलें आढळतें. आपल्या भाषेनें श्रीमदाद्यशंकराचार्यांनीं जें वेड लोकांना लावलें तेंच वेड आपल्या " रासिक अक्षरांनीं " ज्ञानदेवांनीं महाराष्ट्रीय व महाराष्ट्रीयेतर यांना लावलें. ज्ञानेश्वरीचें अध्ययन सर्वत्र चालू असतें. केवळ विद्यापीठाच्या महाविद्यालयांतून अभ्यासाचा विषय म्हणून प्राध्यापक व विद्यार्थी ज्ञानेश्वरीचें अध्ययन करितात असें नव्हे, तर महाराष्ट्राच्या सर्वच सामाजिक थरांत ज्ञानेश्वरीचा अभ्यास होतो. ज्ञानेश्वरांचे अभंगसुद्धा खेडेगांवीं अजून सकाळच्या प्रहरीं भक्तिभावानें आळवलेले कानावर येतात. वारकरी पंथीय, ज्ञानेश्वर हे आपले आहेत असें समजत असल्यानें ते त्यांना आदर देतील हें निर्विवाद आहेच; परंतु इतर मंडळीसुद्धा आपआपल्यापरीनें त्यांच्या ग्रंथांचा यथाबुद्धि आदर करतात. त्यामुळें

त्यांजविषयींचा आदर हा सार्वत्रिक व नित्य आहे, हेंच त्यांच्या ग्रंथांचा अभ्यास होण्याचें कारण आहे. इतर जनांत त्यांच्या तत्त्वज्ञानापेक्षां त्यांचें काव्य अधिक मान्य आहे; त्यांच्या तत्त्वज्ञानाविषयीं आदर आहे, वाङ्मया-विषयीं भक्ति आहे. तसेंच त्यांच्या व्यक्तित्वाविषयींहि लोकांत शंकरा-चार्यांच्या जीविताएवढेंच आश्चर्य, कौतुक आणि मान आहे. या सर्व बाबींमुळें सामान्य व सन्मान्य या सर्वच थरांमध्यें ज्ञानेश्वर व त्यांचे ग्रंथ यांजबद्दलची जिज्ञासा जागृत आहे.

ज्ञानेश्वरांचा जन्मकाल, समाधिकाल, व लेखनकाल या गोष्टी मात्र अजून चर्चेचा विषय आहेत. त्यांचा जन्म एका शुचि, साधारणपणें श्रीमान् अशा घराण्यांत झाला. एवढेंच काय पण भगवद्गीतेंत सांगितल्याप्रमाणें दोन्ही प्रकारच्या जन्मस्थानांचा समन्वय होऊन ते प्रत्यक्ष श्रीमान् आई-बापांच्या पोटीं एका योगिकुळांत जन्माला आले.

द्विजीं वाळियेलें । जगीं सांडियेलें । शेखीं उपेक्षिलें । आप्तवर्गी ॥ अशी विठ्ठलपंतांच्या संसाराची स्थिति होती; विठ्ठलपंत हे ज्ञानेश्वरांचे वडील. त्यांना–संसाराची चिंता नाहीं विठ्ठलासी । अखंड वृत्तीसी समाधान–अशी वृत्ति प्राप्त झाली होती. विठ्ठलपंतांचें संन्यासाश्रमींचें नांव चैतन्याश्रम होतें. अशा निवृत्तमार्गी, संसारविरक्त, योगी, विठ्ठलांच्या घरीं द्वादशवर्षे पुत्रसंतान नसतांना निवृत्तिज्ञानेश्वरादिकांचा जन्म झाला. महाराष्ट्रदेश धार्मिक वर्तना-बद्दलच त्यावेळीं प्रसिद्ध होता एवढेंच नव्हे, तर अपरांत देशाच्या राजानें रचिलेले स्मृतिग्रंथ काश्मीरमध्येंहि प्रचलित होते हें एक ऐतिहासिक सत्य आहे. (पहा, म. म. काणे कृत धर्मशास्त्राचा इतिहास) अशा देशांत व कुळांत ज्ञानेश्वरांचा जन्म झाला आणि तो सुद्धां कृष्णाष्टमीला झाला, गोकुळाष्टमीला झाला. नामदेव, जनाबाई, विसोबा खेचर व सच्चिदानंद बाबा यांनीं ११९७ [ वर्षाऋतु, श्रावणमास, कृष्णपक्ष, गुरुवार ] हा शक ज्ञानेश्वरांच्या जन्माचा म्हणून दिला आहेः–

" सत्याण्णव सालीं ज्ञानदेव झाले [ जनाबाई ].

" अधिक सत्याण्णव शके अकराशतीं । श्रावणमास तिथी कृष्णाष्टमी ॥ वर्षा ऋतु युवा नाम संवत्सर ! उगवे दिनकर निशीमाजीं " [ नामदेव ]

" गुरुवार रोहिणी " [ सच्चिदानंद बाबा ]

परंतु यापेक्षां भिन्न शक इतरत्र आढळतो. बळवंत खंडूजी पारख यांच्या " श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें चरित्र " या ग्रंथिकेंत या सर्व भावंडांच्या जन्माचे शक चार पांच वर्षांनीं कमी दिलेले आढळतात. संतभक्त पांगारकर आपल्या ग्रंथांतून या वैकल्पिक शकांचा निर्देश करितात. गोडबोले हा शक ११९४ [ भरतखंडाचा अर्वाचीन कोश ] देतात, तर हिंदुस्थान कथारसांत ज्ञानेशांचा जन्म १२८० सनामध्यें झाला असें सांगितलें आहे. जनाबाईच्याच अभंगांत " त्र्याण्णवाचे सालीं ज्ञानदेव प्रगटले " [HIP Vol II page 32-Ranade] असा पाठहि आढळतो हें लक्षांत घेतलें पाहिजे. ज्ञानेश्वरांच्या दोन कुंडल्या प्रसिद्ध केलेल्या आहेत; त्यांतील ११९३ शकाची कुंडली फलज्योतिषाचे दृष्टीनें अधिक बरोबर येते हें येथेंच सांगणें आवश्यक आहे. आतां हें जन्मवर्ष जर असें बदललें आणि ज्ञानेश्वरांच्या वयाविषयींची उपलब्धप्रमाणें म्हणजे ज्ञानेश्वरांच्या बालछंदाच्या अभंगांतील

" बालछंद बावीस जन्में; तोडीली भवाब्धीची कर्में " हा उल्लेख किंवा नामदेवांचा समाधीचा अभंग–

" जगदुद्धार केला संसारीं बावीस वरुषें असतां, पै " यांतील उल्लेख पाहिले म्हणजे हें समाधीचें वर्ष डळमळीत होईल. परंतु ज्ञानेश्वरांचा समाधिशक १२१८ आहे या विषयींचा विसोबा खेचर, नामदेव, चोखामेळा व जनाबाई यांचा उल्लेख अतिस्पष्ट असाच आहे;

" शके बाराशे अठरा दुर्मुख नाम संवत्सरा ॥ गुरुवासर कार्तिक मासीं । कृष्णपक्ष त्रयोदशी ॥ माध्यान्हीं दिनकर । राहे क्षणमात्र स्थिर ॥ खेचर वंदी ज्ञानेश्वर । जोडोनिया दोन्ही कर ॥ " " गणित बाराशतें अधिक अष्टदश " [ नामदेव ]

" बाराशतें अठरा शके शालिवाहनीं " [ चोखामेळा ] व

" बाराशतें अठरा दुर्मुख संवत्सर " [ जनाबाई ].

आतां ज्ञानेश्वरीच्या रचनाकालाविषयीं असाच मतभेद आहे. ज्ञानेश्वरीच्या समाप्तीची तिथि ठाऊक नाहीं. केवळ शक उपलब्ध आहे व तोहि उल्लेख सच्चिदानंदबाबांचा आहे, ज्ञानेश्वरांच्या हातचा हा उल्लेख नाहीं ही मोठीच उणीव आहे. आणि पुन्हां शके " बाराशें बारोत्तरीं " यास्थळीं शके " बाराशें साहोत्तरीं " हा पाठहि असावा.

ज्ञानेश्वरी शके १२१२ तच लिहिली गेली का १२१२ त त्याची लेखी प्रत झाली? ज्या ठिकाणीं ग्रंथरचना झाली त्या स्थळाचें सूक्ष्म वर्णन केलेलें असतांना तिथीवार इत्यादि गोष्टी या ओवींत दिलेल्या नाहींत ! शिवाय ही ओंवी सच्चिदानंदबाबांच्या मागून तर कोणी लिहिली नाहींना ?

या सर्व भावंडांचीं नांवें हीं केवळ मुक्तिमार्गदर्शक आहेत असा एक पक्ष आपल्याकडे आहे. ज्ञानेश्वरांचें खरें मूळ नांव विद्याधर असावें असाहि तर्क आहे. आपल्याकडे श्रीधरकवीविषयींहि असा प्रवाद असून त्याचें मूळ नांव खंडूजी किंवा खंडेराव असावें असें संशोधन वाचलेलें आठवतें. यावरूनहि हीं नांवें कदाचित् मूळचीं नसावींत असें मानण्याकडे कल होणें अत्यंत स्वाभाविक आहे. भाव्यांनीं महाराष्ट्र सारस्वतांत (व इतरत्रहि) ही शंका प्रदर्शित केलेलीच आहे. मोरोपंतांचीहिः

शंकर निवृत्ति हरि तूं ज्ञानेश, ब्रह्मदेव सोपान ।
विद्या मुक्ता, तुमच्या कीर्तिसुधेचें सदा असो पान ॥

ही जी आर्या आहे त्यांत असें रूपक आहे, तशींच हीं नांवें रूपकात्मक असावींत ही शंका माझ्याहि मनांत बळावत आहे हें नमूद करून ठेवणें मला इष्ट वाटतें. आपल्याकडे मोक्षोपदेश झाल्यावर अशीं भिन्न नांवें धारण करण्याची परंपरा आहे हें सर्वांना ठाऊक आहे.

ज्ञानेश्वरांना त्यांच्या वडील बंधूकडून अनुग्रह मिळाला होता व त्यामुळेंच "निवृत्तिनाथसुत" इत्यादि अध्यात्मिक दृष्टया परंपरादर्शक असे शब्द त्यांच्या ज्ञानेश्वरींत व इतर ठिकाणीं आढळतात. ज्ञानेश्वरांच्या वडील बंधूंना त्यांच्या वडिलांनीं नाथपंथांत अनुग्रह देवविला असावा; त्यामुळेंच मुक्ताबाईची पण

अध्यात्मिक दृष्टया उन्नति शक्य झाली ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी उघड आहे. त्यामुळें निवृत्तिनाथांच्या चुकण्यामुळें सद्गुरूंची गांठ पडल्याच्या प्रसंगाचाहि उत्तम उलगडा होतो. ज्ञानेश्वरचरित्रांतील इतर गोष्टींत त्यांचें प्रतिष्ठानीं जाऊन शुद्धिपत्राची खटपट करणें व नंतर परत येत असतांना चमत्कार करणें, ज्ञानेश्वरी लिहिणें, तीर्थयात्रा करणें व समाधि घेणें हे प्रसंग अंतर्भूत होतात; त्यांनीं मिळवलेल्या शुद्धिपत्राची प्रत खरी नसावी अशी शंका आतां-पर्यंत धर्मशास्त्रकोविदांनींच व्यक्त केलेली आहे. आरूढपातित्य आणि आरू पतिताच्या संततीला उपनयनाचा अधिकार याविषयीं मिताक्षरेपासून धर्मसिंधूपर्यंतची परिपाठी सोडून दिलेला निर्णय धर्मशास्त्रदृष्टया चुकीचा होता. यापेक्षांहि " लिहोनिया पत्र दिधलें तयां। समस्तांशीं निवृत्ति नम-स्कारिले " यांत पत्र असा शब्द आहे. 'शुद्धिपत्र' असा शब्द नाहीं हेंहि महत्वाचें नाहीं काय ? यापुढचा भाग चमत्कारांचा आहे. केवळ अली-कडेच चमत्कारहीन चरित्रलेखन होऊं लागलें आहे असें म्हणण्याचें कारण नाहीं. महाराष्ट्र हा देशच बुद्धिमंतांचा असल्यानें या तथाकथित भोळ्याभाबड्या लोकांनीं प्रसृत केलेल्या या अलौकिक व अव्यावहारिक अशा गोष्टींची थट्टा यापूर्वीच, म्हणजे एकोणिसाव्या किंवा विसाव्या शतकाच्या पूर्वींच, आपल्याकडील मोठमोठ्या मंडळींनीं केलेली आहे. रामदासांनीं "जन-स्वभावगोसावी" या प्रकरणांत "रेड्याकरवीं वेद म्हणविती" याची थट्टा केलीच आहे ! वामनानें पण " जगीं मिरवोनियां सिद्धी। आपल्या टीकांची केली प्रसिद्धी " ( ९-२७, यथार्थदीपिका ) अशी कुचेष्टा केली आहे. याप्रमाणें अशा चमत्कारांची थट्टाच आमच्याकडील विचारवंतांनीं केलेली आपल्यास आढळते. ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायांत या चमत्कारांचा उलेख केलेला आढळतो.

**पैं अभ्यासाचेनि बळें। एका गति अंतराळें**
**व्याघ्रसर्प प्रांजळें। केले एकीं १२-१११**
**विष कीं आहारीं पडे। समुद्रीं पायवाट जोडे**
**एकीं वाग्ब्रह्म थोकडें। अभ्यासें केलें**

**म्हणोनि अभ्यासासि कांहीं। सर्वथा दुष्कर नाहीं।**
**यालागीं माझ्या ठायीं । अभ्यासें मिळे.**

ज्ञानेश्वरांनीं सिद्धींचा उल्लेखहि केलेला आहे (अ. १२-६१); ज्ञानेश्वरींत त्याविषयीं आणखीहि उल्लेख आढळतात. रामदासांनीं हें सर्व ध्यानांत ठेवूनच "जनस्वभावगोसावी" या प्रकरणांत टीका केलेली असावी. अशीच टीका त्यांनीं दासबोध १-१० मध्यें केली आहे. तेथें तें म्हणतातः

येक भयानकावरी बैसती। येक अचेतनें चालविती (९)

अशा तऱ्हेची तीव्र टीका महाराष्ट्रांत चमत्कारविषयक अद्‌भुतासंबंधी झाली आहे. ज्ञानेश्वरांनीं रेड्याकरवीं वेद बोलविणें, भिंत चालविणें व पुढें तीर्थयात्रेंत कूपोदकांत सूक्ष्मरूप होऊन तृषाहरण करणें याविषयींच मुख्य वाद आहेत. प्रो. रानडे याविषयीं जें लिहितात कीं चमत्कार शक्य कोटींतील असल्यासच तर्ककर्कश बुद्धीला पत्करितां येण्यासारखे असतात (भक्तविजय, प्रस्तावना, रामतत्त्व छापखाना प्रत) तेंच खरें होय. नामदेवांनीं, भक्तविजयकारांनीं आणि निरंजन माधवांनीं या चमत्कारांचें सुरस वर्णन केलेलें आहे. एवढें खरें कीं चरित्रांतील हा भाग प्रत्यक्ष प्रमाणांच्या अभावीं स्वीकारणें अत्यंत दुर्घट आहे. परंतु ज्ञानेश्वरीची व अमृतानुभवाची रचना इतक्या लहान वयांत त्यांनीं केली यावरच चमत्कारांचा भर द्यावा हें योग्य. हें वाङ्मयसृष्टींतील चमत्कार सामान्यपणें अलौकिकच नाहींत काय? ज्ञानेश्वरांच्या चरित्रांतील या उज्ज्वल भागावर दृष्टी ठेऊन पार्थिव चमत्कारांकडे दुर्लक्ष केलें तर त्यांच्या चरित्रास गौणपण मुळींच येत नाहीं. ज्ञानेश्वरी-लेखन हाच त्यांच्या जीवनांतील सर्वांत मोठा चमत्कार आहे. या एकापुढें इतर चमत्कार फिके व फोल होत! या पुढचा त्यांच्या चरित्रांतील महत्वाचा भाग म्हणजे तीर्थयात्रा हा होय. या तीर्थयात्रेचें सर्व प्रकरण नामदेवांच्या तीर्थावळीच्या अभंगांवर आधारलेलें आहे; आणि निरंजन माधवानें किंवा इतरांनीं तोच आधार प्रमुख धरिलेला आहे. माझा स्वतःचा तीर्थावळींचे अभंग नामदेवाचे आहेत यावर पूर्ण विश्वास बसत नाहीं. कारण त्यांतील क्रम चमत्कारिक आहेतः- (१) त्यांतून पूर्वीचा तीर्थयात्रेचा जुना क्रम आढळत नाहीं, (२) उत्तरेंत चाललेल्या क्रूर राजकीय छळाचें

वर्णन त्यांत यावें अशी अपेक्षा केल्यास त्यांत चूक नाहीं.कारण इतरत्र नामदेवांनीं तुर्कांनीं मूर्ती फोडल्याविषयीं उल्लेख केलेला आहे;

" दगडाचा देव इच्छा पुरवित। तरी कां भंगत आघातानें।

ऐसे देव देही फोडिलें तुरकीं। घातले उदकीं" इ., (३) त्याच तीर्थांचा उल्लेख पुनश्च केलेला दिसतो, (४) ज्ञानदेवांनीं 'आपलें चरणरज शिरीं वंदियेलें' असा विपरीत उल्लेख, किंवा (५) पंढरपुरास परत येतांना वा आल्यावर ज्ञानदेवांचा अनुल्लेख इत्यादि बाबी फारच चिंत्य आहेत. ज्ञानेश्वरांनीं आपल्या अभंगांत किंवा ज्ञानेश्वरींत तीर्थयात्रा करण्याच्या विरुद्धच लिहिलेलें आढळतें (आवटे-प्रत अभंग ४८६, मुमुक्षु ४५, आवटे ४७४, १९७, ज्ञानेश्वरी ३-८९ दुरीं कंहीं न वचावें। तीर्थासी, ज्ञा. १-२६ १२-२० इत्यादि) कायाकाशी गुरु उपदेशी। तारकमंत्र दिला आम्हांसी, किंवा, संताचेनि अंगलगे। पापातें जिणणें गंगे;

म्हणोनी जो ऐसा। शुचित्वें तीर्था कुवासा, इत्यादि उल्लेखांवरून हें मत दृढच होण्याचा संभव जास्त आहे. ज्ञानेश्वरींत प्रयाग (६,३५७,११-६) योगपीठींचा भैरव (६-४६२), प्रयागमाधव(११-१०) त्रिवेणी(११-७)हे उल्लेख येतात, पण ते केवळ वाङ्मयीन संकेत आहेत. मृतरूपकांच्या सदरांत पडण्याजोगे आहेत हें अधिक दक्ष वाचकांस कळण्यासारखें आहे. ज्ञानेश्वर व नामदेव यांची मैत्री ही ज्ञानेश्वरांच्या पंढरपूरकडील भागांतील प्रवासानंतरची असणार हें उघड आहे. कदाचित असेंहि असण्याचा संभव आहे कीं निझाम राज्यांतील नरसी ब्राह्मणी गांवचा नामा शिंपी हा पंढरपूरला येण्यास विसोबाखेचर कारणीभूत झाले असावेत. विसोबांची गुरुपरंपरा या मंडळींपासूनच असल्यानें ही मैत्री पुढें दृढ झाली असावी. ज्ञानेश्वराचे सर्व अभंग या पंढरपूर भागांत ते गेल्यावरचे असावेत असें वाटतें. वारी त्यांच्या कुटुंबांत होती ही गोष्ट प्रसिद्ध आहे. ज्ञानेश्वरींतील विठ्ठलभक्तीचे उल्लेख निर्विवाद असून भागवताची ज्ञानेश्वरीवरील छाप ही पण सिद्ध होण्याजोगी गोष्ट आहे. तद्विषयींचें विवेचन पुढें येणारच आहे. एवढी गोष्ट खरी कीं (१) अभंग रचना ज्ञानेश्वरीनंतरचीच असावी. (२) अमृतानुभवाची रचनाहि

ज्ञानेश्वरीनंतरची आहे हें परंपरागत सत्य मान्य होण्यासारखें आहे (३) **चांगदेवपासष्टीचेंहि** तसेंच आहे.

ज्ञानेश्वरांच्यानंतर लौकरच (४) **ज्ञानेश्वरी किंवा ज्ञानदेवी** हीं दोन्हीं नांवें त्यांच्या मुख्य ग्रंथाला दिली गेलीं याविषयीं नामदेवांच्या अभंगांतच साक्ष आढळते:—

**ज्ञानराज माझी योग्यांची माऊली । जेणें निगमवल्ली प्रगट केली ।१**
**गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंदलहरी प्रगट केली ।२।**
**अध्यात्मविद्येचें दाखविलेसें रूप । चैतन्याचा दीप उजळला ।३।**
**नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओवी अनुभवावी ।४।**

(५) ज्ञानेश्वरांचे **हरिपाठाचे अभंग** इतर अभंगांबरोबरचेच आहेत. आपलें येथील विवेचन मुख्यतः ज्ञानेश्वरीसंबंधींच आहे व इतर ग्रंथ केवळ अनुषंगानें येणार आहेत. खरें पाहिलें तर ज्ञानेश्वराचें अध्यात्मविषयक अनुभव ज्ञानेश्वरीपेक्षां त्यांच्या अभंगांतच अधिक स्पष्टपणें उल्लेखिलेले आहेत हें तज्ज्ञ वाचकांस सांगण्याची आवश्यकता नाही.

ज्ञानेश्वरांची समाधि हा कांहीं काळ कुतूहलाचा विषय होता. कारण त्यांच्या समाधिविषयींच्या ओव्या त्यावेळीं प्रत्यक्ष उपस्थित असलेल्या नामदेवादि मंडळींच्या असल्या व त्यांत आळंदीचा स्पष्ट निर्देश असला तरी ज्ञानदेव एक कीं दोन हा प्रश्न होता व अभंगकर्ते ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानेश्वर ह्या दोन भिन्न व्यक्ती आहेत असा आग्रह धरणाऱ्या कांहीं व्यक्तींच्या मतांमुळें उद्भवलेल्या त्यांच्या दोन समाधींविषयीं, त्यांच्या शैव वा वैष्णव पंथाविषयीं, निवृत्तिनाथसुत या शब्दानें व्यक्त होणारा व बापरखुमादेवीवरचा शिष्यांविषयीं, त्याप्रमाणेंच शांकरमतानुयायी व रामानुजमतानुयायी ज्ञानेश्वर एकच कीं भिन्न ह्या सर्व वादांचा आतां उलगडा बहुतेक झाल्यासारखा आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. 'निवृत्तिनाथसुत'. ही संज्ञा निवृत्तिनाथांचा शिष्य या अर्थी आध्यात्मिक परंपरेची निदर्शक आहे हें अमान्य करणें म्हणजे आमच्या-आमच्याकडच्या कांहीं संकेताकडे दुर्लक्ष करण्यासारखेंच आहे. ज्ञानेश्वरींत

येणारा 'पश्चिम मार्ग', त्यांतील त्रिकूटगोल्हाट इत्यादि चक्रें यांचा उल्लेख हे गोरखबोधांत सांपडत नसले तरी निवृत्तिज्ञानेश्वरांत आहे. ज्ञानेश्वरींतहि याविषयींचे अप्रत्यक्ष उल्लेख आहेत. ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायांत, बाराव्या अध्यायांत व योगविशिष्ट इतर ओंव्यांतून षट्चक्रें निर्दिष्ट आहेत. त्रिकूट, श्रीहाट, गोल्हाट, औटपीठ, अमरगुंफा व ब्रह्मरंध्र अशीं सहा चक्रें त्यांच्या अभंगांत आढळतात ( आवटे ७८३, ७८५, ७८७, ७८१, ७९४, ८२०, ८३४, ८४५ इत्यादि ). ज्ञानेश्वरींतील सहाव्या अध्यायांतील ३०२-—३१५ या ओव्यांत या पश्चिममार्गाच्या चक्रांचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष उल्लेख आहे. हठयोगांतील पश्चिममार्ग ज्ञानेश्वरींत अध्याय ८ मध्यें ओंव्या ११२, ११५, येथें येतो. हठ्योगप्रदीपिकेंत पश्चिमपंथाचा उल्लेख आहे. अर्थात चक्रें अध्याहृत आहेत असेंच समजणें योग्य ठरेल. फारशी शब्द ज्या अभंगांत आढळतात (आवटे ७४५), किंवा मदालसा, रूपकें, विरहिणी व गौळणी एतद्विषयक अभंग कोणीतरी ज्ञानदेवांचें नांवावर दडपलेले दिसतात. एकनाथांच्या रागाचा उलगडा केवळ ज्ञानेश्वरीवरून न करतां त्यांत अभंगांतील या घुसडाघुसडीचाहि भाग घेऊन करणें योग्य होईल. ही मदालसा मुक्ताबाईचीहि असेल. कानडी, गुजराती वा हिंदी अभंग ज्ञानेश्वरांचे नाहींतच हें मत मला स्वतःला मान्य होत नाहीं. ( विरुद्ध मत प्रो. कृ. वें. गजेन्द्रगडकर यांचें आहे. ) अभंगांत विठ्ठलपूजा आहे व ज्ञानेश्वरींत त्यासंबंधीं उल्लेखहि नाहीं हें मत गु. प्रो. रा. द. रानडे यांनीं पूर्वीच खोडून काढलें आहे ( संतवचनामृत ). त्याचप्रमाणें द्वैताद्वैत, सगुण-निर्गुण यांजविषयीं संशयातीत मत बनण्याइतपत त्यांच्या अभंगांचें स्पष्टीकरण आतां झालेलें आहे. त्यांच्या दोन समाधींची बाबहि गु. प्रो. रानडे यांनीं निकालांत काढली आहे. शैवाद्वैत ज्ञानेश्वर पत्करतात; आणि त्यांच्या ३६ तत्त्वांप्रमाणें ३६ तत्त्वें ते मोजीत असले तरी सांख्यांची चोवीस तत्त्वें वगळ-ल्यावरे जीं बारा तत्त्वें राहतात त्यांत व शैवाद्वैतांच्या १२ तत्त्वांत अंतर आहे हें सूक्ष्मबुद्धि चिकित्सकाला स्पष्ट दिसणारें आहे. ज्ञानेश्वर भगवद्गीतेंतील तेराव्या अध्यायांत ५-६ या श्लोकांवर टीका करितांना ३६ तत्त्वांचा उल्लेख करितात. अमृतानुभवांत शिवतत्त्वालाच ' पुरुष ' असें ते म्हणतात. अमृतानुभवांतील

शिवशक्ती या तत्त्वांचा उल्लेख ज्ञानेश्वरींत नाहीं. अकराव्या अध्यायांत (ओवी ३०९ यांत) द्वंद्वांतीत तत्त्वाला ते 'पुरुषविशेषु' असें म्हणतात. पांडुरंग शर्मा यांनीं ज्ञानेश्वरी व ज्ञानामृतसार संहिता यांत फार साम्य आहे असें म्हटलें होतें, पण शोधाअंतीं हें म्हणणें मुळींच टिकलेलें नाहीं. अमृतानुभवांत राधाकृष्णांचें नांव नाहीं, ज्ञानेश्वरींत राधेचा उल्लेख नाहीं. ज्ञानामृतसारसंहितेंत जगत् मिथ्या व स्वप्नवत् मानलेलें आहे (२-२-१००). सदभिरुचीला ज्ञानेश्वर कधींहि सोडून जात नाहींत; वरील संहितेंत दास्य भक्तीचाहि पुरस्कार केला आहे. तींत जीव अनेक मानले आहेत इत्यादि बाबी या विषयांत विचार करण्याजोग्या आहेत. याचप्रमाणें राधाकृष्णांची भक्ति प्रतिपादणारा व जीवात्मे अनंत आहेत असें म्हणणारा निंबार्क संप्रदाय ज्ञानेश्वरांना मान्य नाहीं. असें आहे तरी भागवताचे म्हणजेच अर्थात् कृष्ण भक्तीचे उल्लेख ज्ञानेश्वरींतच प्रत्यक्ष आलेले आहेत. महाविष्णूचा ज्ञानेश्वरींतील-उल्लेख हा (ज्ञा. पिंडें पिंडाचा ग्रासु। तो हा नाथसंकेतीचा दंशु। परी दाऊनी गेला उद्देशु। महाविष्णु॥) मत्स्येंद्रनाथास अनुलक्षून आहे. निवृत्तीनाथांच्या अभंगावरूनहि ते नाथपंथ वा सिद्धपंथ किंवा हरिपंथ एकच मानीत असत असें उघड दिसते; त्यांचा मंत्र पण 'रामकृष्णहरि' असा असावा. 'निवृत्तीचें ध्येय। कृष्ण हाचि होय। गहिनीनाथें सोय। दाखविली' असा स्पष्ट उल्लेखहि आपणांस मिळतो. त्याचप्रमाणें :

"निवृत्तीचें गुज। विठ्ठल सहज। गाहिनीरायें मज। सांगितलें" हा उल्लेख पण लक्षांत घेण्याजोगा आहे. नामदेवांच्या माहितीप्रमाणें निराबाईला (ज्ञानेश्वरांच्या आजीला) "तें चि हें सर्व। विठोबाचें नाम। निराईस प्रेम। गहिनी नाथीं" विठ्ठलनामाचा उपदेश गहिनीने केला.

त्यांनीं आपल्या मुलाचें नांव सुद्धां विठ्ठल ठेवलें (=ज्ञानेश्वरांचे वडील).

ज्ञानेश्वरींत भागवताचे उल्लेख पुढलि ठिकाणीं येतातः—(गीता २·४ ज्ञानेश्वरी ओंवी ३८, गी. २·८ ज्ञा. ७२,७७; गी. ३·२२ ज्ञा. १६३; गीता ५·१ ज्ञा. ११; गी. ६·१० ज्ञा. ३७; गी. ८·२ ज्ञा. ९; गी. ९·१४ ज्ञा.

२१०; गी. ९·२६ ज्ञा. ३९४; गी. ९·३२ ज्ञा. ४६; गी. १०० ज्ञा. १७,१८; गी. १०-१८ ज्ञा. १९२; गी. १०·१९ ज्ञा. २०७; गी. १०·३६ ज्ञा. ८७-९२; गी. १०·४२ ज्ञा, ३३४; गी. ११·० ज्ञा. ३४·३५; गी. ११·४ ज्ञा. ९७-११७; गी. ११·९ ज्ञा. १७३, १८२, १८४; गी. ११·२३ ज्ञा. ३४७; गी. ११·४२ ज्ञा. ५५८; गी. १३·७ ज्ञा. २३३; ३४८ (यज्ञसूकर); गी. १४·२४ ज्ञा. ३५०; गी. १६·० ज्ञा. २६; रंभाशुक १६,१२७ नरक १६·३७३; गी. १८·५५ ज्ञा. ११३२; गी. १८·७८ ज्ञा. १७·८८ इत्यादि ).

परंतु ज्ञानेश्वर स्वतः मात्र यापैकीं कोणत्याच पंथाचा अभिमान बाळगीत नसून परमेश्वराचें कोणतेंहि नाम महत्त्वाचें आहे हाच त्यांचा दृष्टिकोण होता हें दाखविणाऱ्या ओव्या ज्ञानेश्वरींत आढळतातः—

'आतां या तिहीं माझारीं। शारीर तंव अवधारी। **तरी शंभू कां श्रीहरी** पढियंता होय। १७·२०१

'ना तरी एकाचे नांव तेंचि शैव कां वैष्णव। वसें तें वाग्भव तप जाणावे ॥' १७–२२३, 'ते हें कल्पादिभक्ति मिया। भागवतमिषें ब्रह्मया। उत्तम म्हणौवि धनंजया उपदेशिली ॥' १८. ११३२ 'ज्ञानी इयेतें स्वसंविति। शैव म्हणती शक्ति। आम्ही परमभक्ति। आपली म्हणों' १८. ११३३ आणि हें असूनहि त्यांना स्वतःचे शैव पंथानुयायित्व उल्लेख करण्याइतपत महत्वाचें वाटतें हें लक्षांत ठेवणें अवश्य आहे. अमृतानुभवांत त्यांनीं "ज्ञानं बंधः" या सूत्राचा, प्रत्यक्ष शिवसूत्रांचा, योगभूमिकेचा, क्षोभाचा व आवरणानुपतीचा उल्लेख केला आहे आणि ज्ञानेश्वरींतहि ६. २७३, ९. १४, १०. ३, १२. १० व १३. ३८९ येथें शैवपंथाबद्दल मत व्यक्त केलेलें आहे.

ज्ञानेश्वरीचे दोन खंड प्रत्यक्ष ज्ञानेश्वरांनींच पाडलेले आहेत. पहिला खंड नऊ अध्यायांचा आहे व दुसरा १० ते १८ असा आहे.

'आतां आपुलेनि कृपाप्रसादें, मियां भगवद्गीता वोवीप्रबंधें। पूर्वखंड विनोदें। वाखाणिले' १०.२३ आणि पुढें समालोचन करून ते पुढें लिहितात—

'एवम् नवहि अध्याय पहिलें । मियां मतीसारिखे वाखाणिलें, आतां उत्तरखण्ड, ग्रंथाचें ऐका' १०-४०.

मला तर असें वाटतें कीं ज्याअर्थी त्यांनी प्रथम खण्डाच्या अखेरीस [ अ. १०-२३-२९ ] ज्ञानेश्वरींत एकदां संक्षिप्त समालोचन करून अठराव्या अध्यायांत पुनश्च एकदां नऊ अध्यायाचे संक्षिप्त सार ज्याअर्थी दिलें आहे त्याअर्थी या ग्रंथाचें लेखन दोन वेळां झालें असावें. त्याचप्रमाणें अठराव्या अध्यायाचें महत्व ते स्वतंत्र मानतात.

'हा अठरावा नोहे । हे एकाध्यायचें गीता आहे.' १८, ८४

भगवद्गीतेचे तीन खंड पाडण्याची संस्कृत टीकाकारांची परंपरा आहे. पहिले सहा अध्याय ज्ञानपर, मधले सहा भक्तिपर आणि शेवटले सहा कर्मपर अशी भगवद्गीतेची स्थूल विभागणी केलेली आढळते. परंतु ती ज्ञानेश्वरांना मान्य नाहीं.

ज्ञानेश्वर प्रत्येक अध्यायाची संगति लावतात. टिळकांनीं गीतारहस्यांत सोळाव्या अध्यायाची समाधानकारक संगति लावतां येत नाहीं असें दर्शविलें आहे; परंतु ज्ञानेश्वरांनीं ही संगति लावून दाखविलेली आहे. ज्ञानेश्वरींतील मंगलाचरणानंतर व प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं ही संगति आपल्यास दिलेलीं आढळते.

ज्ञानेश्वर गीतेचें प्रतिपाद्य 'तो हा भक्तीचा अभेदयोगु' म्हणून सांगतात. ज्ञानेश्वरी ही मूलतः अध्यात्मांत अंतरंग अनुभव ज्यांना आहे त्यांना समजेल अशा अधिकारानें लिहिली आहे. या आध्यामिक अनुभवाची कसोटी ज्ञानेश्वरींत ठिकठिकाणीं महत्वाची म्हणून सांगितली आहे. परंतु इतर लोकांना –'येर तो वाक्चातुर्यें । होईल सुखिया', आपल्या वाङ्मयीन कर्तृत्वामुळें तरी आनंद होईलच, झाला असेल–असा उल्लेख अठराव्या अध्यायांत (ओवी १७५०) ते करतात.

ज्ञानेश्वरीची मूळ प्रत आपणांस उपलब्ध नाहीं. आजची प्रत सच्चिदानंदबाबाची किंवा मुकुंदराजी आहे, अथवा एकनाथसंशोधित आहे असें दिसतें. ज्ञानेश्वरींत कांहीं ठिकाणीं मूळचा सबंध अर्थ दिलेला नाहीं; निदान त्या

ठिकाणची टीका आजच्या उपलब्ध प्रतींतून आढळत नसल्यानें मला असें वाटतें कीं अजूनहि एखादी निराळी प्रत उपलब्ध झाल्यास–'झाडा देईन प्रतिपदीं ग्रंथार्थेंसी '–या त्यांच्या प्रतिज्ञेचा उलगडा होईल. आजच्या प्रतींतून क्वचित् अपव्याख्यान, क्वचित् द्विरुक्ति, क्वचित् उलटापालट म्हणजे मूळ संस्कृत श्लोकांतील क्रमाचा व्युत्क्रम इत्यादि जे प्रकार आढळतात ते मूळांत असतील असें मला वाटत नाहीं. म्हणून राहून राहून वाटतें कीं ज्ञानेश्वरीचें संशोधन राजवाड्यांच्यानंतर जें फारसें झालें नाहीं तें पुनश्च हातीं घेणें आपलें राष्ट्रीय व सांस्कृतिक कर्तव्य आहे. ज्या ज्ञानेश्वरीच्या प्रतींत फारसी किंवा परकीय शब्द नाहींत तीच प्रत सर्वांत जुनी आहे, हें मत मला स्वतःला तर्कदृष्ट्या पटत नाहीं हें येथें सांगून ठेवणें मला महत्वाचें वाटतें; कारण महंमद पैगंबरांच्या अनुयायांनी त्यांची भाषा आपल्यावर दांडगाईनें लादण्यापूर्वीच अरबी वा सेमेटिक भाषेंतील शब्द हिंदुस्थानांत—महंमद पैगंबरांचा जन्म होण्यापूर्वीसुद्धां–आले असण्याचा फार संभव आहे. हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावरची अरब वस्ती व त्यांचें हिंदुस्थानाशीं असलेलें संघटन तत्पूर्वीचें आहे ही गोष्ट इतिहासदृष्ट्या सिद्ध आहे.

ज्ञानेश्वरांनी–आचार्यांते वाट पुसत–ज्ञानेश्वरी लिहिली असल्यानें हे आचार्य कोण या विषयीं अर्थातच जाणत्यांत कुतूहल आहे. 'आचार्यांते' या पदाचा अर्थ एकवचनी लावावयाचा कीं सानुस्वार 'आचार्यांते' असा पाठ घ्यावयाचा हेंहि अजून निश्चित केलें गेलें नाहीं. त्यांनीं सर्वदूर शंकराचार्यांचेंच अनुकरण केलें ही गोष्ट खरी नाहीं. डॉ. पेंडसे यांना त्यांच्या ग्रंथांत हें मान्यच करावें लागलें आहे कीं 'यावानर्थ उदपाने–' (भ. गी.) या श्लोकाप्रमाणेंच कांहीं ठिकाणीं–ती ठिकाणें अत्यल्प असलीं तरी चिंता नाहीं—ज्ञानेश्वरांनीं शंकराचार्यांपेक्षां भिन्न म्हणजे रामानुजी अर्थ दिला आहे. शंकराचार्यांचें अनुसरण पुष्कळ ठिकाणीं केलेलें असलें, पदव्याख्यान पुष्कळवेळां त्यांच्याच प्रमाणें केलेलें असलें तरी ज्ञानेश्वरांनीं स्वतंत्रपणें निराळे अर्थ केलेले असून ते कांहीं ठिकाणीं शंकराचार्यांच्या अर्थापेक्षां सरस वाटतात हें निर्विवाद आहे. शंकराचार्यांची बैठक गीता मुळांत संन्यासपर आहे अशी असल्यानें त्यांनी त्यांच्या दुसऱ्या अध्यायाच्या टीकेपासूनच तिला तशी कलाटणी दिलेली आहे.

परंतु पदांचा अर्थ शांकर टीकेप्रमाणें लावतांनाहि त्यांत ज्ञानेश्वरांनीं शंकराचार्यांच्या पेक्षांहि सरस अर्थ दिलेले आहेत. वास्तविक ज्ञानेश्वरांनीं गीतेचा अर्थ संन्यासपर लावणेंच अधिक स्वाभाविक होतें, कारण ते वस्तुतः संन्याश्यासारखेच राहात होते; परंतु तरीहि त्यांनीं गृहस्थधर्मावर, वर्णधर्मावर पूर्ण विश्वास दाखवून गृहस्थधर्माची तरफदारचि केलेली आहे. त्याचप्रमाणें पातंजल योगाचा अभ्यास आणि नामसाधनानें निर्गुणभक्ति हेंच त्यांचें प्रतिपाद्य ज्ञानेश्वरींत ( ६·१५२ ) असल्यानें संन्यासवादी टीकेपेक्षां त्यांची टीका निराळीच झालेली आपल्याला सांपडते. भगवद्गीतेंतल्या मूळ शब्दांचा अर्थ बदलणें जसें शंकराचार्यांनाहि शक्य नव्हतें, परंतु रचनाविशेषानें व पूरक शब्दांनीं त्यांनीं आपला अर्थ भगवद्गीतेंतून निष्पन्न केला आहे अथवा तीवर लादला आहे, तशाच पद्धतीनें इतर पूर्वाचार्यांनीं केलेला पदांचा अर्थ ज्ञानेशांच्या टीकेंत येणें फारसें अयोग्य नाहीं; त्यामुळें शंकराचार्यांचें त्यांचें अनुसरण केवळ शब्दार्थापुरतेंच मानणें अधिकांत अधिक सयुक्तिक होईल. इतर भाष्यकार ( म्हणजे रामानुज वगैरे ) यांचेंहि अनुसरण असेंच समजावें. ज्ञानेश्वरांनीं पण दुसऱ्या अध्यायापासूनच आपलें प्रतिपाद्य काय आहे हें स्पष्टपणें सांगण्यास आरंभ केला आहे. ज्ञानेश्वर योगाला पंथराज म्हणतात. सद्गुरूंच्या स्तुतीला शांकरभाष्यांत स्थळ नाहीं, ज्ञानेश्वरींत पदोपदीं गुरुभक्तीचा महिमा गाइला आहे. ' विहाय कामान् यः सर्वान् पुमांश्चरति निस्पृहः ' ही बैठक संन्याश्याला लावून शंकराचार्य भगवद्गीतेचें भाष्य लावतात. उलट ज्ञानेश्वर ' आतां गृहादिक आघवें । तें कांहीं नलगे त्यजावें ( ८ गी. ३–२८ ) असें म्हणतात. ' सर्व कर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ' इ. ( गी. ५–१३ ) श्लोकाचें ज्ञानेश्वरांचें भाष्य टिळकांच्या भाष्याशीं जुळतें; पण ते अधिक असेंहि सांगतात ' विषयसंगु न संडिता । इंद्रियातें न दंडिता ' मोक्ष मिळूं शकतो. ज्ञानोत्तर भक्ति ज्ञानेश्वरांना मान्य आहे असें —' मग याहीवरी पाथी । माझ्या भजनीं आस्था । तरी तयातें माथां । मुकुट करीं ' ( ज्ञा. ११–२१४ ) यावरून दिसतें. ज्ञानेश्वर व शंकराचार्य यांचे भेद अमूप आहेत. भगवद्गीता. २. १०,११,१४,१६,१७,१८ २२, २६, ५२; ३·४, ९, १८, २७: ४.३, १६, १७, १८, २१, २३,

२४, ३१, ३५; ५, ४, १२, १५, २०, २२; ६, ४, ७, ११, २७, ६४; ८. ३, ९ वा सर्व अध्याय जवळजवळ, ११. ५५ (उलट ज्ञानेश्वर ६ वा व १८ वा अध्याय), १२-१२. १३. ४, ५, ६, ७, १०, १२, १६, २६; १४.३, २६; १५.४, ६, ७, १०, १८; १६ (दैवी गुणांचे अर्थ) १८- १, १४, १५, १९, ४१, ४७, ४८, ५१, ५३, ५५, ६६, ७० इत्यादि ठिकाणीं शंकराचार्यांच्या अर्थापेक्षां निराळा अर्थ ज्ञानेश्वर लावतात; एवढेंच नव्हे तर भक्ति, सायुज्य, ज्ञान व योग यांवरील त्यांचें विवेचन शंकराचार्यांच्या रोखाशीं मुळींच जुळत नाहीं. १३. ५, ६ मध्यें शंकराचार्य २४ तत्त्वें मानतात, ज्ञानेश्वर २९ मानतात; 'पंच च इंद्रिय गोचराः' यांतील 'च' चा अर्थ ते निराळा करतात! कर्म, अकर्म, दैवकारण (१८.१४) विसर्गः कर्मसंज्ञितः (८-३), न निरग्निर्नचाक्रियाः (६) वगैरेंत ज्ञानेश्वर व शंकराचार्य यांचें जुळत नाहीं. १३.११, १५.१८, १८.५५. या ठिकाणीं त्यांचा अर्थ शंकराचार्यांपेक्षां सरस आहे. ज्ञानेश्वरींत गीतेंतील एकाच श्लोकावरील सर्वांत मोठें भाष्य १३ व्या अध्यायांत आहे; हा विस्तार पूर्व संकल्पित (१३.७) होता कीं केवळ आकस्मिक होता याचें उत्तर देणें कठिण आहे; परंतु तो संकल्पित होता असें मानलें, तर ज्ञानेश्वर व शंकराचार्य यांच्या भाषेंतील साम्यस्थळें लक्षांत घेऊनहि त्यांचें प्रतिपादन भिन्न अर्थभेदाच होतें हें संख्याबळावर निश्चित करितां येतें. १५.७ मध्यें ज्ञानेश्वर लिंगदेहाविषयीं कांहींच म्हणत नाहींत. १५.६ मध्यें स्वतंत्र अर्थ लावतात; १८.४१ मधील चार वर्णांची मीमांसा ज्ञानेश्वर करतात. १८.४८ मध्यें ज्ञानेश्वर बौद्ध व नैयायिक मतांचें खंडन करीत नाहींत; १८.५१ मध्यें रामानुजी भाष्याचें मिश्रण करतात; १३.१२ मध्यें परंब्रह्म हीं पदें शंकराचार्य निराळीं मानतात; ज्ञानेश्वर तीं पदें जोडून घेतात; १३.१६ मध्यें विभक्तमिव मधील 'इव' चा अर्थ ज्ञानेश्वर निराळा करतात, २.१७ मध्यें शंकराचार्य ब्रह्म व जीव यांचें ऐक्य प्रतिपादितात, ज्ञानेश्वर तसें करीत नाहींत; शंकराचार्य २.१८ मध्यें 'युध्यस्व' पदाचा अर्थ भलताच करतात, २.२६ मध्यें 'नित्य' पदाचा अर्थ, 'एका देहाचा अवधि' असा शंकराचार्य करितात, २.२२ मध्यें ज्ञानेश्वरींत शंकराचार्यांच्या

जीवाच्या अविनाशित्वाचा पत्ता नाहीं; ३·९ मध्यें याचा अर्थ शंकराचार्य विष्णु असा करतात, ज्ञानेश्वर 'स्वधर्म' असा करितात. ३·२७ मध्यें कर्मणि हें पद ज्ञानेश्वर भिन्नार्थानें घेतात. ४·३ मध्यें शंकराचार्य **भक्तोऽसि मे सखा** चेति रहस्यं ह्येतदुत्तमं यावर शंकराचार्यांचें व्याख्यान मुळींच नाहीं वगैरे किती तरी गोष्टी या दोघां भाष्यकारांमध्यें निराळ्या आहेत. त्यावरून व एकंदर संन्यास आणि भक्ति या विषयांवर तर दोघांचा अत्यंत मतभेद आहे यावरून ज्ञानेश्वरांनीं शंकराचार्यांचें अनुसरण केलें असें म्हणणें म्हणजे त्यांच्या प्रतिपादनाचा स्वतःला विसर पाडण्यासारखेंच आहे.

ज्ञानेश्वर रामानुजांच्या भाष्याचें अनुसरण (शब्दार्थाबाबत) २·४६ मध्ये करतात असा भास होतो. तेथें दोघांच्या भाष्यांत साम्य आहे हें खरें परंतु ज्ञानेशांनीं रामानुजाचें अनुकरण केलें असें मानावयास आधार नाहीं. हें सादृश्य बहुधा योगायोगानेंच आलें असावें. इतरत्र त्यांच्या प्रतिपादनावर रामानुजांच्या प्रपत्ति व भक्ति (१·७), मार्जारन्याय व मर्कटन्याय इत्यादि विशेषांचा परिणाम कोठेंच नाहीं.

ज्ञानेश्वरांच्या मतें:—

**'तैसे शास्त्रजात जाण। आघवेंचि अप्रमाण।**
**पार्था अध्यात्मज्ञानेंविण। एकलेनि॥**

अध्यात्मज्ञान म्हणजे ऐक्यानुभव व तो महत्वाचा आहे. "मी ब्रह्म आहे" या पदांचें केवळ बौद्धिक आकलन त्यांना महत्वाचें वाटणें शक्यच नाहीं; बौद्धिक आकलन व अनुभविक आकलन यांतील अंतर सूज्ञांना सांगावयास नको. स्वर्गसुख नको (२·१६५, १३·६१८) मग ऋद्धिसिद्धींची गोष्टच कशाला असें त्यांचें प्रतिपादन आहे. "जे परब्रह्म अनुभवें। होऊनि जाईजे" (२·३०८) हा त्यांचा सिद्धांत आहे. विश्व हें कवडसा आहे (४·३६), जीव हा परब्रह्माचा विकार नाहीं. [(७·४३,५६,५९) 'तैसा मी विकारी नाहीं', 'जरी विकारिला दिसे', 'तैसा विकारूं हा मी नोहें जरी विकारिला असें'], भेदाभेद हे कडवसें फिटतात (७·११२) भक्ति ही उजू वाट आहे (८·१९५), कीर्तनानें पापनाश होतो (९·९७),

जगांत सुख ऐकावयाला मिळणें कठिण आहे ( ९·५०१ ), गुरूची व देवाची कृपा आवश्यक आहे ( १०·१४ वर ६६—६८, ६९ ) इत्यादि त्यांचें प्रतिपाद्य आहे.

ते अद्वैती आहेत. ते परमात्म्याहून जग वेगळें [ सत्य वा मिथ्या ] मानीत नसावेत. म्हणून ते म्हणतात—

**म्हणोनि जग परौते । सारूनि पाहिजे मातें ।**
**तैसा नोहें उचितें । आवघें मीचि ॥ १४·१२७**

जीव हा चैतन्याचें प्रतिबिंब आहे. [ १८·३२१ ] अद्वैत व भक्ति विरोधी आहेत असा ख्रिस्ती टीकाकारांचा आक्षेप ज्ञानेश्वरांच्या अद्वैतांत टिकण्यासारखा नाहीं. ज्ञानेश्वरांची आणखी कांहीं मतें आपण पाहूं या. नामस्मरण किंवा नामसंकीर्तन हें साधन आहे असें ते नवव्या अध्यायांत सांगतात. परि तयापासीं पांडवा । मी हारपला गिंवसावा । जेथ नाम–घोष बरवा । करिती माझा......कृष्ण विष्णु हरि गोविन्द । या नामांचे निखिल प्रबंध । माजी आत्मचर्चा विशद । उदंड गाती [ ९· २०८,२१० ] नामाचे या सहस्रवरी । नावा इया अवधारी । सजूनिया संसारीं । तारूं जाहलों [ १२· ९० ]. अभंगांत तर हे उल्लेख अमूप आहेत. सार सार सार विठोबा, नाम तुझें सार; नाम बरवया बरवंट । नाम पवित्र चोखट । नाम स्मरे नीलकंठ । निजसुखें निवाला; काळवेळ नाम उच्चारितां नाहीं । दोन्ही पक्ष पाही उद्धरती; समाधिसंजीवन हरिपाठ; एक तत्त्व नाम दृढ धरीं मना । हरिसी करुणा येईल तुझी. परमेश्वराचें नामसंकीर्तन हें सात्विक तपांत त्यांच्या मताप्रमाणें अंतर्भूत होतें. सात्विक तपासंबंधी भगवद्गीतेंतील वर्णन शारीर, वाङ्मय व मानस असें त्रिविध आहे. त्यांत वाङ्मय [ १७·१५ ] तपांत नामसंकीर्तन पडतें.

**जरी कोणी करी पुसणे । तरी होअण ऐसें बोलणें**
**ना तरी आवर्तणे । निगमु कां नाम ॥ १७·२२१**
**ना तरी एकाचें नांव । तेंचि शैव कीं वैष्णव ।**
**वाचे वसे तें वाग्भव (वाङ्मय ?) । तप जाणावें ॥ १७·२२३**

भक्ति हाच मोक्षाचा मार्ग आहे असें त्यांचें तत्त्वज्ञान आहें; म्हणून नवव्या अध्यायांत ते म्हणतात; तैसे माझिये भक्तिवीण। जळो तें जियालें-पण। अगा पृथ्वीवरी पाषाण। नसती काई ९.४३६. या भक्तीचें स्वरूप म्हणजेच भेदांत अभेद बघणें होय; म्हणून ते याच अध्यायांत म्हणतात; म्हणौनि विश्व भिन्नभिन्न। परि न भेदें तयाचें ज्ञान। जैसे अवयव तरी-आन आन। परि एकेचि देहींचे ९.२५०. सहाव्या अध्यायांत ध्यान करण्या) करितां स्थळ कसें असावें याचें मनोहर वर्णन आलें आहे. (६.१६३-१७३ पाखंडी माणसाला सुद्धां आस्था उत्पन्न होईल असें स्थळ तें असावें, अशी रम्यपणाची थोरी तेथें असावी. जया आड जातां पार्था। तपश्चर्या मनोरथा। पाखांडियाहि आस्था। समूळ होय (६.१६७). शृंगाऱ्याला सुद्धां पहातांक्षणींच तेथेंच निवांत रहावें असें वाटावें (६.१७०). भक्तांचे भगवद्गीता प्रणीत चार प्रकार त्यांनीं मान्य केले आहेत (गी. १३.२४.२५ व गी. ७.१६). चतुर्विध भक्तीच्या प्रकारानुसारच हे चतुर्विध भक्तांचे प्रकारहि ते मानतात; यांत 'अर्थार्थी' याचा अर्थ 'निजेनि जेणें इच्छिजे अर्थसिद्धि (७.११०) असा केला आहे. भक्तांमध्यें कोणालाहि भक्त होतां येतें हें त्यांनीं (गी. ९. ३२) टीका करितांना सांगितलें आहे. म्हणौनि कुळजातिवर्ण। हें अवघेंचि गा अकारण (९. ४५६) परंतु हा जातिभेद भक्ति व भक्तिस्थळ यांपुरताच मर्यादित आहे. मन उन्मन झाले म्हणजे तो सुटतो. तोंपर्यंत ही सोय, हा विधि पाळावा असें तुकाराम पण म्हणतात (तु. वचनामृत पृष्ट. १०८ उतारा ३२२). या भक्तीलाच अभ्यासयोगाची जोड द्यावी असें (ज्ञा. ८.८१ व १२.११०) ज्ञानेश्वर म्हणतात. अभ्यासयोग म्हणजेच "राजयोग" असें त्यांचें मत दिसतें. देवांच्या मूर्तीविषयीं ज्ञानेश्वरांनीं स्पष्ट मत दिलें आहे. (गी. ९.११). टीकेंत ज्ञानेश्वर म्हणतातः– मज विदेहासी देहधर्म। आरोपिती (९.१५६). ज्ञानेश्वर नवव्या अध्यायांत पुढें म्हणतात. जव आकारु एक पुढां देखती तंव हा देव येणें भावें भजती। मग तोचि बिगडलिया टाकिती। नाहीं म्हणोनी (९. १७०). याप्रमाणें थोडक्यांत त्यांचें भक्तीविषयीं मत आहे. ज्ञानेश्वरींत त्यांच्या अनुभवाविषयीं त्यांनीं ठिकठिकाणी लिहिले आहेः जें अपेक्षिजें विरक्तीं। सदा अनुभविजे संतीं। सोऽहंभावें पारंगती। रमिजे येथ

( १. ५३ ), असा अनुभवाचा गौरव त्यांना करितां येतो. गुरुशिष्याची जोडी एकत्र आल्यावरच मग पद आणि पिंड यांना गांठ पडते ( ३. २७२ ), हाच पिंडानें पिंडाचा करायचा ग्रास होय ( ६. २९१ ). ज्ञानेश्वरांनीं सहाव्या अध्यायांत त्यांच्या अनुभवाचें किंचित दर्शन करविलें आहे. त्यांत अनाहत नाद ( ६. २७९ ) व इतरत्र ' नादबिंदु नेणिजे कळाज्योति ' ( ६. २८८ ) असा उल्लेख अंतरंगचि आधेकारिये असणाऱ्यांना त्यांनीं संकेतानें दाखवला आहे. परंतु ही प्रतीति बोलतां येत नाहीं, शब्दांनीं वर्णन करतां येत नाहीं ( ६.३११ ) असें ते स्पष्ट सांगतात. ही अनुभवाची बाब आहे. त्यांच्या अभंगांत तर हे उल्लेख खूपच येतात. जिज्ञासूंनीं प्रो. रा. द. रानडे यांचीं वचनामृतें दृष्टीखालीं घालावींत. त्यांचें विवेचन करण्याचा माझा अधिकार नाहीं हें नम्रपणें सांगणें मला अवश्य वाटतें. ज्ञानेश्वरींतील शब्दसंपत्ति, अर्थगौरव, माधुर्यगुण रस, अलंकार इत्यादींविषयींचें विवेचन करण्यास एक समग्र ग्रंथहि पुरा पडणार नाहीं. परंतु कांहीं विशेष गोष्टी माझ्या नजरेंत आल्या त्या येथें नमूद करतों. कौमारत्व व गाजावज्य असे गमतीचे भाववाचक नामांचे प्रयोग ज्ञानेश्वरींत येतात. 'पत्कर' याच्या स्थळीं स्वरभक्तीनें 'पतिकर' असा शब्द येतो. आखाडे व कोलकाठीं यांचें उल्लेख येतात. कुस्ती हा महाराष्ट्रीयांचा जुना खेळ आहे. ( ११.५४८ ), त्याचा झोंबाझोंबी असा उल्लेख येतो. लग्नापूर्वी मुली पहाण्याचा उल्लेख ( ११.६४२ ) येतो. 'आब्रह्मस्तंबपर्यंत' या स्थळीं ज्ञानेश्वर 'मशलागूनि मुंगीवरी' ( ११.६९० ) असें म्हणतात. कवीठ व फणस यांचा उल्लेख ज्ञानेश्वरींत आहे. ( ११.४३३; १८.२०४ ) सुरंग–सुरुंग या अर्थी ( गी. १३.४ टीका ), कुंजरस्नान ( गी. १३.७, ) चोखी व महारी ( १३.४८० ); नाइकणें हें भाववाचक नाम ( १३.५७८ ), वरंडा ( १३.६९४ ), त्या वेळचीं दैवतें ( १३.८१३–८२४ कोकशास्त्र ( १३.८३१ ) इत्यादि उल्लेख मला विषेश महत्त्वाचे वाटले म्हणून दिले आहेत. जैनांचा व बौद्धांचा उल्लेख ज्ञानेश्वर करितात; परंतु महानुभावांचा करीत नाहींत. ज्ञानेश्वरांच्या अज्ञानलक्षणाबरोबर दासबोधांतील मूर्ख व पढतमूर्ख यांचीं लक्षणें ताडून पहाण्याजोगीं आहेत.

ज्ञानेश्वरी ग्रंथ हा महाराष्ट्राचें संस्कृतिभांडार आहे. प्रत्येक देशाचें वाङ्मय हें त्या देशाचें पैतृक धन आहे आणि त्यांत त्या देशाची परंपरा सामावलेली असते. इंग्लंडमध्यें शेक्सपियर कवीला इंग्रजी वाङ्मयांत जें अढळ महत्व आहे तेंच माधुर्या मधुरता आणणाऱ्या आणि काव्यरावो असणाऱ्या या ग्रंथास मराठींत आहे. हें विवेकतरूचें अभिनव उद्यान आहे. नामदेवांनीं 'गीता–अलंकार नाम ज्ञानेश्वरी' म्हणून जें म्हटलें तें सार्थ आहे, म्हणूनच 'एक तरी ओंवी अनुभवावी' असें मर्मज्ञ म्हणतात. मराठी भाषा जाणणाऱ्या प्रत्येकास हा ग्रंथ अनुपम वाटत आलेला असून अमृताला पारखें म्हणणाऱ्या या ग्रंथाचें महत्त्व थोडक्यांत अधिक यापेक्षां मी काय सांगणार?

---

# संत नामदेव

प्रा. शं. वा. दांडेकर

नुकतीच आषाढ वद्य त्रयोदशीच्या दिवशीं नामदेवांची ६०० वी पुण्यतिथि महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं साजरी झाली आहे. परंतु त्यांच्या वाङ्मयाकडे अद्याप विद्वानांचें, वारकऱ्यांचें व अभ्यासूंचें जसें लक्ष जावयास हवें होतें तसें गेलेलें दिसत नाहीं. पंढरपूरला जाणाऱ्या वारकरी संतांत दीर्घकाल म्हणजे ८० वर्षे जगलेले संत नामदेव हेच एक संत दिसतात. शके ११९२ मध्यें यांचा जन्म झाला आणि शके १२७२ त त्यांनीं पंढरपुरास सहकुटुंब समाधि घेतली. ते संत ज्ञानेश्वरांच्या पूर्वी जन्मले आणि ज्ञानेश्वरांनीं समाधि घेतल्यावर ५४ वर्षांनीं ते इहलोकांतून गेले.

## महाराष्ट्राला दिलेली देणगी

अभंगवृत्त ही नामदेवांची महाराष्ट्राला मौलिक देणगी आहे. ज्ञानदेवांची ओवी व नामदेवांचे अभंग यांत तंत्रदृष्ट्या फारसा फरक नाहीं. थोड्याफार फरकानें ओवीचा अभंग सहज करतां येतो. अभंग हें वृत्त नामदेवांनींच लोकप्रिय केलें आहे. पण त्यांच्या देणगीचा अधिक मौलिक भाग म्हणजे त्यांच्याच अभंगांचें परिपक्व स्वरूप' म्हणतां येतील, असे तुकाराम महाराजांचे अभंग आपणांस नामदेवांच्याच कृपेनें वाचावयास मिळत

आहेत. तुकाराम महाराजांनीं त्यांना अभंग करण्याची स्फूर्ति कशी झाली हें निःसंदिग्ध शब्दांत लिहून ठेवलें आहे—

नामदेवें केलें स्वप्नामाजीं जागें।
सवें पांडुरंगें येवोनीयां ॥
सांगितलें काम करावें कवित्व।
वाउगें निमित्त बोलो नये ॥

प्रमाणाची संख्या सांगे शतकोटी।
उरलें तें शेवटीं लावी तुका ॥

शतकोटी अभंगाची कल्पना नामदेवांना कशी सुचली, हीही एक विचार करण्यासारखीच गोष्ट आहे. प्राचीन काळीं वाल्मीकीनें शतकोटी रामायण रचलें. त्याच धर्तीवर शतकोटी अभंग रचण्याची कल्पना नामदेवांना सुचली. पण कलियुगांत एकाच माणसाला आपल्या हयातींत एवढी रचना करतां येणें शक्य नसल्यानें शेवटीं नामदेवांच्या कुटुंबांतील सर्व मंडळींनी अभंगांची वांटणी करून घेतली. त्यांची भगवद्भक्त दासी जनाबाई हिच्या वांट्यासहि कांहीं अभंग आले. सर्वांनीं मिळून ९६ कोटी अभंग रचले असें म्हणतात. आज मात्र सुमारें २४०० अभंगच काय ते उपलब्ध आहेत. या अभंगांतही नामदेवांचे कोणते, व त्यांच्या कुटुंबांतील मंडळीचे कोणते, हें ओळखून काढणें मोठें कठीण झालें आहे.

## नाचे कीर्तनाचे रंगीं

पंढरपूरची कीर्ति महाराष्ट्रांतच नव्हे तर भारतवर्षांत सर्वत्र पसरविण्याचें कार्य जर कोणीं केलें असेल तर तें नामदेवांनींच. राघोबादादांनीं अटकेवर भगवा ध्वज फडकविला त्याच्याही अगोदर भागवतधर्माची भगवी पताका पंजाबपर्यंत फडकविण्याचें कार्य संत नामदेवांनी केलें आहे. शीखांच्या धर्म-ग्रंथांतही त्यांचे कांहीं अभंग समाविष्ट झाले आहेत. ‘पुंडलीक वरदा हरि

विठ्ठल' असा जयघोष नामदेवांनींच सर्वत्र दुमदुमविला असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

'नाचूं कीर्तनाचे रंगीं। ज्ञानदीप लावूं जगीं' या शब्दांत नामदेव आपल्या कार्याची रूपरेषा सांगत आहेत. पंढरीच्या पांडुरंगाच्या भजनांत तल्लीन होऊन जावयाचें, त्या आनंदांत मग्न होऊन नाचावयाचें, हें जसें वारकऱ्यांचें एक कार्य होतें, तसेंच लोकांना ज्ञान द्यावयाचें हेंहीं त्यांचें दुसरें कार्य होतें. भगवदुपासना व ज्ञानोपासना यांची सांगड अगदीं बेमालूमपणें वारकरी पंथानें घातली आहे. उपासना व ज्ञानदान यांचा वारकरी निरूपणांत मिलाफ आहे.

वारकरी कीर्तनांत व हरिदासांच्या कीर्तनांत थोडा फरक आहे. वारकरी कीर्तन म्हणजे भजनी निरूपण असतें. हरिदासांच्या कीर्तनांत पूर्वरंग असतो. पूर्वरंगांत एका सिद्धान्ताचें विवेचन करावयाचें व उत्तररंगांत त्याच्या स्पष्टीकरणासाठीं एक आख्यान लावावयाचें अशी हरिदासांची प्रथा आहे. वारकरी कीर्तनांत एक अभंग घेऊन त्याचें विवेचन करावयाचें अशी पद्धति असते. नामदेवांच्या कीर्तनाचें जनाबाईनें असें वर्णन केलें आहे—

**सुंभाचा कडदोरा, रकट्याची लंगोटी**
**नाचे वाळवंटीं नामदेव ॥**
**नामदेव कीर्तन करी उभा पुढें नाचे पांडुरंग।**

या कीर्तनपद्धतीनें लोकांचें संघटन होण्यास किती तरी मदत होते. टाळांचा एकसारखा नाद कानीं पडूं लागला, सर्वांच्या मुखांतून एकच हरिनामाचा गजर येऊं लागला कीं माणूस तल्लीन होऊन जातो. त्यामुळें सामुदायिक भक्ति साधून ज्ञानसाधनाही होते. संसारांतील सुखदुःखें मनुष्य क्षणभर विसरूं शकतो. लोकसंग्रह, लोकसंघटना, भागवतधर्मप्रचार, वगैरे करण्यास हें साधन नामदेवांना फार उपयोगी पडलें. आणि या प्रथेचे प्रवर्तकही तेच होते.

## नामदेवांचें नांव मागें कां पडलें ?

नामदेवांचें कार्य एवढें थोर असतांही त्यांचें नांव मागें कां पडलें ? याला अनेक गोष्टी कारणीभूत झाल्या आहेत. त्यापैकीं कांहींचा येथें विचार करावयाचा आहे.

वारकरी पंथांत ' ज्ञानबा तुकाराम ' हें भजन असें प्रसिद्ध आहे, तसें नामदेव तुकाराम ' नाहीं.

**' संतकृपा झाली। इमारत फळा आली ॥**
**ज्ञानदेवें रचिला पाया। उभारिलें देवालया ॥**
**नामा तयाचा किंकर। तेणें केलासे विस्तार ॥**
**जनार्दनीं एकनाथ। ध्वज उभारिला भागवत ॥**
**भजन करा सावकाश। तुका झालासे कळस ॥'**

या बहिणाबाईच्या अभंगांत नामदेवांचें कार्य वर्णिलेलें आहे पण यांत ' त्यांनीं मंदिराचा विस्तार केला ' यापलीकडे स्मरणीय असा उल्लेख केलेला नाहीं. तसेंच—

**' सुश्लोक वामनाचा, अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची।**
**ओवी ज्ञानेशाची किंवा आर्या मयूरपंतांची।'**

या लोकप्रसिद्ध उक्तींतही ज्ञानदेव, तुकाराम यांचा जसा उल्लेख आहे तसा नामदेवांचा नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. प्रत्यक्ष परिस्थितीनेंही नामदेवांचें स्मरण राहावें यासाठीं मदत केली नाहीं. पहा:—

(१) नामदेवांची समाधि विठोबारायांच्या पायाशीं पंढरपुरासच आहे. तीही समाधि त्यांनीं आषाढ वद्य त्रयोदशीला घेतली आहे. त्यामुळें त्यांच्यासाठीं म्हणून पंढरपूरला मुद्दाम यात्रा भरत नाहीं. तुकारामबुवांसाठीं देहूस, ज्ञानदेवांच्यासाठीं आळंदीस किंवा रामदासांच्यासाठीं सज्जनगडास यात्रा भरतात. यात्रांनीं स्मृति सदैव ताजी राहते; पण हें भाग्यही नामदेवांच्या वांट्याला आलेलें नाहीं.

'नामा म्हणे आम्ही पायरीचे चिरे। संत पाय हिरे देती वरी॥' या कडव्यांत म्हटल्याप्रमाणें नामदेवांनीं आपलें सर्वस्व देवाच्या पायाखालीं घातलें; पण त्याचा परिणाम असा झाला कीं, लोकदृष्ट्या त्यांना स्वतंत्र अस्तित्वच राहिलें नाहीं.

(२) नामदेवांनीं समाधि घेतली तीहि सहकुटुंब सहपरिवार. त्यांची, लाडाई नांवाची सून गरोदर असल्यामुळें माहेरीं होती तीच काय ती मागें राहिली. तुकारामबुवांच्या निधनानंतर त्यांचे शिष्य संत निळोबाराय किंवा त्यांचे मुलगे, यांनीं गुरूंच्या व वडिलांच्या काव्याचें संरक्षण केलें, त्यांची कीर्ति वाढविली. तसाही प्रकार नामदेवांचे बाबतींत झाला नाहीं. हेंही एक नामदेवांना लोक विसरण्याचें कारण असावें.

(३) तिसरें असें कीं, संत नामदेव हे ज्ञानेश्वरांचे समकालीन; व ज्ञानेश्वरांचे शिष्य विसोबा खेचर यांचाच उपदेश पुढें नामदेवांनी घेतला. एकदां सर्व संतमंडळी एकत्र जमली असतां कच्चा कोण, पक्का कोण, हें पहावें अशी सूचना मुक्ताबाईनें केली. प्रत्येकाचें डोकें थापटून 'मडकें' कच्चें आहे कीं पक्कें आहे हें पाहण्याची कामगिरी गोरोबा कुंभारावर आली. त्यांनीं नामदेवाचें मडकें थापटून तें कच्चें असल्याचा निर्वाळा दिला. नामदेवांना राग आला. त्यांनीं विठ्ठलाकडे तक्रार नेली, पण पांडुरंगांनींही तसाच निर्णय दिला. तेव्हां देवाच्या सांगण्यावरून नामदेव विसोबा खेचराकडे गेले. विसोबांनीं भगवंत सर्वत्र आहे हें पटवून देऊन त्यांना उपदेश दिला. याप्रमाणें ज्ञानदेवांच्या समकालीन असलेले नामदेव त्यांच्या शिष्यांचे शिष्य झाल्यावर, ते त्या पंथांतीलच एक उपासक झाले आणि त्यामुळें त्यांना स्वतंत्र असें स्थान उरलें नाहीं.

## नामदेवांचें वाङ्मय

नामदेवांच्या अभंगांचा संशोधित असा गाथा अद्याप तयार व्हावयाचा आहे. तो झाल्यावर त्यांच्या वाङ्मयीन स्वरूपाचा व इतर अनेक गोष्टींचा

उलगडाही होईल. त्यांच्या कांहीं अभंगांतून ' विष्णुदासनामा ' असा उल्लेख सांपडतो व कांहीं अभंगातून ' केशवदास नामा ' असा उल्लेख आढळतो. यावरून नामदेव एक कीं दोन असाही वाद निर्माण झाला आहे. या प्रश्नाचा, तसेंच ज्ञानदेव एक का दोन ह्याचा उलगडासुद्धां या ग्रंथाच्या संशोधनानेंच होणार आहे. कारण, ज्ञानदेवांच्या चरित्रास मुख्य आधार नामदेवांच्या अभंगांचाच आहे. इतिहासाचार्य राजवाडे यांना जशी एकनाथांच्या अगोदरच्या काळांतील ज्ञानेश्वरीची प्रत सांपडली, त्याचप्रमाणें मराठवाड्यांत नामदेवांच्या अभंगांची गाथा सांपडण्याची शक्यता आहे. हें संशोधन झालें तर किती तरी कार्य होईल.

## ज्ञानदेव आणि नामदेव

संत ज्ञानदेव व संत नामदेव यांनीं तीर्थयात्रा केली. त्या प्रसंगावरचे अभंग व यात्रेचें वर्णन तीर्थयात्रेच्या अभंगात आहे. नामदेवांना पांडुरंगाच्या सहवासावांचून चैन पडत नसे, म्हणून ते पंढरपूर सोडून दूर जाण्यास फारसे उत्सुक नसत. पण ज्ञानदेवांनीं आग्रह केल्यामुळें, व पांडुरंगांनींही परवानगी दिल्यामुळें ते तीर्थयात्रेला निघाले. सर्वांभूतीं भगवंत आहे हें ज्ञानेश्वरांनीं नामदेवांना समजावून दिलें, पण पुंडलिकापुढें उभें असलेलें विठ्ठलाचें रूपच नामदेवाचें आवडतें होतें. त्यामुळें उभयतांत प्रेमळपणाचे वाद होत, संवादही होत. ते प्रसंग नामदेवांनीं तीर्थयात्रा प्रसंगांत फार उत्कृष्ट रीतीनें वर्णन केले आहेत. ते मुळांतून अवश्य वाचावेत असे आहेत. ज्ञानदेवांच्याविषयीं नामदेवांना परमादर होता.

**' ज्ञानराज माझी योगियाची माऊली, तेणें निगमवल्ली प्रगट केली ।**
**नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी, एक तरी ओवी अनुभवावी ॥ '**

असें नामदेव मोठ्या अभिमानानें म्हणतात.

## नामदेव व तुकाराम

बालक्रीडेचे अभंग नामदेवांनीं रचले; तसेंच तुकोबारायांनींही रचले आहेत. ' चरित्र तें उच्चारावें, देवें केलें गोकुळीं ' असें दोघांचेंही मत.

नामदेवांच्या अभंगांना साध्या आंब्यांची उपमा दिली तर तुकारामांच्या अभंगांना कलमी आंब्यांची उपमा देतां येईल. नामदेव पाल्हाळिक वर्णनें फार करतात तर तुकारामबुवा चटकन् मुद्यावर येतात आणि साररूपानें सारें सांगून टाकतात. त्यामुळेंही नामदेवांच्यापेक्षां तुकारामांचेच अभंग फार वाचले गेले आणि अभ्यासले गेले.

उत्कट भावना, प्रेमळपणा, सरळपणा हे नामदेवांच्या अभंगांचे विशेष आहेत. याचा नमुना म्हणून खालील प्रसंग देतां येईल. प्रेमळपणामुळें जें भांडण होतें, त्या भांडणामुळें प्रेम कमी न होतां वाढतच जातें. तुकारामासारखे अधिकारी देवाशीं भांडत असतात.

**पतीतपावन नाम ऐकुनी आलों मी द्वारां ।**
**पतीतपावन न होसी म्हणुनी जातों माघारा ॥ १ ॥**

**घेसी तेव्हां देसी ऐसा असरी उदार ।**
**काय धरुनी देवा तुझें कृपणाचें द्वार ॥ २ ॥**

**उच्छिष्टाचें शीत देवा न टाकिसी बाहेरी ।**
**कोणी दिधली देवा एवढी भूषणाची थोरी ॥ ३ ॥**

**सोडी देवा ब्रीद आतां नव्हेसि अभिमानी ।**
**पतीतपावन नाम तुझें ठेवियलें कोणीं ॥ ४ ॥**

**ब्रेगट घेउनि हातीं द्वंडी पिटीन तिहि लोकीं ।**
**पतीतपावन देवा परि तूं मोठा घातकी ॥ ५ ॥**

**नामा म्हणे देवा तुझें नलागे मज कांहीं ।**
**प्रेम असों दे चित्तीं म्हणुनी लागतसे पायीं ॥ ६ ॥**

'घेसी तेव्हां देसी' असें ते देवाला हिणवितात. द्रौपदीच्या थाळींतील उष्टी भाजी घेतल्यावर तुम्ही तिला साह्य केलें. इतर भक्तांनाही कांहींना कांहीं द्यावें लागलें तेव्हां तुम्ही त्यांना प्रसन्न झालांत, यांत विशेष तें काय, असें वरील अभंगांत त्यांनीं विचारलें आहे. भक्तिबरोबर त्यांनीं आपल्या

अभंगांतून आपलें कर्तव्य धर्यानें पार पाडण्याचा उपदेश केला आहे. प्रपंच सोडून जातो तो भित्रा. प्रपंच साधून परमार्थ साधणारा तो खरा खेळाडू-असें ते म्हणतात. एके ठिकाणीं तर शुकाचार्यासारखे मुनि संसारांत न पडतां तपःश्चर्या करणारे, त्यांना नामदेव भित्रे म्हणून संबोधतात.

'ब्राह्मणाचें पोर एक खेळासी भ्यालें।
बारा वर्षे लपालें रे।
कांपत कांपत बाहेर आलें।
नागवेंच पळून गेलें रे॥'

याप्रमाणें आपल्या अभंगादिकांतून भक्ति, प्रेमळपणा, साधेपणा, प्रपंच, परमार्थ-समन्वयाचें तत्त्वज्ञान मांडणाऱ्या, कीर्तनाच्या रूपानें जगाला ज्ञानसुधेचें पान घडविणाऱ्या, पंढरीचा महिमा वाढविणाऱ्या आणि भगवतधर्माची पताका भरतखंडांत फडकविणाऱ्या नामदेवांच्या वाङ्मयाचें संशोधन करणें, त्याचें मनन करणें, त्यांच्या तत्त्वाचा प्रसार करणें हें कार्य आपण केलें पाहिजे. एके काळीं महाराष्ट्रांतील झोपडी-झोपडींतून भागवत-धर्माचा अखंड गजर नामदेवांनीं सुरू केलेला होता ही गोष्टही त्याची श्रेष्ठता पटवून देण्यास पुरेशी आहे.

तेव्हां नामदेवांचें नांव मागें पडलें, असें म्हणण्याऐवजीं ज्ञानोबांच्या शिष्याचे शिष्य झाल्यानें व तुकारामबोवांना स्फूर्ति देऊन अभंगवाणीला पाझर फोडल्यानें ज्ञानोबा व तुकोबा यांच्यांत 'नामा' विलीन झाला असेंच म्हणणें अधिक सयुक्तिक दिसेल.

---

# श्री धर

डॉ. ह. रा. दिवेकर

हरिविजय, रामविजयहि,
नैसा पाण्डव-प्रताप तो रघुनी ॥
शिवलिलामृत वर्णी
श्रीधर दृष्टान्त सुरस ते रचुंनी ॥ १ ॥

भोळ्या भाविक लोकां
अबलां बालां विरक्त-युक्तांना ॥
विधियुक्त मार्ग दावी
सकलां संसार-विषयसक्तांना ॥ २ ॥

त्या श्रीधरास वंदी
तद्वाङ्मय-परिचयास संपादी ॥
श्रोते हो, स्वर तुमचा
येथें मुळिंही नसो विसंवादी ॥ ३ ॥

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या वतीनें चालू असलेल्या संतवाङ्मय-परिचय-व्याख्यानमालेंत एक पुष्प गुंफण्याची अनुमति देऊन बृहन्महाराष्ट्रां-

तल्या मला या मालाकारांच्या पंक्तींत स्थान दिलें याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे. मी " झड मारूनियां बैसलो पंगती " खरा, पण " काय होइल गती न कळे कांहीं. " हें साहस करतांना मला माझ्या अयोग्यतेची पूर्ण जाणीव आहे, पण मला धीर देत आहे एकच गोष्ट आणि ती म्हणजे ज्या संतकवीच्या वाङ्मयाचा मला परिचय करून द्यावयाचा आहे, तें वाङ्मय स्वभावतःच भावगंधानें युक्त आहे, ही दृढ श्रद्धा. तेव्हां आतां या नमनांत व विनीत आभार प्रदर्शनांत उगाच वेळ न घालवितां, नाटकांतील सूत्रधाराप्रमाणें म्हणतों ' प्रकृतमनुसरामि. '

ज्या श्रीधर कवीचा आपणांस परिचय करून द्यावयाचा आहे तो " पंढरीहूनि चार योजनें दूरी, नैर्ऋत्य-कोणी नाझेर नगरी " तेथील देशलेखकाचा मुलगा. याचा जन्म शके १६०० त झाला असें मानण्यांत येतें, त्यांस खात्रीलायक पुरावा नाहीं. दत्तपरंपरेंतील काशीच्या रामानंदांच्या आनंदसंप्रदायांतील हा आठवा पुरुष. याचे वडील ब्रह्मानंद आणि आजे दत्तानंद, दोघेही कविता करीत. म्हणजे अध्यात्म आणि कवित्व, या दोन्ही गोष्टी श्रीधरानंदांस पितृपितामहक्रमानें प्राप्त झाल्या होत्या. ब्रह्मानंदांचा समाधिकाल श्रीधरानेंच शके १६१५ श्रीमुख संवत्सर मार्गशीर्ष शु॥ २ असा दिला आहे. श्रीधराचा अगदीं पहिला ग्रंथ ' हरिविजय.' शालिवाहन शके सोळाशे चोवीस। चित्रभानु नाम संवत्सरास। शुद्ध द्वितीया मार्गशीर्ष मास। ते दिवसीं ग्रंथ संपला।, म्हणजे वडलांच्या नवव्या पुण्यतिथीचे दिवशीं हा ग्रंथ पुरा झाला. यानंतर आठ महिने व पांच दिवसांनी श्रीधराचा दुसरा विजय ग्रंथ रामविजय संपूर्ण झाला. त्या दिवशीं ' शके सोळाशे चोवीस, सुभानुनाम संवत्सरास, भानुसप्तमी शुद्ध विशेष, श्रावणमास विख्यात पैं॥ ' ही तिथी होती. तिसरा ग्रंथ पांडवप्रताप. माघ मास विजय संवत्सरीं, शुद्ध दशमी बुधवारीं, श्री पांडुरंगनगरीं, ग्रंथ ते दिवशी संपला।' यावरून हा ग्रंथ शके १६३५ मध्यें पुरा झाला असें दिसतें. 'महाराष्ट्र सारस्वत'कार हा समाप्तिकाल १६३४ देतात; पण संवत्सर

गणनेवरून हा चूक वाटतो. निर्णयसागरनें छापलेल्या पांडवप्रताप पोथींत ‘ शके सोळाशे चौतीस निर्धारी, ग्रंथ आकारातें आला ’ अशी ओवी दिली आहे. उज्जयिनीच्या प्राच्यग्रंथसंग्रहालयांत शके १६५९ मध्यें नकललेली एक पांडवप्रतापाची हस्तलिखित प्रत आहे. तिच्यांत ही ओवी ‘ शके सोळाशें चौतीस वेरीं, ग्रंथ आकारातें आला ’ अशी आहे. म्हणजे १६३४ पर्यंत ग्रंथाचा आकार निश्चित होत होता आणि हें स्वाभाविक दिसतें. श्रीधर ब्रह्मानंद पांडव प्रतापाच्या आरंभींच सांगतात-‘श्रोते बोलती कुशल, सांडोनि आतां सर्व पाल्हाळ, बोले भारत रसाळ, आदिपर्वापासोनि.’ त्याचप्रमाणें शेवटींही त्यांनीं लिहिलें ‘ सवालक्ष मूळ भारत, तितक्याचा जो मथितार्थ, आला चौसष्ट अध्यायांत कथा सर्व आकर्षूनि। पाल्हाळ केला नाहीं बहुत, अथवा नसे संकलित, नेमस्त धरोनि मथितार्थ, पांडवप्रताप संपविला। अर्थात् हें कार्य करण्यास १६३४ पावेतोंचा काळ लागला तर त्यांत वावगें नाहीं. शेवटला ग्रंथ ‘शिवलीलामृत’ या तिन्ही ग्रंथांहून निराळा आहे. हा सर्वांत ल्हान, केवळ चौदा अध्यायांचा आहे व वरील तीन्हींही ग्रंथ ज्या पंढरपुरांत लिहिले गेले तेथें लिहिला गेला नसोन--‘ब्रह्म कमंडलूच्या तीरीं । द्वादशमतीनाम नगरी’! तेथें निर्माण झाला. याची समाप्ति ‘ शके सोळाशेचाळीस, विलंबीनाम संवत्सरास, शुद्ध पौर्णिमा फाल्गुनमास ’ रविवारीं झाली. श्रीधराचा समाधि काल त्याच्या मुलानें रचलेल्या आरतींत ‘ सोळाशत एकावन ’ सौम्य संवत्सर असा दिला आहे. म्हणजे श्रीधर कवि सुमारें शके सोळाशेपासून सोळाशें एक्कावनपर्यंत हयात होते, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

हा अर्धशतकाचा काल म्हणजे महाराष्ट्राच्या इतिहासांतील अत्यंत उज्ज्वल काल. श्रीधराच्या जन्माचे सुमारास तिकडे उत्तरेस औरंगजेबानें सुमारें एक शतकपर्यंत बंद असलेला जझियाकर हिंदूंवर पुन्हां बसवून त्यांचीं मनें कलुषित केलीं होतीं आणि इकडे दक्षिणेंत श्रीशिवाजी महाराजांनीं आपली कर्नाटकची मोहीम पुरी करून मद्रासपर्यंत आपले हात पोंचविले होते. श्रीधराच्या बाल्यकालांतच श्रीशिवाजी महाराजांचा मृत्यु झाला व संभाजीची कारकीर्द सुरू झाली. श्रीधराच्या

विद्यार्थिदशेंतच संभाजीचा वध झाला व राजारामाचीहि कारकीर्द संपली. श्रीधराचे हरिविजय व रामविजय ग्रंथ राजारामाच्या मृत्यूनंतरच्या तीन वर्षांतील आहेत. या साऱ्या काळीं मराठे कसे वागत होते व महाराष्ट्रीयांनीं कसें वागावें याचें जणूं कांहीं सूत्रात्मकच वर्णन श्रीधरानें पुढील शद्बांत दिलें आहे. 'जय अथवा पराजय, महावीरांसि पडे हा समय, पुरुषें पुरुषार्थ सांडू नये, करावा उपाय मागुती।' 'जों कायेंत असे प्राण। तों न सोडावी आंगवण' हीच नीति त्या काळीं श्रीधरानें महाराष्ट्रास शिकविली. औरंजेबाच्या मृत्यूनंतर शाहूची सुटका व त्याचा राज्यभिषेक आणि बाळाजी विश्वनाथाची पेशवेपदीं स्थापना यांतच मराठ्यांचा सारा प्रताप दिसून येतो. मग या काळांत महाभारताच्या आधारे लिहिलेल्या ग्रंथास श्रीधरानें पांडवप्रताप कां म्हणूं नये? आणि बाळाजी विश्वनाथानें पुण्यापासून दिल्लीपर्यंत जी राजकारस्थानें केली, मराठ्यांसाठीं मोंगलापासून सनदा मिळविण्याच्या ज्या शिवाजीसारख्या लीला दाखविल्या त्यांचाच पडसाद शिवलीलामृत या नांवांत निघतो असे कोणी म्हटलें तर त्यांत काय अडचण आहे? महाकवींच्या अक्षरवाङ्मयांत तत्कालीन क्षणिक राजकारणाचे ध्वन्यात्मक उल्लेख याहून अधिक न येणें अगदीं साहजिक आहे.

पण ही गोष्ट पुष्कळ लेखकांच्या ध्यानीं येत नाहीं. ज्ञानकोशकारांनी श्रीधरस्वामीवरील आपल्या लेखांत असें म्हटलें आहे कीं, 'श्रीधराच्या ग्रंथांत कोणत्याही राज्यक्रांतीचा किंवा राजपुरुषांचा मुळींच उल्लेख नाहीं.' पण यांत आश्चर्य वाटण्यासारखें काय आहे? जी गोष्ट लिहिण्यासाठीं कवि प्रवृत्तच झाला नाहीं ती गोष्ट त्याच्या काव्यांत आली तरच आश्चर्य. पण ही गोष्ट पुष्कळांच्या विचारांतून निसटते. महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या नुकत्याच निघालेल्या अंकांत डॉ. सहस्रबुद्धे यांचा 'आमचें गद्य व आमचें पद्य' हा प्रसिद्ध झालेला लेख हीच चूक दर्शवितो. कवींना आपल्या युगाची चाहूल लागलेली नसते असें नाहीं, काळ बदलल्याची जाणीवही त्यांस नसते असें म्हणतां येणार नाहीं. म्हणावयाचेंच असेल तर येवढेंच म्हणतां येईल कीं, तत्कालीन घडामोडींत अहमहमिकेनें भाग घेणारे व त्यासाठीं

तरवारी किंवा लेखण्या चालविणारे वीर पुरुष निराळे व या क्षणिक घटनांच्या पलीकडील शाश्वत मूल्यें ओळखून त्या मूल्यांसाठीं अक्षरवाङ्मय निर्माण करणारे क्रान्तदर्शी कवि निराळे. एकाच आग्रहरंगी कांचेंतून दोन्ही प्रकारच्या महापुरुषांस पाहण्याचें कारण नाहीं. डॉ. सहस्रबुद्धे यांचें रूपक या एकाच बुद्धीनें असें बदलून मांडतां येईल कीं, संसार चालविणारा कर्ता पुरुष लहान मुलांमुलींच्या भांडणांत जर गुंतून राहील तर कसें चालेल ? या तत्कालीन क्षणभर वादळ उठविणाऱ्या घटनांचें स्वारस्य त्यांस वाटतच नसतें. त्यांस त्यांचें आकलन होत नाहीं असें नाहीं, तर या गोष्टींचें आकलन करीत बसण्यांत व ही जावाजावांचीं नणंदाभावज-यांचीं किंवा भावाभावांचीं भाऊबंदकी भांडणें तोडीत बसणें त्यांस आपल्या कार्याचे दृष्टीनें कुचकामाचें वाटतें, हाच सिद्धान्त मानावा लागेल. वैदिक ऋषी, कालिदास, शेक्सपीयर, ज्ञानेश्वर यांसारखे महाकवी यांच्या काव्यांत तत्कालीन इतिहास शोधणें म्हणजे घडीभराचा मनोविनोद होईल. पण त्यावरून त्यांची योग्यायोग्यता, त्या महापुरुषांचा दृष्टिकोन व त्यांचें कार्य या विषयीं अनुमानें बांधणें धोक्याचें आहे असें मात्र येथें सांगावेसें वाटतें. असो.

संत श्रीधर कवीच्या ज्या वाङ्मयाचा मी आपणांस परिचय करून देण्याचें ठरविलें आहे त्यांत 'हरिविजय', 'रामविजय', 'पांडवप्रताप' व 'शिव-लीलामृत' या चारच ग्रंथांचा मी विचार करणार आहें. श्रीधराचे लहानमोठें आणखी कांहीं ग्रंथ आहेत, पण ते श्रीधरी वाङ्मय या सदरांत येत नाहींत असें वाटतें. कवीच्या तोंडांतून निघालेले किंवा लेखणीनें लिहिलेले सारे शब्द वाङ्मय, हा वाङ्मय शब्दाचा मुख्य पदार्थ होत असला तरी ते सारे शब्द वाङ्मय या संज्ञेस पात्र होत नाहींत. आजकाल 'समग्रवाङ्मय' म्हणून जी अनेक पुस्तकें प्रसिद्ध होतात, त्यांत बराचसा भाग असा—म्हणजे वाङ्मय संज्ञेस अपात्र-असा असतो. एखाद्या कवीच्या समग्र वाङ्मयांत त्यानें आपल्या अपक्क अशा विद्यार्थीदशेंत केलेल्या वेड्यावाकड्या कविताही छापलेल्या असतात. कवीची कवित्वशक्ति कसकशी विकसित होत गेली हें पाहण्याच्या दृष्टीनें जरी त्या

कवितांचा थोडाफार उपयोग असला, तरी त्याचें वाङ्मय म्हणून वाचतांना त्या कविता कशाकशाच वाटतात. वाङ्मयाची माझी कसोटी पुढीलप्रमाणें आहे. कवीनें रचिलेलें पण काळाच्या चाळणींतून हिणकस भाग गळून गेल्यावर शतकानुशतकें आपल्या उज्वलपणानें जें तळपत राहतें तें त्या कवीचें खरें वाङ्मय. याचसाठीं थोड्याच दिवसांत विस्मृतीच्या पंथास लागलेले जे श्रीधराचे ग्रंथ त्यांचा मीं विचार केला नाहीं. 'वेदांतसूर्य', 'पंढरीमाहात्म्य', 'मल्हारीविजय' इत्यादि ग्रंथ विस्मृति ग्रंथ म्हणून टाकून देतां येतील. पण श्रीधराच्या जैमिनी अश्वमेधाचा मी कां विचार केला नाहीं, हें मात्र सांगणें आवश्यक आहे. कारण श्रीधरावर जेवढ्या म्हणून विद्वान लोकांनीं कांहीं लिहिलें आहे त्या सर्वांनीं हा ग्रंथ श्रीधराचा म्हणून मान्य केला आहे. सबब याचें खंडन करणें आवश्यक आहे.

हा ग्रंथ श्रीधराचा आहे असें मानण्यास कारणें दोनच आहेत. पहिलें कारण प्रत्येक अध्यायाचे अंतीं 'म्हणे श्रीधर श्रोतया' हा चरण आणि शेवटल्या अध्यायाचे शेवटीं 'शहाण्णव अध्याय संपूर्ण' येथपासून श्रीधर ब्रह्मानंदाची परंपरा देणाऱ्या ग्रंथ समाप्ति करणाऱ्या सोळा सत्रा ओव्या, हें दुसरें कारण. यापलीकडे कोणी ग्रंथांतरीं शिरून या गोष्टीचा विचार केलेला दिसत नाहीं. हा ग्रंथ श्रीधरस्वामी ब्रह्मानंद यांचा नाहीं, याचीं कारणें पुढीलप्रमाणें:-

[ १ ] **ब्रह्मानंदाचा अनुल्लेख**-विजयप्रतापामृतांचा कर्ता श्रीधर हा एक अलौकिक गुरुभक्त आहे. या चारी ग्रंथाच्या आरंभींच्या ओवींत ब्रह्मानंद हा शब्द आहे एवढेंच नव्हे, तर या चारही ग्रंथांत असा एकही अध्याय सांपडणार नाहीं कीं ज्यांत ब्रह्मानंदाचा उल्लेख नाहीं. याचे उलट या जैमिनी अश्वमेध ग्रंथांत वर सांगितलेल्या शेवटल्या ओव्या गाळल्या तर साऱ्या शहाण्णव अध्यायांत ब्रह्मानंदाचें नांवनिशाण नाहीं. यावरून जैमिनी अश्वमेध सांगणारा श्रीधर या श्रीधरब्रह्मानंदापेक्षां निराळा आहे असें उघड दिसतें. इतर ठिकाणीं राहो, पण प्रथमाध्यायाच्या मंगलाचरणांत 'आतां नमूं तो सद्गुरु' म्हणून ज्या सहा ओव्यांत गुरुवंदना केली आहे तेथेंही हव्या त्या गुरूंस सामान्यपणें लागू होणारें वर्णनच आहे व

विशेषपणें ब्रह्मानंदाचा उल्लेख नाहीं, हें ध्यानांत आलें म्हणजे वरील विधानांस बळकटी येते.

[ २ ] **कुलदैवत भेद**–श्रीधरानें आपल्या उभय विजय ग्रंथांत कुलदेवतेचा उल्लेख केला नाहीं. पण पांडवप्रतापांत 'वंदू कुलदैवत निश्चयेमी' म्हणून मणिमल्ल मर्दन खंडेराव, करवीरपुर विलासिनीदेवी आणि दक्षिण केदार या तीन देवतांचे वंदन केलें आहे. आतां जैमिनी अश्वमेघांतील कुलदैवत पहा. अश्वमेधकार श्रीधर म्हणतो, 'आतां वंदू कुलदैवत, जो नामें प्रसिद्ध सिद्धनाथ, ब्रह्मांडरूपित्थ नगरीं राहत, भक्त मनोरथ पुरवावया' यावरून कवठ्याचा सिद्धनाथ हें या श्रीधराचें कुलदैवत स्पष्ट दिसतें. या दैवतभेदांवरून श्रीधर भेद स्पष्ट होत नाहीं काय?

[ ३ ] **मंगलाचरणाचा अभाव**–श्रीधरस्वामी आपल्या चारहि ग्रंथांत प्रत्येक अध्यायाच्या किंवा प्रकरणाच्या आरंभी गुरुवंदन किंवा ईश्वर स्तवनरूप मंगल करितात. या मंगलांत श्रीधराच्या कवित्व शक्तीची चुणूक, प्रदीर्घ समाज रचना व कल्पनाविलास प्रामुख्यानें दिसून येतात, पण अश्वमेध लेखक श्रीधरानें फक्त पहिल्याच अध्यायांत तें केलें आहे. पुढें या ग्रंथकारास कुठेंही तें करण्याची आवश्यकता वाटली नाहीं. ही गोष्ट कमी महत्वाची नाहीं.

[ ४ ] **अध्यायाची ओवीसंख्या**–श्रीधरस्वामींच्या चारही ग्रंथांत मिळून १५४ अध्यायांत १३५ ओव्यापेक्षां कमी ओवी संख्या असलेले फक्त सातच अध्याय आहेत, व त्यांतही १०० हून कमी ओव्या असलेला एकही अध्याय नाहीं. उलट जैमिनीअश्वमेघ ग्रंथांत १३५ हून अधिक ओवी संख्या असलेले अवघे १६ अध्याय आहेत. बाकीच्या ८० अध्यायांची ओवी गणना प्रत्येकी १३५ हून कमी आहे व त्यांतील बेचाळीस शंभराहून कमी ओव्यांचे आहेत. एक अध्याय तर अवघ्या ४१ ओव्यांचा आहे. त्यामुळें अध्यायांची संख्या जरी फुगविली असली तरी ओव्यांचीं संख्या पुरती दहा हजारही नाहीं. इतके लहान अध्याय लिहिणारा श्रीधर व सरासरीनें सव्वादोनशेंवर ओव्यांचे अध्याय लिहिणारा श्रीधर एक असावेत असें यावरूनही वाटत नाहीं.

[ ५ ] **ग्रंथसमाप्ति पद्धति**–ग्रंथ समाप्त करण्याची श्रीधराची एक ठराविक पद्धति आहे. ग्रंथांतीं साऱ्या अध्यायांची एक अनुक्रमणिकासारखी अवतरणिका

तो देतो. त्याचप्रमाणें अध्याय संख्येवर रूपकें करून वर्णन करण्याची त्याची रीत आहे. उदारहणार्थ, हरि विजयाच्या ३६ या अध्याय संख्येविषयीं 'छत्तीस तत्त्वें हीं साचार, कीं छत्तीस खणाचें दामोदर' इत्यादि तो म्हणतो, तर रामविजयाच्या ४० या अध्याय संख्येवर 'रामविजय मांदुस आगळी, आंत होती चाळीस कोहळी, नवरत्नद्रव्यें पूर्ण भरली, मज दीधली ब्रह्मानंदें' इत्यादि कल्पना बसवितो. पांडव प्रतापाच्या ६४ अध्यायास तो 'कीं हें चौसष्ट फलांचें भार, कीं हें चौसष्ट योगिनींचें मंदीर, कीं हें चौसष्ट स्त्रियांचें पदक सुंदर, सभाग्य-भक्त घालिती' अशी उत्प्रेक्षा करितो, तर शिवलीलामृताच्या चौदा अध्यायांस 'कीं चौदा विद्यांचें सार, कीं चौदा गांठींचा अनंत परिकर, कीं चौदा पदें निरंतर, गया वर्जन घडे हें' असें रूपक निर्माण करितो. पण अश्वमेधाच्या शेवटीं ना अनुक्रमणिका, ना असल्या कल्पना. याचा शेवट किती नीरसपणें केला आहे. तो पहा 'शहाण्णव अध्याय संपूर्ण, ग्रंथकर्ता रमारमण, ज्याचे पोटीं झालों निर्माण, तोचि गुरु ब्रह्मानंद' यावरून हे दोन श्रीधर भिन्न असावेत असें वाटतें.

[ ६ ] **कथाभेद**–पांडवप्रतापांतल्या अश्वमेध पर्वास श्रीधरानें ५८ ते ६३ असे सहा अध्याय खर्चीं घातले आहेत. हें पर्व व्यासकृत अश्वमेधाच्या आधारें लिहिलें नसून 'व्यास शिष्य जैमिनीकृत' अश्वमेधावर श्रीधरानें आधारलें आहे. 'जैमिनी अश्वमेघ' या ग्रंथांत याच सहा अध्यायांतील कथा विस्तारपूर्वक सांगून ६० अध्याय लिहिले आहेत. पुढें एकसष्टाव्या पासून त्र्याहत्तर पावेतों दुंदुभ्याख्यान सांगितलें आहे. पुढें चार अध्याय सैन्य-पालाख्यान, पांच अध्याय सिंहध्वजाख्यान, तीन अध्याय बाणासुराख्यान इत्यादि आख्यानें सांगितलीं आहेत. आतां या आख्यानांविषयीं श्रीधर-ब्रह्मानंदाचें काय मत आहे, तें पाहूं. श्रीधरस्वामी म्हणतात,–"जैमिनी अश्वमेध पाहून, कथा त्याच सांगितल्या संपूर्ण, वाउग्या दंतकथा ऐकोन, नाहीं लिहिल्या या ग्रंथीं ॥ दुंदुभि विभ्रंशि आख्यान, मूळग्रंथीं नाहींच जाण, इतर कवी बोलिले सत्कारून, कशावरून न कळे तें ॥ मूळ संस्कृत आधाराविण, कविता करी जो अज्ञान, तयास होय बंधन, कल्पांत वेरी यमलोकीं ॥ कथा असती

जरी भारती, तरी कां वर्णावया माझी मती, शिणती है विचारून श्रोतीं, दोष न ठेवावा ग्रंथातें ॥' जो श्रीधर असें म्हणतो, तोच श्रीधर द्रोनच वर्षानंतर यम बंधनाचें भय न बाळगितां दंतकथांच्या आधारें असें वर्णन करील काय, याचा विचार आपणच करावा.

[ ७ ] **प्रत्यक्ष ग्रंथाधार**-हस्तलिखित पोथ्यांचा संग्रह करतांना मला जैमिनी अश्वमेधाची एक जीर्ण पोथी सांपडली आहे. छापील पोथींतली ६६ व्या अध्यायाची शेवटली ओवी नेहमींची नाहीं. ती या पोथींत तशी आहे, ही एकच गोष्ट पोथीच्या खरेपणास पुरेशी आहे. यांत या अश्वमेध लेखक श्रीधरानें आपल्या जनकाचें नांव बिडाडी म्हणून दिलें आहे. याच्या आईचें नांव लक्ष्मी. हीं उभयतां लहानपणीं वारल्यानें याच्या त्र्यंबक नांवाच्या वडील भावानें याचें पालनपोषण करून यास शिकविलें व याच्या बुद्धीचा विकास केला. त्या श्रीधरानें १६३७ शब्दांत मन्मथ संवत्सरीं पौष महि-न्यांत हा ग्रंथ पुरा केला. छापील पोथींत हा संवत्सर दुर्मुख असा दिला आहे. हा संवत्सर १६३८ मध्यें येतो. अर्थात या लेखकानें पूर्वी उल्लेखिलेला १६३४ तला विजय संवत्सर मानून हा संवत्सर लिहिलेला दिसतो, पण १६१५ तल्या श्रीमुख संवत्सरापासून १६५१तल्या सौम्य संवत्सरा-पर्यंत हिशेब केल्यास १६३८त दुर्मुख व १६३४त विजय असे दोन्ही संवत्सर चुकतात. या सर्व गोष्टीवरून माझी खात्री झाली आहे कीं, जैमिनी अश्वमेध हा ग्रंथ विजयप्रतापामृत नांवानें प्रसिद्ध असलेल्या चारी ग्रंथांच्या लेखकाचा-श्रीधरब्रह्मानंदाचा-नव्हे व म्हणूनच मी त्याचा परिचय आपणांस करून देण्याचे भानगडींत पडत नाहीं.

या श्रीधरी वाङ्मयाचा विस्तार पुढीलप्रमाणें आहेः—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| हरिविजय— | अध्याय | ३६ | ओव्या | ८१३९ |
| रामविजय— | अध्याय | ४० | ओव्या | ९२४८ |
| पांडवप्रताप— | अध्याय | ६४ | ओव्या | १३७२३ |
| शिवलीलामृत— | अध्याय | १४ | ओव्या | २४५४ |
| | अध्याय | १५४ | ओव्या | ३३५६४ |

हें वाङ्मय मुख्यतः 'भारत, रामायण, भागवत,' आणि स्कंद-पुराणांतील 'ब्रह्मोत्तर-खंड या संस्कृत ग्रंथांच्या आधारें लिहिलें आहे. पण त्यांत या शिवाय हरिवंश, ब्रह्माण्डपुराण, नारदपुराण, पद्मपुराण, अग्निपुराण, जैमिनी अश्वमेध, हनुमन्नाटक, यांतील कथाहि समाविष्ट केल्या आहेत. बहुधा श्रीधर-स्वामी आपण वर्णिलेल्या कथेस आधार देतात, पण तरीहि मूळ ग्रंथाशीं क्वचित विसंगति असेल अशी शंका येणें साहाजिकच होतें. त्याचप्रमाणे 'पुराणांतील विपरीत, कथा पडावया काय निमित्त, याचे प्रत्युत्तर' हीं श्रीधरांनीं फार मजेचें दिलें आहे. श्रीधर म्हणतात, 'अनादिसिद्ध अवतार-माळा, जगदीशे गुंफिल्या अवलीला, जैसें तरंग पूर्वांजळा, व्यापैनिया असणे कीं'. त्याच तऱ्हेनें 'एकें अवतारीं वर्तले एक, तों दुसरे अवतारी विशेष कौतुक, तरी तितके ही सत्य देख, विपरीतार्थ न मानिजे.' याशिवाय 'कवींची घडामोडी बहुत, युक्ति सागरोंची रत्ने काढीत, एक गव्हांचे प्रकार बहुत, करी जैसी सुगरिणी' हे आहेच. काळजी घ्यावयाची ती एवढीच कीं निराधार कथा लिहावयाच्या नाहींत. पुराणाशिवाय पंचमहाकाव्यें, जयदेव, बिल्वमंगल, कालिदासादि कवींची नाटकें, साहित्यग्रंथ, इत्यादींचा अभ्यास स्वामींनीं उत्तम प्रकारें केलेला दिसतो. वेदांत ग्रंथांत गीता, उपनिषदे व योगवासिष्ठ यांचा परिचयहि स्वामींचा होतासा वाटतो. टीकाकारांत वेदांत सूत्रांवर टीका करणोर शंकराचार्य यांजविषयी तर श्रीधरस्वामीस अत्यादर आहे. 'सकल मतवादी जंबूक जाण, शंकर सिंह गर्जतसे,' 'सकल मतवादी दरिद्री, शंकर श्रीमंत पृथ्वीवरी' असा आचार्यांचा अभिमान श्रीधरांस आहे. शिवाय भागवत टीकाकार श्रीधराचार्य, गीता टीकाकार मधुसूदन सरस्वती यांचाही परिचय श्रीधरास आहेच.

संस्कृत ग्रंथ तर श्रीधरस्वामींनीं अभ्यासिले होतेच, पण मराठी कवींची कविताही त्यांस चांगलीच परिचित होती. 'वेदांत क्षीरार्णवींचा मीन, जेणे सिंधू रचिला पूर्ण' तो मुकुंदराज, रमावराचा दुसरा अवतार असे गीतार्थकार ज्ञानेश्वर, भानुदास कुलभूषण प्रतिष्ठानवासी एकनाथ, यांचे बहुसाल ग्रंथ तर श्रीधरांस माहित होतेच, पण 'चातुर्य राजधानीचे कळस' मुद्गलदास मुक्तेश्वर यांचे ब्रह्मानंद उचंबळविणारे ग्रंथहि श्रीधरानें अभ्यासिले होते.

'ज्याचीं लोकरचना या भूमीमंडळावरी अपूर्व' अशा वामनस्वामीच्या काव्याची ओळख श्रीधरास चांगली होती. व त्याचप्रमाणें कृष्णदास म्हणजे कृष्णस्वामीचे शिष्य जयराम यांचे ज्ञानभरित ग्रंथहि श्रीधरानें वाचलेले दिसतात. रामदासांच्या दासबोधाची छाप तर श्रीधरी वाङ्मयांत ठिकठिकाणीं दिसून येते. संत नमनांतील 'कीं ते वैराग्य अंबरीचे दिनकर, की अक्षय विज्ञानानंदचंद्र' किंवा 'कीं ते श्रावणामृताचे कुंभ, कीं ते कीर्तनाचे अचल स्वयंभ. कीं ते स्मरणाचे सुप्रभ, ध्वजचि पूर्ण उभारले' अशी 'कीं' शद्ब घालून रूपकाची किंवा उत्प्रेक्षांची रेलचेल करण्याची पद्धत समर्थांच्या कविवर्णनावरून उघड उघड घेतलेली दिसते एवढेंच नव्हे तर 'कलियुगी जाहले जे संत, वर्तमानींचे आतां समस्त, पुढें होणार जे निश्चित, दीर्घ दंडवत समस्तांते' या ओवींत तर 'मागे झालें पुढें होणार' या समर्थ वचनाचा अनुवादच आढळतो. बाहेरच्या इतक्या ग्रंथांची माहिती असल्यावर आपल्या घरांतल्याच 'ब्रह्मानंद स्वामीचा बंधु सत्य, नाम तयाचें श्रीरंगनाथ' यांची कविता त्यांस माहीत नसेल हें संभवतच नाहीं. या साऱ्या पूर्वसूरींचा पूर्ण परिपाक श्रीधरी वाङ्मयांत आढळतो. पण या सर्वांत एका गोष्टीचें मात्र आश्चर्य वाटल्याशिवाय रहात नाहीं. इतक्या कवींचा उल्लेख करणारा व श्रीमन्द्भीमातीर-विहारी श्रीपंढरीशास ब्रह्मानंदस्वरूप समजणारा श्रीधर, तुकारामाचा उल्लेख कां करीत नाहीं ही गोष्ट मात्र चमत्कारिक वाटते. पंढरपुरास रहात असतांना श्रीधरांनी तुकारामाचे अभंग ऐकले नसतील असें वाटत नाहीं. समर्थांच्या दासबोधाप्रमाणेंच तुकारामाच्या अभंगाचा अनुवाद श्रीधरी ओव्यांत अनेक ठिकाणीं दिसून येतो. उदाहरणार्थ, 'परस्त्री देखतां निर्बळ, परधन पाहतां अंध केवळ, परनिंदेविषयीं मुका जो', तो नरनारायण आहे असें वाचलें म्हणजे 'परस्त्रीच्या ठायीं जो कां नपुंसक त्याचे अंगा राख असो नसो। परधना अंध निंदेसी जो मुका, त्याचे माथा बुका असो नसो' या तुकारामाच्या अभंगाची आठवण कोणास येणार नाहीं किंवा 'तोंवरी गर्जे जलार्णव, जों देखिला नाहीं कलशोद्भव' ही ओळी वाचली म्हणजे 'तोंवरीं जंबुक करी गर्जना, जोंवरी पंचानना देखिलें नाही' या तुकारामाच्या वचनाचाच तो पडसाद आहे असें कोणास वाटणार नाहीं!

त्याचप्रमाणें 'तैसी सुमित्रा नव्हे पूर्ण, करणी नामासारखीं' हें वाचतांना 'नामासारखी करणी, हें तों न दिसे त्रिभुवनीं' हा आधार कोणास आठवणार नाहीं? पण असें असतांहि पूर्व कवींत किंवा पूर्व संतांत श्रीधरानें तुकारामाचें नांव कां घेतलें नाहीं हें समजत नाहीं, एवढें मात्र खरें!

श्रीधरस्वामीस काव्यस्फूर्ति या प्राकृत कवींपासूनच मिळाली असावी हें निश्चित. ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, भावार्थ रामायण इत्यादिकांचा वाढत जाणारा पाठ आणि वारकरी पंथांचे अभंगांची लोकप्रियता पंढरपुरासच राहणाऱ्या श्रीधराचे ध्यानीं आल्याशिवाय कशी राहील? पण त्याचबरोबर य साऱ्या वाङ्मयाचा उपयोग विशेषतः महाराष्ट्रांत पुरुष वर्गासच होतो व त्यामुळें या भक्तिमार्गाच्या वाङ्मयाची 'अर्थी कोणी न घाली दृष्टी, संत बोलती निर्वाण गोष्टी, पाखंडी घेती कुतर्क' अशी स्थिती असल्यानें वर्णाश्रम धर्मयुक्त कर्ममार्गाकडे लोकांचें दुर्लक्ष होत आहे, ही गोष्ट श्रीधराचे ध्यानीं आली असेल. 'काव्यप्रकाश' हा मम्मटाचार्यांचा संस्कृत ग्रंथ श्रीधरांनीं वाचला असावा, हें त्यांनीं वापरलेल्या अलंकारावरून व विशेषतः 'वापीं स्नातुमितो गतासि' या श्लोकाचा दोन तीन वेळ उपयोग केला आहे यावरून स्पष्ट होतें. तसें असेल तर 'कांतासंमिततया रामादिवद्वर्तितव्यं न रावणादिवत् इत्युपदेशयुजे' हा काव्य चरण त्यांना ठाऊक असावा आणि म्हणूनच 'जिचे हातीं पाळण्याची दोरी, तीच देशातें उद्धरी' या न्यायानें स्त्रियांस ज्ञानदान करावयाचें श्रीधरस्वामींनी ठरविलें असावें. हरिविजय ग्रंथांत त्यांनीं आपला हेतु स्पष्ट सांगितला नाहीं पण त्या ग्रंथाच्या लोकप्रियतेनें श्रीधरस्वामींची फुरफुरलेली लेखणी रामविजयांत स्पष्ट लिहूं लागली, कीं 'अबलां न कळे संस्कृत वाणी, जैसें आडांतील निर्मल पाणी, परीं दोरपात्रावांचोनी, अशक्त जनां केवि निघे। तें तडागासी येतां त्वरें, तत्काळचि तृषा हरे, अबला जन तारावया ईश्वरें, प्राकृत ग्रंथ निर्मिले। सर्वांस मान्य गीर्वाण, जरी असेल पूर्व पुण्य, तरीच तेथींचे होय ज्ञान, अबलाजन केवीं तरती.' पुढे पांडवप्रतापांत तर त्यानें श्रोत्यांकडूनच अशी विनंती करविली आहे कीं, 'बोलसी ध्वनितगुह्यार्थ, तरी अबलांस न कळे यथार्थ, तरी थोडक्यांत रस अद्भुत, कथा समस्त आवरीं,' आणि खरोखरच जितक्या

कवींनी भारत, भागवत, रामायणाच्या कथा प्राकृतांत रचण्याचे प्रयत्न केले त्या सर्वांत श्रीधराइतकें यश कुणासच लाभलें नाहीं. फार विस्तार नाहीं, अतिसंक्षेप नाहीं, याप्रमाणें योग्य व्याससमासयुक्त अशी रचना करून श्रीधर ब्रह्मानंदांनीं या पुराणांतल्या गोष्टी ओटीवरून माजघरांतच नव्हे, तर स्वयंपाकघरापर्यंत नेल्या आणि ज्या अबलांजनासाठीं श्रीधरानें आपली लेखणी झिजविली, त्या महाराष्ट्र-भाषाभाषी अबलांनी नुसत्या महाराष्ट्रांतच नव्हे तर बृहन्महाराष्ट्रांतही श्रीधराचा यशोदुंदुभि दुमदुमत ठेविला. श्रीधराच्या काव्यामृताची गोडी मला माझ्या मातुःश्रीनें बालपणींच लाविली व त्याचेंच हें बरें वाईट फळ आज आपणांपुढें विद्यमान आहे.

काव्य करावयाचें ठरल्यावर मात्र श्रीधरानें शक्य तितक्या प्रयत्नांनी आपली काव्यदेवता सजविली आहे. आरंभापासून आतांपर्यंत श्री ज्ञानेश्वर महाराजांनी दाखविलेल्या गुरुभक्तीचा व विनीतवृत्तीचा अवलंब करूनच जें लिहावयाचें तें लिहिलें आहे. ' जैसा अर्भक छंद घेत, पिता कौतुकें लाड पुरवित, तैसी येथें पदरचना समस्त ' पुरविण्यास गजवदनांस प्रत्यक्षपणें पण ' तूंचि झालासी गजवदन ' म्हणून अप्रत्यक्षपणें सद्गुरुब्रह्मानंदासच विनविलें आहे. शिवलीलामृतांत तर ' जैसा धरूनि शिशूचा हात, अक्षरें लिहवी पंडित ' तसेंच ईश्वरानें श्रीधरास निमित्तमात्र करून ग्रंथ लिहविला असें विनम्रपणें सांगितलें आहे. पदरचनेच्या जोडीस पद्यरचना व अर्थगौरव हवें हें श्रीधर जाणून आहे. रस व अलंकार यांचाहि यथार्थ प्रयोग केला आहे. पण या सर्वांत श्रीधराचा जर कशावर भर असेल तर तो दृष्टांतांवर आहे. श्रीधरानें आपला सिद्धांत ठरविलेला आहे, कीं ' अमृताहूनि गोड अन्न, परी रुचि न ये शाकेंविण, दृष्टांताविण ग्रंथ संपूर्ण, रसीं न चढे सर्वथा.' श्रीधराच्या काव्य-तुलसीची दृष्टांत हीं पत्रें आहेत, याच्या काव्यसूर्याचीं किरणें म्हणजे दृष्टांत. याच्या ग्रंथास जर राम किंवा कृष्णाची उपमा दिली तर तो राम जसा वानर-वेष्टित किंवा कृष्ण जसा यादवांनी युक्त, तसाच याचा ग्रंथ दृष्टांतांनी खच भरलेला. येथें दृष्टांत शब्द अलंकारशास्त्रांतील संकुचित अर्थी मात्र घ्यावयाचा नाहीं तर समान गुणवर्णन या अर्थी घ्यावयाचा आहे, हें ' श्रीधर म्हणे मज येथें दृष्टांत, स्फुरला तो ऐका प्रेमळ फक्त, भीमातट

विहारी पंढरीनाथ, बुका उधळत तयांवरी' या दिलेल्या उपमेवरून स्पष्ट होत आहे. कुठलीही गोष्ट श्रोत्यांचे मनांवर ठसवावयाची असली कीं श्रीधर ती दृष्टांतांनीं ठसवितात. बाह्यांगावरून अंतरंग कसें ओळखावें तर 'बोलावरून कळे चित्त आचरणावरून पूर्वार्जित, क्रियेवरून वर्णाश्रम सत्य, परीक्षक जाणती। राहणीवरून कळे परमार्थ, शब्दापशब्दीं कळे पंडीत, प्रेमादरावरोनी भक्त, परीक्षक जाणती तसें.' बरें हें दृष्टांत एकाद दुसऱ्या ओवींत संपतील असें नाहीं. दोन तीन ओव्यापासून तो वीसवीस ओव्यापर्यंतहीं हे दृष्टांत दिलेले आहेत, पण सामान्यत्वानें चार पांच ओव्या तरी, दृष्टांत देऊं लागले कीं असावयाच्याच. आणि हें एकाहून एक सरस. स्वतः श्रीधरच सांगतात, कीं 'कथा हेच भागीरथी, तीरीं दृष्टांत क्षेत्रें विराजती, एकाहून एक विशेष.' तुमच्या हातांची गोष्ट गेली असो, कीं तुम्ही ती दवडली असो, एकादी गोष्ट दैवयोगानें तुम्हांस मिळाली असो कीं ती पाहून दुसऱ्यांचा संताप झाला असो, एकादी असंभव गोष्ट घडली असो कीं अयोग्य किंवा योग्य गोष्टींचा समागम झाला असो श्रीधरांचे दृष्टांत तेथें असावयाचेच. यांची गणना करणें अशक्य. कारण श्रीधरस्वामींच्या काव्यरूपी आकाशांत 'दृष्टांत नक्षत्रें अपार निजतेजें तळपती,' फार काय श्रीधरानेंच सांगितलें आहे कीं 'ग्रंथ हा पंढरीनगर, दृष्टांत अपार यात्रा तेथें.' तेव्हां या यात्रेंत न गुरफटतां दुरून नमस्कार करून आपला मार्ग आक्रमण करावा हेंच बरें.

दृष्टांतासारखेंच श्रीधरानें दुसरे अलंकारहि वापरले आहेत. याच्या कांहीं आवडत्या उपमा पहा. 'ठीक आहे उद्यां पाहून घेईन' असें म्हणणारा माणूस आपली मान ऐटीनें हालवितो त्यावेळीं श्रीधराची ठरलेली उपमा आहे कीं, 'सरडा कंटकवृक्षीं बैसोन, ग्रीवा जैसी हालवी.' आपल्या समोरचा गोंधळ एकदम दुभंगला कीं 'जसा स्त्रिया करिती भांग' हें श्रीधरास आठवलेंच म्हणून समजावें. मथुरेच्या दुर्जनास श्रीधर म्हणतो, 'मागें बोलावें अतिन्यून, समोर देखतां पळती उठोन, हें ग्रामसिंहाचें लक्षण, तैसे दुर्जन मथुरेचे.' 'जैसी कुळवंत कामिनी, अवयव झांकी क्षणोक्षणीं, तैसे आपुलें सुकृत झांकोनि, सज्जनजन ठेविती' ही उपमा कोणास हृद्य वाटणार नाही? विष्णु-सहस्र-नामानें पापें नष्ट होतात, याशिक धगधगीत अग्नि कुंडांत

झांकून ठेवतात, ‘मूर्खाचें वाग्जाळ बहुत, एकेंचि शरें निवारी पंडित,’ ‘चपळ लेखका पासाव एकसरें, निघती अक्षरापाठीं अक्षरें,’ ‘उद्वसग्रामींचीं शून्य मंदिरें,’ इत्यादि श्रीधरांचीं ठरलेलीं उपमानें आहेत. देवेंद्रानें रामासाठीं धाडलेला रथ पाहतांच राक्षसांचा झालेला संताप सांगतांना श्रीधरानें तत्कालीन उपमा अशी दिली आहे कीं ‘शिवप्रतिमा देखोन डोळां, म्लेच्छ जैसे संतापती.’ आणखी थोड्या उपमा पहा; ‘जैसा नकळतां कवणांसी जाण, शरीरांतून जाय प्राण, तैसा मेघवर्णें श्यामकर्ण, उचलूनि नेला एकसरें.’ ‘चौफेरी फुटे तडागजल, तैसे पळाले पांचाल दळ.’ ‘जैसी केशनखें आंगी वाढती, आपुलींच आपणातें सलती, तीं छेदितां सुख निश्चिती, तैसे दुष्टमती वधावे.’ असो. ‘गात्रें पाहुनि भूषणें, लेववितो पैं शहाणें’ किंवा ‘मुगरिणी जैसी वाढी, अपेक्षा पाहूनी क्षुधिताची.’ तशी श्रोत्यांची अपेक्षा पाहून शेवटीं ‘भोजनांतीं दध्योदन’ ही अस्सल महाराष्ट्र ब्राह्मणी उपमा देऊन या उपमा-सेवनांपासून निवृत्त व्हावें हेंच आतां उत्तम.

उपमांप्रमाणेंच-नव्हे उपमापेक्षांहि अधिक-रूपकांचीं रेलचेल श्रीधरी ग्रंथांत सांपडते. श्रीरामचंद्रदासानुदास श्रीधरानें आपल्या ग्रंथास दिवटीचें रूपक देऊन सांगितलें आहे कीं, ‘बाल, भोळे, भक्त, अज्ञान, प्रपंच रजनीत पडिले जाण, त्यांस हे ग्रंथ दीपिका पाजळोन, मार्ग सुगम दाखविला.’ नाझरें, पंढरपूर, बारामती अशा गांवी रहाणाऱ्या श्रीधरानें जहाजें कधीं पाहिलीं असतील कोण जाणें? पण रूपक करितांना जहाजाचें रूपक हें श्रीधराचें फार आवडतें आहे. हें रूपक तो अनेक वेळां अंगप्रत्यंगांसह वापरतो. उदाहरणार्थ,—‘शब्द भवाब्धि भरला अपार, कविता लक्ष तारूं थोर, स्फूर्तिवायूच्या बळें सत्वर, जहाज चाले त्वरेनें। सद्‌गुरुकृपा हेंचि बंदर, तेथं शब्दरत्नें भरली अपार, संतपेठेसी आणिलीं साचार, ग्राहक थोर म्हणोनियां ॥ तरी सादरता देऊनि धन, घ्याजि शब्दरत्नें परीक्षा करून’ ही श्रीधराची विनवणी पहा. आपण रचिलेल्या रामकृष्णाच्या कथांस तो मानससरोवर, गंगा, क्षीरसागर, कल्पवृक्ष, रामेश्वर, शेषाद्रि म्हणजे बालाजीचा डोंगर, वैकुंठपीठ, दक्षिणसमुद्र, रसराज, षड्रसांनीं भरलेलें ताट, आंब्यांचें वन

इत्यादि रूपकांनीं सजवितो. कुलदैवत मल्लारिवर स्वानंदराशि जगदात्म्याचें केलेलें रूपक पहा–' बोध खांडा हातीं धरिला, वैराग्य तुरंगीं बैसला, अर्धांगी विलसे ज्ञानकला, म्हाळसादेवी चिच्छक्ति ' या प्रकारच्या वेदांत–रूपकांची श्रीधरास फार आवड दिसते. या दृष्टीनें विदेह नगरांतील विदेह शब्दावर श्लेष करून आत्मारामांच्या विदेह नगरींत केलेल्या निवासावर श्रीधरानें सुंदर रूपक उठवून दिलें आहे. असेंच दुसरें एक रूपक घेऊं. बिभीषण रामास शरण जाण्यास निघाला ही गोष्ट श्रीधर कशी सजवितात तें पहा. ' दुर्धर अहंकार दशानन, अहंदेहबुद्धी लंकागहन, तेथें वास्तव्य अनुदिन, क्रोध कुंभकर्ण बंधू सखा। अनर्थकारक काम इंद्रजित, मद हा मुख्य प्रधान प्रहस्त, मत्सर दंभ ते निश्चित, देवांतक नरांतक पैं। शोक, मोह आणि अनर्थ, भेदवादी असुर बहुत, खल कुटिल कुतर्क समस्त, देह लंकेंत दुमदुमती। रमेश तो अंतःकरण, रमाबंधू तोचि मन, बुद्धि विरिंची चित्त नारायण, रावणें बंदीं घातलीं। मायामृग छेदावया लागून, निरंजनीं प्रवेशे रघुनंदन कापट्य शब्द उठवून, विवेक लक्ष्मण दवडिला । सद्बुद्धि जानकीचें हरण, अहंकारें केलें न लागतां क्षण, अहं देह लंकेंत आणून, दुराचारें कोंडिले। मग धाविन्नला वैराग्य हनुमंत, तेणें देह लंका जाळून समस्त, कामक्रोधादि राक्षसां सहित, अहंलंकानाथ गांजिला। सद्बुद्धीचें करून समाधान, घेऊन आला रघुनंदन, तों सद्भाव बिभीषण, रावणें त्रासिला सभास्थानीं। आत्माराम सद्गुरुपूर्ण, त्यास शरण चालिला बिभीषण, बाविसावे अध्यायी जाण, हेंचि कथन सांगितलें. ' केवढें विस्तृतरूपक ! श्रीधराच्या वाग्रूपी भवानीनें म्हणजे मुरळीनें असा केवढा तरी गोंधळ घातला आहे. श्रीधरस्वामी म्हणतातः 'वक्ता क्षेत्र पिकतें पूर्ण, परी सादरता पाहिजे वरी घन, चित्त व्याकुळता हें अवर्षण, तेणें मोड करपती. ' तेव्हां असें अवर्षण येऊन मोड करपण्यापूर्वीच हें रूपक पुराण संपवितों.

श्रीधरी वाङ्मयांत इतर अलंकारहि पुष्कळ आहेत. एक एक अलंकार अर निवडून काढला तर साहित्यशास्त्रांतल्या कुठल्याहि अलंकाराचीं उदाहरणें यांतून देतां येतील. त्यांतली कांहीं निवडक सांगून या विषयाची रजा घेऊं.

सुवर्णभूमींतील सुवर्ण नाहींसें झाल्यानें आमचा भगिनीवर्ग अलंकारांस नाकें मुरडूं लागला आहे व पौष्टिक अन्न पुरेंसें मिळत नाहीं म्हणून आपलें शब्दधन अलंकारांत वेचणें म्हणजे उधळेपणा-द्राक्षें आंबट, या न्यायानें-ही तक्रार करून आमचा कविवर्गहि अलंकारांपासून पराङ्मुख झाल्यासारखें दाखवीत आहे. अशावेळीं जितक्या थोड्या अलंकारांचें प्रदर्शन करावें तेवढेंच बरें. श्रीधराच्या सुंदर उत्प्रेक्षेचें हें एकच उदाहरण घ्या, रात्र पडलेली पाहून श्रीधर उत्प्रेक्षितात-' निशाप्रवर्तली सबळ, कीं ब्रह्मांड करंडीं भरलें काजळ, कीं विशाळ कृष्णकंबर, मंडप जाण उभारिला. ' अतिशयोक्तीचें अतिशयोक्त उदाहरण ' अत्यंत कृश झाली गोरटी, मुद्रिका घातली मनगटी ' याहून दुसरें कुठेंच सांपडणार नाहीं. रामाच्या व धर्माच्या राज्यांत दंड असेल तर छत्रीस, बंध असेल तर फुलमाळांस आणि मार असेल तर खेळांतल्या सोंगट्यांस ' हें वाचून बाणभट्टांच्या कादंबरीची आठवण कुणास येणार नाहीं? एकावलींत प्रवृत्तीच्या गोष्टी सांगतां सांगतां श्रीधरस्वामी पटदिशी निवृत्तीच्या गोष्टींत कसें शिरतात तें पहा—' आळोआळीं सुंदर मंदिरें, मंदिराप्रति सुवर्ण गोपुरें, गोपुरांप्रति एकसरें, चर्या बहुत झळकती। चर्या प्रति मुक्तहंस,' यावरून श्रीधर एकदम उडी मारतात, ' हंस तेथें परमहंस, परमहंसीं आशापाश, तुटोनि गेले सकळही। निराशा तेथेंच ज्ञान, ज्ञान तेथें समाधान, समाधान तेथें गहन, सुख सर्व वसतसे.' ' थोर विषयीं संसारीं धन, त्याहूनि आगळें अपत्य पूर्ण, त्याहून दारा विशेष जाण, त्याहून आस्था प्राणाची.' हा सार अलंकार. विरोधाभास, प्रतीप, तद्‌गुण, उल्लेख, उदात्त, यथासंख्य, इत्यादींची उदाहरणें न देतां चंद्रालोककारांनीं ज्यास मिथ्याध्यवसिति असें नांव दिलें आहे, त्याचें ' वंध्यासुते द्रव्य आणून, भीष्मकन्या मारुतीस देऊन, गंधर्वनगरीचे वऱ्हाडी आणून, लग्न कोणें लाविलें। वाऱ्याचा मंडप शिवून, सिकता दोरें बांधिला आवळून, शुक्तिका-रजताचे पात्र करून, खपुष्पें कोणी भरियेलें। कासवीचे घालून घृत, मृगजळीचें मीन पाजळती पोत, अचरणी नूपुरें बांधोनि नाचत, जन्मांध पाहत बैसले.' हें उदाहरण देऊन अलंकारांचा जो ' प्रपंच लटिका मुळींहूनि' तो वर्णावा कासया?

अर्थालंकारांइतके जरी नाहीं तरी शब्दालंकारांकडे व त्यांतल्या त्यांत यमकाकडे व अनुप्रासाकडे श्रीधरानें बरेंच लक्ष पुरविलें आहे. या शब्दालंकारांस स्तुतिरूप ओंव्यांत भरतें येतें. उदाहरणार्थ, 'जय जय कमळ नयना कमळावरा, कमळशयना कमळवक्त्रा, कमलनाभा कमळगात्रा, कमळधरा कमळप्रिया', द्रौपदी स्वयंवराचे वेळीं कृष्णानें 'कृष्ण कृपेच्या बळें जाण, कृष्ण आननें शत्रूंचीं करून, कृष्णा वरिली' हें सांगून 'कृष्ण आणि कृष्णद्वैपायन, कृष्णा पांचांसि द्यावया पूर्ण, निश्चय करूं पातले' असें श्रीधर कृष्णावृत्ति यमकाच्या ठेक्यांत सांगतात. विशिष्ट अक्षरानें प्रारंभ असलेले शब्द वापरून श्रीधर अनुप्रास चांगला साधतात. उदाहरणार्थ–'रणरंगधीर रघुवीर, रवि–कुळमंडण राजीव नेत्र, रजनीचरांतक रमणीय गात्र, राजेश्वर रमापति' याप्रमाणें अ, क, म, ज, द, प, भ, म इत्यादि अक्षरांनी आरंभ करून किंवा षट, सप्त, विजय, मंगळ, विश्व इत्यादि संस्कृत शब्द व वेळीं 'चिमणा' यासारखा प्राकृत शब्द घालूनहि श्रीधरांनी अनुप्रास यमकें साधिलीं आहेत. 'सुभानुसंवत्सर, भानुवार, भानुवंशी जन्मला रघुवीर, भानु आणि रोहिणीवर, तोंवरी ग्रंथ असो हा' असेंहि भानुशब्दाच्या आवृत्तीनें म्हणण्यास श्रीधर चुकत नाहीं. श्रीधराची आणखी एक पद्धत अशी आहे कीं ओवीचा चौथा चरण कायम ठेवून वर्णन करावयाचें; असें करतांना पुनरावृत्ति बरोबरच समान कल्पनाहि मांडतां येतात. अशा तऱ्हेनें श्रीधर ध्यानांत ठेवण्यासारख्या कितीतरी गोष्टी सांगतो. 'त्यासी शरण आधीं जावें' म्हणून श्रीधर शरण्यगोष्टींचे वर्णन करितो, तर 'हेंचि लक्षण शिष्याचें' म्हणून शिष्यलक्षणें सांगतो. त्याप्रमाणें 'त्याची संगति न धरावी'; 'तरी जितचि आम्ही मेलो;' 'तो पुत्र धन्य संसारी' तर 'त्याच्या भारें दुःखी धरा;' 'तेथें विकल्प बाधेना' आणि 'विकल्प येऊन राहे जेथें'; 'अल्पायुषी तो साच'; 'त्यासी अवश्य दंडावें'; 'यासिसं देह नाहीच'; 'तरी तो शंकर निर्धारें' इत्यादि सांगतो व 'पूर्व पुण्यें पाविजे' या सदराखालीं अनेक ओव्यांत एक ओवी अशी देतो कीं 'कविता रसिक आणि साहित्य परम श्रोता प्रज्ञावंत आणि सप्रेम, सुपंथ आणि सुसमागम,'' पूर्वपूण्यें पाविजे.' आज मला तरी या ओवीचा पूर्ण अनुभव येत आहे.

श्रीधरस्वामींची आणखी एक लकब आहे आणि ती म्हणजे वाचकांस किंवा श्रोत्यांस मधूनच विचार करावयास लावणें. याचे दोन प्रकार आहेत. पैकीं पहिला म्हणजे नुसता संख्यावाचक शद्ब देऊन त्या संख्येनें प्रसिद्ध असलेल्या गोष्टी सुचविणें. एकच उदाहरण देतों. ' जयजय अनंत ब्रह्मांड-नायका, चतुराननाचिया जनका, चौघांसीहि नव्हे आवांका, तुझें स्वरुप वर्णावया ' येथें चौघे म्हणजे चारी वेद समजावयाचें. पण आतां पुढें चला. ' साहिजणें वेडीं होती, अठरांची खुंटली गति, चौघीजणी तटस्थ पाहती, स्वरुप स्थिति न वर्णवे। पांचा नुरेची ठाव, चारी सहजीच झालीं वाव, चौदा जणींची ठेव, नचले स्वरूप वर्णावया। शिणल्या बहुत चौसष्टी, आठ-जणी बहुत कष्टी, अकराहि हिंपुटी, स्वरूप तुझें वर्णिता। आणीक एक बारा देखण्या, सोळा जणीं चतुर शहाण्या, आणि चौघी-डोळे मोडण्या, लाजो-निया तटस्थ। पंचविसा जाहली वाव, तिघांचे नुरेची नांव, दोन्ही म्हणणें भाव विरले,' विचार करणाऱ्यांस व टीका करणारांस भरपूर वाव आहे की नाहीं? कधीं कधीं हीच प्रक्रिया उलटून केलेली दिसते-जसें ' सप्तबाणें इंद्रजितें, खिळिलें राम सौमित्रातें, पुराणसंख्या बाणीं अर्कजातें, विंधोनि भूमी पाडिले' येथें पुराणसंख्या म्हणजे अठरा समजावयाचे. याचप्रमाणें शास्त्र, रवि, चंद्र-कला, सागर, स्कंदमुख, ऋत्वर्थ दिवस, संवत्सर, कला, विद्या, रुद्रनेत्र, युग, अवतार, बाण इत्यादि शद्बांचा त्या त्या संख्येसाठीं प्रयोग केला आहे. असेंच एक कूट पत्र विश्वामित्रानें दशरथास लिहिलें आहे. विश्वामित्र लिहतात—

हिमनगजामात सायकासन, भंगूनि विजयी झाला बाण, तेव्हां थरथरिला पूर्ण, आनंदघन रथ स्वामी। गुणें केली बहुत स्तुती, आनंदें यश वर्णी सारथी, जोंवरी रथचक्रें असती, वोहरें नांदोत तोंवरीं'. येथें महिम्न स्तोत्रां-तील वर्णनाधारें बाण म्हणजे विष्णु म्हणजे राम, रथस्वामी म्हणजे भूमि-पति जनक, सारथि म्हणजे ब्रह्मदेव व रथचक्रें म्हणजे चंद्रसूर्य असा अर्थ घ्यावयाचा. गुण शब्दाचा शेष हा अर्थ घेण्यासाठीं ब्रह्माण्डपुराणाकडे धांव घ्यावी लागते. कारण त्याच्याच आधारें या त्रिपुरविजयाचें वर्णन करि-तांना श्रीधरानेंच सांगितलें आहे कीं ' धनुर्ज्या होत भोगीन्द्र'. असलीं कूटें म्हणजे काव्यप्रवाहांतले भोंवरे. पण यांची संख्या अत्यंत मर्यादित असल्यानें

गुणसंनिपातांत एखाद्या दोषाप्रमाणें, चंद्रकिरणांत जसा कलंकानें कालिमा येत नाहीं, तसा हे कालिमा न आणतां लहान मुलाच्या कपाळावर किंवा कपोलावर लाविलेल्या काजळाच्या ठिपक्याप्रमाणें शोभाच देतात. असो.

श्रोत्यांस किंवा वाचकांस दुसरा थोडा अडखळविण्याचा प्रकार म्हणजे पर्यायानें एकादी गोष्ट व्यक्त करणें हा होय. कुंभकर्ण म्हणण्याऐवजीं कुंभाचा पर्याय घट शब्द वापरून घटकर्ण वापरावयाचा. सुग्रीवाऐवजीं सुगल, भूधरा· ऐवजीं धरणधिर, पृथ्वधिर हीं याचींच उदाहरणें. ही समजावयास एवढा कठीण नसतात. पण कुभकर्णाऐवजीं घट-श्रोत्र म्हटलें, मृगजळास रोहिणी-नीर म्हटलें म्हणजे समजावयास थोडी अडचण पडते. नातें लावून तोच शब्द सांगणें हाही पर्यायोक्तीचाच एक प्रकार होय. दशरथास द्विपंचरथ किंवा द्विपंचस्यंदन म्हणणें, या ऐवजीं त्यास अजराजपुत्र किंवा रामास अजपौत्र म्हणणें म्हणजे समजावयास थोडा अडथळा आणल्यासारखें होतें. मंगळभगिनी म्हणजे सीता व मंगळजननी म्हणजे पृथ्वी, हीं दुसऱ्या प्रकारचीं उदाहरणें. हींच प्रक्रिया थोडी वाढविली कीं पाकशासन-शत्रु हें इंद्रजिताचें नांव होतें. जनकाचा कनिष्ठ जांवई म्हटल्यानें लक्ष्मण वाच्य होतो. मंगळजननीकुमरीवर शद्ब रामाचा वाचक होतो व कमलोद्भवसुत हा शद्ब वसिष्ठ किंवा नारद दोन्ही अर्थ सुचवितो. श्रीधरस्वामी कधीं कधीं ओवींची ओवी पर्यायोक्तींत वापरतात. उदाहरणार्थ-जरासंधाच्या नगरांत कृष्णानें यादवांसह युद्ध केलें. यास श्रीधरस्वामी उपमा देतात— 'जैसे पूर्वी श्रावणारिसुतें, जाऊन वैश्रवणबंधुपुरीतें, किंपुरुषांसहित युद्ध तेथें, प्रतापवंतें केले जेवीं' येथें श्रावणारिसुत म्हणजे दशरथपुत्र राम, वैश्रवणबंधु रावण त्याची पुरी म्हणजे लंका व किंपुरुष म्हणजे वानर हा अर्थ समजावयाचा आहे. पुढील ओवींत तर या प्रकाराचा कहर झाला आहे. अश्वमेधपर्व वाचलें असतां यमाचें भय राहत नाहीं हें सांगतांना श्रीधरब्रह्मानंद सांगतात, — "पद्मनाभात्मजजातोभ्दव तत्सुत-सुताचे भय सर्व, न बाधी ऐकतां हें पर्व, ऐसें वचन व्यासाचें" येथें पद्मनाभ म्हणजे विष्णु, त्याचा आत्मज ब्रह्मदेव, त्याचा जात कश्यप, त्यापासून झालेला

मरीचि, तत्सुत सूर्य व त्याचा सुत यम, एवढी वंशावळ ध्यानांत असावी लागते.

श्रीधराच्या पदरचनेंतला आणखी एक विषेश म्हणजे मधून मधून सामासिक शब्दांची पेरणी करणें हा होय. हे साधेहि असतात, जसे श्रीमद्भीमातीरवर विहार, कमलोद्भवतनया, चातुर्यचंपककलिका, सर्गस्थित्यंतकारक इत्यादि. पण कधीं कधीं पर्यायोक्तयुक्त असले म्हणजे हे समजण्यास कठिण जातात. मीनकेतनारिहृदयजीवन म्हणजे मीनकेतन जो मदन त्याचा शत्रू जो शंकर त्यानें हृदयांत प्राणा ऐसे सांठविलेंले, पद्मिनीवल्लभकुलभूषण म्हणजे सूर्यकुलास भूषण भूत, निराळोम्द्‌वनंदन म्हणजे आकाशापासून उत्पन्न झालेल्या वायूचा मुलगा मारुति, दशशतमुखांगशयन म्हणजे सहस्रमुख शेषाच्या अंगावर निजणारा, असे अर्थ समजावयास थोडा वेळ लागतो. यांतच रूपकालंकाराची भर पडली म्हणजे विचारूंच नका. सनकसनंदनचित्तपंजरकीर म्हणजे सनकादि मुनींच्या चित्तरूपीं पिंजऱ्यांत ठेवलेला पोपट, विद्वज्जन मानसमांदुमरत्न म्हणजे विद्वानांच्या चित्तरूपी पेटींतलें रत्न, अंजनीहृदयारविंदभ्रमर म्हणजे अंजनीच्या हृदयकमलाभोवती घिरटया घालणारा भुंगा हीं याची उदाहरणें म्हणून देतां येतील. असले शब्द श्रीधर फक्त स्तुति करतांनाच वापरीत असल्यामुळें त्यांनीं कथौघास अडथळा येत नाहीं एवढें मात्र खरें. उलट वाचतांना मौजच वाटते. उदाहरण म्हणून पुढील गंगास्तुति पहाः— जयजन्हुकुमारी अघसंहारके, भागिरथी विविध—तापमोचके, कमलाभवानीसुखदायके, ज्ञानप्रदे जान्हवि। जलजासनप्रियादोषानिवारिणि, सहास्यवदने काशीतलवाहिनि, सगरकुलतारिणि दुःखहारिणि, शुभकारके शुभसलिलें। जय हिमनगपाषाणमेदिनी, परमसुखदायके देवव्रतजननि, तव चिंतनी दर्शनीं, स्पर्शनीं होती प्राणी पावन ”। आहे कीं नाहीं, डोंगराच्या उंच कड्यावरून धो धो वहात येणारा पण पायापाशीं खळखळ वाहणारा धीर प्रशांत वाक्‌प्रवाह. पण यावरून श्रीधराच्या शब्दभांडारांत असल्या गीर्वाणशब्दाच्या लगडीच आहेत असे मात्र कोणी समजूं नये. या खजीन्यांत पादोदर म्हणजे सर्प, ब्रह्मसूत्र म्हणजे दैव, घूर्णिका म्हणजे दासी.

जलद म्हणजे मेघ नव्हे तर मेल्यानंतर उदक देणारा पुत्र, लेप म्हणजे चित्र, असे उजळा नसलेले संस्कृत शब्दच आहेत असें नाहीं, तर अरुवार म्हणजे कोमल, निमासुर म्हणजे सुंदर, बुंथी म्हणजे पांघरुण, सांचोळ म्हणजे चाहूल, बोहरी म्हणजे नासाडी, कुडी म्हणजे खोटी, रळी म्हणजे हट्ट, वीक म्हणजे तेज, दुरळ म्हणजे कडक, डांग म्हणजे काठी, मुंगा म्हणजे नाकाचा शेंडा, मतळा म्हणजे चूड किंवा मशाल, बई म्हणजे बिळ, गुढार म्हणजे हत्तीवरील अंबारी किंवा हांदा, न्याहो म्हणजे प्रतिशब्द. असले अगदी अस्सल देशज शब्दहि आहेत. यांत पर्णणे, पिरंगणें, सळणें, वोसणें, असले धातुच केवळ नाहींत तर गोफणणें, वाचाळणें, अनुवादणें, पालवणें, संनिपातणें, संग्रहणें, आवाहनणें असें नामधातुहि आहेत. अश्व फेरणे, गंध बहकणें, इत्यादींत उर्दूचा दर्प येतो तर थाक तुटणे, गुंडाळे वळणें, द्वार देणें, पेणें बाहणें, पदर लागणें, यांत शुद्ध मराठी रूप दिसून येतें. घरटीकार म्हणजे गस्त घालणारा शिपाई, बाबरझोटी म्हणजे पाठीवर अस्ताव्यस्त मोकळे सुटलेले केस, तृणवेंटी म्हणजे गवताची विणलेली दोरी, मंडपघसणी म्हणजे सभागृहांतील चिकार गर्दी, लघुचीर म्हणजे हातरुमाल, हे शब्द औचित्य दाखवितात, तर मांसाहारी राक्षसांनी वानरांस 'पालेखाइरे' म्हणणेंत श्रीधराची योजकता दिसून येते. इंग्रजींत जसे निरनिराळ्या कवींनी प्रयुक्त शब्दांचे कोश आहेत तसे मराठींतही ज्ञानेश्वर, तुकाराम, श्रीधर इत्यादिकांचे कोश होणें आवश्यक आहे. श्रीधरांच्या शब्दसंपदेप्रमाणेंच त्यांची ज्ञानसंपदाही फार मोठी आहे. श्रीधराचे पौराणिक ज्ञान तर अफाटच आहे. सामान्य लोकांस माहित नसलेली नुसतीं नांवेंच त्यांनीं कितीतरी दिलीं आहेत. हरिवंशासह सव्वा लक्ष भारत, एकवीस रामायणें व अठरा पुराणें त्यांनी चाळलीं होतीं असें दिसतें व त्याचेच आधारानें त्यांनीं नांवनिशीवार नोंद केली आहे. नारायण विष्णु यापासून तर जनमेजयाचा नातू सुदंत यापर्यंत अठ्ठेचाळीस राजांचीं नांवें तुम्हांस येथें सांपडतील. कंसाच्या दोन बायका—अस्ति व प्राप्ति नांवाच्या होत्या, ही गोष्ट किती लोकांस ठाऊक आहे ! रुक्मिणीच्या आईचें नांव शुद्धिमती होतें व भावांचीं नांवें रुक्मी, रुक्मरथ, रुक्मबाहु, रुक्मकेशी व रुक्ममाली अशीं होती. ही माहिती आपणांस

नवी नाहीं काय ? श्रीधरांनीं यादवांच्या नऊ कुलांचीं व वैद्याच्या नऊ कुलांचीं नांवें निरनिराळीं तपशिलवार दिलीं आहेत. कृष्णाच्या अष्ट नायिकांपैकीं मित्रविंदा ही कृष्णाची आतेबहिण होती. मदनानें रतीशिवाय रुक्मियाच्या लावण्यवल्ली नांवाच्या मुलीशीं लग्न लाविलें होतें. अनिरुद्धाच्याहि पहिल्या बायकोचें नांव जसें उषा होतें, तसें त्याच्या दुसऱ्या बायकोचें नांव पद्माक्षी होतें. ही माहिती मनोरंजक नाहीं असें कोण म्हणेल? रावणाची बायको मंदोदरी सर्वांस ठाऊक आहे, बिभीषणाची स्त्री सरमा म्हणूनहि थोड्यांस माहित असेल, पण कुंभकर्णाच्या पत्नीचें नांव दीर्घज्वाला होतें, हें नवें ज्ञान नाहीं काय? याचप्रमाणें बळीची राणी विंध्यावली आणि जनकाची सुमेधा हीं नांवेंहि आपणांस नवी आहेत. हीं नांवें देण्यांत आपले पांडित्य दाखवावें हा श्रीधराचा हेतु असेल, असें म्हणवत नाहीं; पण ज्या अज्ञ लोकांसाठीं त्यानें हें ग्रंथ लिहिले त्यांनीं संस्कृत ग्रंथ वाचणारांसहि आपल्या या ज्ञानानें थक्क करावें आणि हे ग्रंथ वाचण्याकडे त्यांस आकृष्ट करावे असा हेतु असण्याचा संभव आहे.

श्रीधरी वाङ्मय वाचल्यानें आपल्यास नुसती नवीं नांवेंच समजतील असें कुणी समजूं नये, तर आपल्या ज्ञानांतहि खरोखरच भर पडेल ही खात्री बाळगावी. तत्कालीन पदार्थ कसे असत याचें ज्ञान आपणांस श्रीधरी वाङ्मयानें होईल. सभागृहांत वर चांदवे लावीत, बाजूस घोस सोडीत, खालीं आस्तरणें, वर गाद्या, त्यावरी चादरी, टेकावयास लोड असत. एवढेच नव्हे तर, मधून मधून पानदानें, पिकदानें, व अत्तरांच्या पेट्याहि ठेवीत. ही तत्कालीन माहिती मनोरंजक नाहीं काय ? कुठलेंहि वर्णन करावयाचा प्रसंग आला कीं, श्रीधर शक्य तितका तपशील दिल्याशिवाय रहावयाचाच नाहीं. पंक्तीचें वर्णन आलें कीं मीठ-मिरपुडापासून, भाज्या, कोशिंबिरी, खिरी, निरनिराळे वडे, पुऱ्याचें प्रकार, फेण्या, पापड, कढी, फळें, सद्यस्तप्त लोणकढें तूप व शेवटच्या दध्योदनापर्यंतचें वर्णन वाचून एकादा वाचक ब्राह्मणास जेवण्याशिवाय काय दिसणार असें म्हणेल, तर मात्र तें चुकीचे ठरेल. शस्त्रांचें वर्णन करितांना श्रीधर तुम्हाला खेटक, असि, कुंत, शक्ति, शूल, तोमर, लोहार्गला, खड्ग मुद्गला-

पासून तो अगदीं कोयत्या कांबिठ्यापावेतोंचीं शस्त्रें सांगितल्याशिवाय रहाणार नाहींत. अस्त्रांत अग्नि, पर्जन्य, वायु, पर्वत, वज्र व ब्रह्मास्त्राबरोबर सर्पास्त्र व गरुडास्त्र, कामास्त्र, स्त्र्यस्त्र, मोहनास्त्र, निद्रास्त्र यांचीहि माहिती देईल. पशुपक्ष्यांची व वृक्षांची नांवें, वनाचें वर्णन आलें कीं तपशीलवार आल्याशिवाय रहावयाचींच नाहींत. उदाहरणार्थ-' वट, पिंपळ, औदुंबर, पारिजातक, बकुल, देवदार, कपित्थ, बिल्व, अंजीर, अर्जुब पिचुमंद कदंबते' किंवा 'बदकें, चातक, मयूर, कस्तूरीमृग, जवादिमार्जार, चक्रवाक, नकुळ, मराळ, परिकर. सरोवर तीरीं क्रीडती' अशा ओंव्या पहा. वाद्यांत तत, वितत, धन, सुषिर ही चार वाद्यें श्रीधरस्वामी जशी सांगतील तशी-' राग, उपराग भार्यासहित, मूर्छना शरीर कंपित, सप्तताल अति संगीत, गीत प्रबंध स्वररचना ' ही सांगतील. घरांची रचना आली कीं तोळंबे, खांब, उथाळी, तुळवटे, दांड्या, किलच्या, चर्या, चक्रें, मदलसा, कळस, इत्यादींचें वर्णन तर येईलच, पण त्यांतील पुतळ्या व प्रतिमांची आणि वर दिलेल्या गिलाव्याचीं व फडफडणाऱ्या ध्वजांचीहि माहिती मिळाल्याशिवाय रहावयाची नाहीं. खेळाच्या वर्णनांत चेंडूफळी, वावडी, लपंडाई, भोंवरा, चक्रें, विटीदांडू, हमामा, हुतुतू आणि झोंबी हे खेळ यावयाचेच. घोड्याच्या जाती आणि नांवें, वस्त्रांचे प्रकार, फार काय नुसत्या लुगड्यांचेच द्रौपदीवस्त्रहरणाच्या वेळीं दिलेले प्रकार वाचले म्हणजे श्रीधरस्वामींचें निरीक्षण किती चौकस होतें याची चांगलीच कल्पना येते. श्रीधरी वाङ्मयांतल्या या साऱ्या गोष्टी एकत्र केल्या तर एक छोटासा ज्ञानकोशच होईल.

श्रीधरब्रह्मानंद ज्या गोष्टीचें वर्णन करितात, तिचें हुबेहूब चित्र डोळ्यांपुढें उभें राहतें. हाच तपशील वर्णनाचा विशेषगुण आहे. लहान मुलाचें वर्णन करितांना पिंपळपान, कुंडलें, वाघनख, पदक, जिवती, वाकी, बिंदली, कटी मेखला, पायीं पैंजण, बोटांत चिमण्या मुद्रिका हें वर्णन वाचून कुणाचें डोळ्यापुढें पाळण्यांतल्या लहान मुलाचें चित्र खेळणार नाहीं? श्रीधरस्वामी सुंदर स्त्रीचें वर्णन करूं लागले कीं प्रथम अंगाचा सुवास वर्णन करतील. मग तेजःपुंज वर्ण, चमकदार डोळे, स्वच्छ दांत, आरक्त अधर, सरळ नाक, विशाल भाळ, धनुष्याकृति भुंवया, प्रौढ वक्षःस्थल, कृशकटि, सरळ जंघा व आरक्त

तळवे सांगतील. नंतर झगझगीत वस्त्र व जडावाचें काम केलेली कंचुकी वर्णून केसांची वेणी, शिरीं जाळी, शिसफूल, राखडी, चंद्र, मूद, कपाळीं बिजवरा, कस्तूरी किंवा कुंकुमाचा तिलक; नेत्रीं सोगयाचें अंजन, नाकांत मुक्त, कानांत ताटक व घोंसबाळ्या, गळ्यांत गळसरी, एकावली, हार, दंडावर वाकी, मनगटांवर कंकणें, बोटांत अंगठी, कमरेला कमरपट्टा किंवा घागऱ्या लावलेली मेखला, पायांत तोरड्या व नूपुरें अशा अलंकारांचे वर्णन करितील. नाकांतलें मोती गळ्यांत अडकवावयाचे व नंतर तें विसरून शोधूं लागावयाचें, या भोळ्या किंवा विसरभोळ्या गोष्टीचें वर्णन श्रीधरानें अनेक वेळां केलें आहे. राजाच्या स्वारीचें वर्णन आलें कीं पुढें भेरी निशाण, मागून गजस्कंधावर बंदी जनांनी चालविलेलें बिरुद वर्णन, कनक वेत्रधारी लोकांचे पुढें चालणें व मार्ग करणें, मग शिबिकेंत मुख्य स्वारी, सभोंवती छत्र्या, अबदागिरी, कुंचे, चामेंर असा थाट असावयाचाच. हीं सारीं वर्णनें वाचलीं म्हणजे समृद्ध महाराष्ट्राचें आणि मराठी राज्यवैभवाचें स्मरण होऊन कुणाचें शरीर आनंदानें शहारल्याशिवाय राहील ?

तत्कालीन लोकस्थितीवरहि श्रीधरी वाङ्मय वाचल्यानें बराच प्रकाश पडतो. धार्मिक चालीरीति पाहिल्या तर जातकर्मापासून मृतकर्मापर्यंतच्या चालींचें वर्णन कुठल्याना कुठल्यातरी प्रसंगानें श्रीधरस्वामींनीं केलेंच आहे. पुत्रमुख पाहण्यापूर्वी पुण्याहवाचन करणें, मुलांस मध घालणें, जातक ब्राह्मणाकडून वर्तविणें, जुळी मुलें झाल्यास 'प्रथम उपजे तो धाकुटा केवळ, मागुती उपजे तो वडील' असें ठरविणें, मुलास दृष्ट लागली तर पायाची माती कपाळी लावणें, निंबलोण उतरणें, मूद ओवाळून टाकणें, गळ्यांत काळा दोरा बांधणें, गांठींत रिठे बांधणें इत्यादि गोष्टी वाचावयास सांपडतात. उपनयनाचें विस्तृत वर्णन न आढळलें तरी लग्नविधि अत्यंत तपशीलवार दिलेला आढळतो. मुलींचे चित्र प्रथम वरपक्षास कधीं कधीं दाखवीत व मग पत्रिका पाहून लग्न ठरवीत. देवकस्थापना, सीमांत पूजन, उष्टी हळद, घटिका घालणें, रुखवत, वरानें उष्ट्या ताटांत अंगठी टाकणें, ती नवरीस नेऊन देणें, तेलफळ, वधुपूजन, मूळ पाठविणें, घोड्यावरून वरात आणणें, त्यापुढें दारुकाम सोडणें, दाराशी मूद ओवाळणें व कलश भरलेल्या दासींनी पाया-

वर पाणी टाकलें कीं त्यांचा सत्कार करणें, इत्यादि व्यावहारिक गोष्टी सांगण्यासहि श्रीधरस्वामी चुकत नाहींत. पुढें मधुपर्क, अंतःपट; सावधान झाल्यावर अक्षतारोपण, कंकणबंधन, विवाह होम हा सूत्रोक्त विधि, पण पदरास गांठ बांधून वरानें कडेवरून नोवरी बोहल्यावर न्यावयाची हें सांगण्यास सुद्धां श्रीधर विसरत नाहींत. सुनमुखाचे वेळीं विहिणीस नेणें, नांवें घेणें या गोष्टी सांगून वर श्रीधरानें हळदीउटण्याचे वेळीं सुभद्रा बहिण व रेवती वहिनी यांजकडून श्रीकृष्णास असेंहि थट्टेनें सांगितलें आहे कीं, 'भीमकीच्या कंचुकीची गांठी, एकहस्तें सोडी जगजेठी, नाहीं तरी नमस्कार उठाउठी, करावा लागेल नोवरीतें,' पुढें साडे, घेंडा नाचविणें झाल्यावर वरातीचें वर्णन करून गृहप्रवेशानें हा सोहोळा संपविला आहे. आमच्यासारख्या या साऱ्या सोहोळ्यांतून पार पडलेल्या म्हाताऱ्यांपेक्षां आधुनिक वधूवरांनीं हें वर्णन अवश्य वाचावें अशी माझी त्यांस शिफारस आहे. या गोष्टी वाचून मनन केल्या तर त्यांस या चालींच्या बुडाशीं काय तत्त्वें होतीं त्यांचें आकलन होऊन त्यांस आपलें वैवाहिक जीवन अधिक सौख्यप्रद करून घेतां येईल. आजकाल यांत्रिक जीवनांत हीं तत्वें अमलांत आणिलीं-या गोष्टी नव्हे-तर आपल्या रुक्ष जीवनांत अधिक आनंदरस ओततां येईल असें मला वाटतें. अस्तु. स्त्रियांस कडक पडदा नसला तरी त्या अगदीं मोकळ्या फिरत नसत असें दिसतें. सभास्थानीं त्यांच्यापुढें जाळ्याचे पडदे लावीत. पालखींतून जातांना त्या पालखीसही पडदे लाविलेले असत. पण कधीं कधीं त्या घोड्यावरून उघड्या म्हणजे पडदा न वापरतांहि जात. श्रीधरानें श्रीरामाच्या तोंडून असा सिद्धांत वदविलेला आहे कीं, 'जवळीं असतां प्राणनाथ, स्त्री उघडी सर्व जनांत, वागतां दोष यथार्थ, सर्वथा नाहीं.' पति मेल्यानंतर स्त्रिया क्वचित् सती जात. क्वचित् त्यांचें शिरोवपनही केलें जाई. मरणाचे वेळीं मुलानें मांडी देणें, चितेंत सुगंधि द्रव्यें घालणें, अस्थि संचय तीर्थांत नेऊन टाकणें, कावळ्यानें पिंडास स्पर्श करणें इत्यादि गोष्टींचा उल्लेखहि श्रीधरानें केला आहे. सारांश, या वाङ्मयावरून तत्कालीन सामाजिक चालीरीतींची स्पष्ट कल्पना येते.

चालीरीतीप्रमाणेंच सामाजिक कल्पनांचेंहि ज्ञान श्रीधराच्या वाङ्मयावरून समजतें. अस्पृश्यता समाजांत चांगलीच वावरत होती असें दिसतें. ब्राह्मणांच्या दांभिकपणावर जरी श्रीधरानें तडाखे उडविले आहेत, त्यांच्या सोवळ्याची जरी चेष्टा उडविली आहे, तरी पण 'जैसा वसुधामरांच्या देव्हारा, प्रवेश नव्हे अतिशूद्रा' हें उपमान देऊन या चालींचें वर्णनच केलें आहे. धर्मपत्नीशिवाय दासी ठेवण्याचा प्रकार बराच रूढ होता असें ठिकठिकाणीं आलेल्या उल्लेखांवरून अनुमान काढतां येतें. स्त्रिया किंवा मुलीमुलें भ्रष्टविलीं जात व भ्रष्टविलीं गेल्यावर त्यांवर बहिष्कार टाकला जाई. अपराधी लोकांची धिंड गाढवावरून काढली जाई व क्वचित् नाककान कापण्याचीहि शिक्षा त्यांस दिली जाई. राजा नसला कीं राजवाड्यावरील कळस काढून ठेवीत व राजा आला कीं तो चढविला जाई. गोरक्षणाकरितां प्राण वेंचण्याचीहि पाळी येत असे. आणि असें 'अचाट कार्य अद्भुत, करूनि आला जो भृत्य, वेतना वेगळें अपरिमित, द्रव्य वस्त्र' त्यांस दिलें जात असे. व्यापारी लोकांनीं 'पर खंडींच्या वस्तु अद्भुत' आणिल्या व त्या 'न विकती तरी समस्त, द्रव्य देऊन' घेण्याचा राजाचा प्रघात असे. विद्वान आले तर त्यांस योग्य 'देशावर' देऊन सन्मानपूर्वक त्यांस स्वदेशी पाठविलें जाई. राजा, राजपुत्र इत्यादींचा सर्व धनावर अधिकार न राहतां त्यांस स्वतंत्र द्रव्य तोडून दिलेलें असे. 'राजा आणि भणंगदीन, सर्वांस अन्न समान, हें मुख्य प्रभूचें लक्षण,' आदर्श म्हणून मानलें जात असे.

श्रीधरानें याप्रमाणें वर्णन केलेल्या वस्तुस्थितीचा व आदर्श स्थितीचा विचार केल्यानंतर श्रीधरी वाङ्मयांतील रसाचा थोडा विचार करूं व त्यानें प्रतिपादिलेले कांहीं सिद्धांत पाहून हा श्रीधरी वाङ्मयाचा संक्षिप्त विचार पुरा करूं. श्रीधराच्या ग्रंथांतून जो क्वचितस्थळीं शृंगार आला आहे त्याचें कारण श्रीधरानें स्पष्ट सांगितलें आहे. 'जेव्हां विषयपर जन, न ऐकती हरीचे गुण, त्यांस शृंगाररस देऊन, वेधावें मन हा हेतु' उत्तान शृंगार ज्याला म्हणतात तो किंवा महाराष्ट्र सारस्वतकारानें ज्यांस 'अनाठायीं

'शृंगार' म्हणून म्हटलें आहे तो मला तरी कोठें दिसत नाहीं. या बाबतींत महाराष्ट्र सारस्वतकारानें श्रीधरस्वामींच्या बाबतींत मोठाच अन्याय केला आहे. ज्या अबलाजनांसाठीं श्रीधरानें हे ग्रंथ लिहिले, त्यांच्यापुढें वाचतांना लाज वाटेल असा एकहि प्रसंग श्रीधरी वाङ्मयांत नाहीं. श्रीधराचें वाङ्मय ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम यांच्या वाङ्मयाप्रमाणें अगदी सोवळें नाहीं खास; पण त्याचें कारण तें नुसत्या भगवद्भक्तांसाठीं लिहिलें नसून सांसारिक लोकांसाठीं लिहिलें गेलें आहे. अर्थात् हें आपल्या आपल्या अश्लीलतेच्या कल्पनेवर अवलंबून असणार. पण सामान्य स्त्रीपुरुषांना ज्यांपासून आनंद होईल, क्वचित् थोड्या गुदगुदल्या होतील याहून अधिक शृंगार यांत नाहीं हे खास. कांहीं असलें तरी श्रीधरी वाङ्मयाचा स्थायी रस शृंगार नसून वीर आहे. शृंगारविषयक आनंद उत्पन्न करणाऱ्या प्रसंगापेक्षां यांत असेच प्रसंग अधिक आहेत कीं, ज्यांनी वीरश्री उत्पन्न व्हावी व हात फुरफुरूं लागावे. अनुक्रमच लावावयाचा तर वीराच्या खालोखाल यांत करुण रस आहे, मग हास्य व मग शृंगार. अक्रूर कृष्णास घेऊन जात असतां गोकुळच्या लोकांनी केलेला शोक, प्रतापांतील स्त्री-पर्वांतला शोक आणि हरिश्चंद्र व श्रियाळ राजांच्या कथा वाचीत असतांना सहृदय वाचकांच्या डोळ्यांतून पाणी ढळल्याशिवाय रहात नाहीं. हास्याचें एकच उदाहरण देतों. महाबळ नांवाचा दैत्य ब्राह्मण होऊन कृष्णाचे जातक वर्तविण्यास गेला व नंदयशोदेचा सत्कार घेऊन पंचांग पाहून कृष्ण मूळ नक्षत्रावर जन्मल्यामुळें त्यांस टाकून द्यावें, असें त्यानें सांगितलें. 'बाहेर टाकावा बाळ, ऐसें बोलता महाबळ, तो दह्याचें मडकें सबळ, कपाळावरीं आदळलें। बोलतो उत्तरें अमंगळें, म्हणोनि लाटणें आवेशलें, मुखांमाजि उभेंचि शिरलें, कपटियाच्या तेधवां। पाटचौक्या पहारा अर्गळा, घण कुदळी कुऱ्हाडी संबळा, गोवऱ्यांसी जीव आला, पक्ष्यांसारख्या धांवती। होती मुसळांचे मार, धोतर फिटोनि गेले समग्र, पंचांग फाटोनि झालें चूर, जानवें गेलें तुटोनि.' अद्भुत व हास्य यांचा किती छान संगम आहे हा. इतर रसांचीं उदाहरणें देत बसलों तर पाल्हाळ होईल. पण शितावरून भाताची परीक्षा करण्यास हें पुरें आहे.

श्रीधरस्वामींच्या ग्रंथरचनेचा हेतु मी मागें सांगितलाच आहे. संसारांतील विषयांत आसक्त असलेल्या लोकांनीं संसार सोडून निवळ ज्ञानमार्गाकडे किंवा केवळ भक्तिमार्गाकडे न वळतां वर्णाश्रमविहित कर्ममार्गाकडे वळावें व सन्मार्गानें आचरण करून इहपरलोकीं सुख मिळवावें हा मुख्य हेतु. यासाठीं श्रीधरस्वामींनी मुख्य सिद्धान्त काय सांगितले ते थोडक्यांत पाहूं. सर्वांत मुख्य सिद्धांत मी आरंभीच सांगितला आहे 'जों कायेत असे प्राण, तों न सोडावी आंगवण', 'जय अथवा पराजय' महावीरासी पडे हा समय, पुरुषें पुरुषार्थ सांडूं नये, करावा उपाय मागुती.' दुसरा सिद्धान्त — 'शत्रु दंदशूक कृशान, हे सर्वथा न म्हणजे लहान, 'सहनशील आणि सत्य, तेणें विश्व जिंकले समस्त' हा सिद्धांत प्रस्थापित करण्यासच पांडवप्रतापाची रचना झाली आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. करण्यापेक्षां बोलण्याकडे व त्यांतकटु बोलण्याकडे–आम्हां महाराष्ट्राचा ओढा. त्यांस श्रीधर सांगतात— 'ओखटें बोलता उत्तर, तुटे बहु काळीचा मित्र'. 'तसेंच हीन नराशी उत्तर देतां, येत हीनता श्रेष्ठांस', निरनिराळ्या देवतांचे पंथ हिंदु धर्मात फार. ते मोडण्यास जसें देवता-पंचायतनाचें पूजन आचार्यांनीं सुरू केलें, त्याप्रमाणें शिव-विष्णू पंथ श्रीधराच्या काळीं बरेच प्रबल होते. त्यांत ऐक्य स्थापणें हा श्रीधराच्या ग्रंथरचनेचा एक गौण हेतु होता. आणि म्हणूनच 'ते एक असती दोघेजण, शिव-विष्णु नामेंची भिन्न, अभेद अनाम निर्गुण, तेथीचे कोंभ असती हे' या सिद्धांतांनीच त्याकाळचा महाराष्ट्र पुढें आला व याच सिद्धांतांनीं तो आजही पुढें येईल.

श्रीधरस्वामीच्या ग्रंथांचा अल्पसा परिचय मला देतां आला तेवढा मी दिला आहे. या संत कवीच्या वाङ्मयाचा अभ्यास फार थोड्या विद्वानांनीं केला आहे. नव्हे आजपर्यंत या कवीच्या वाङ्मयाची थोडी फार उपेक्षाच झाली आहे. या वाङ्मयाचा किती सूक्ष्म व किती दृष्टींनीं अभ्यास करावयास पाहिजे याचे नुसतें दिग्दर्शनच मला करतां आलें आहे. पण तरीहि आपण सर्वांनीं यास मानाचें पान दिल्याबद्दल मी आपलें अंतःकरणपूर्वक आभार मानतों. या दिग्दर्शनानें जर आपणापैकीं कांहींस हें वाङ्मय

वाचण्याची स्फूर्ति झाली तरी मी आपणांस कृतार्थ मानीन. शेवटीं ही श्रीधराची सेवा त्या श्रीधरब्रह्मानंदांच्याच चरणीं अर्पण करून त्यांस असें विनवितों कीं—

भक्तीनें गुण वानितां मम जरी ही थांबली लेखनी
जाणा ते श्रम वा, न शक्ति अथवा, ना रिक्त झाली खनी।

---

# श्री समर्थांची वाङ्मयगंगा

श्री. ज. स. करंदीकर

श्री समर्थांच्या वाङ्मयाचा परिचय नव्यानें करून देण्याचें कारण नाहीं; समर्थांचें समग्र वाङ्मय तितकेसें परिचित नसलें तरी 'मनाचे श्लोक', 'भीमरुपी स्तोत्रें' 'करुणाष्टकें,' 'दासबोध' आणि 'रामायण' इतकी कविता तरी महाराष्ट्रास सुपरिचित आहे. त्यांतूनहि अलीकडे वर्षानुवर्षे प्रसिद्ध होणाऱ्या रामदास-रामदासी या मासिकांतून आणि समर्थ वाग्देवता मंदिरामार्फत प्रकाशल्या जाणाऱ्या सुमनहारांतून समर्थांच्या काव्यसृष्टीवर नित्य नवा नवा प्रकाश पडत आहे. शिवाय अगदीं अलीकडे समर्थभक्त नानासाहेब देव यांनीं प्रसिद्ध केलेल्या "समर्थहृदय" या ग्रंथानें समर्थांची काव्यसृष्टि सर्वांस सुपरिचित करून सोडली आहे. त्याशिवाय प्राध्यापक शं. गो. तुळपुळे यांनी प्रसिद्ध केलेल्या "पांच संत कवि" या ग्रंथानें तर ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम व रामदास या कविपंचकांच्या काव्यांची महाराष्ट्र वाचकांस पुरेपूर ओळख करून दिली आहे. तथापि स्वतः समर्थांनीच आपल्या ग्रंथांत 'बोलिलेचि बोलावें,' 'विवरलेलेचि विवरावे' असा दण्डक घालून दिल्यानें ही चर्चा समर्थांना अमान्य न होतां, संमतच होईल.

त्यांतूनहि 'मूर्ती तितक्या प्रकृति' या न्यायाने समर्थांकडे आणि त्यांच्या वाङ्मयाकडे पाहण्याची प्रत्येकाची दृष्टि थोडी तरी वेगवेगळी असल्यानें, या 'वाङ्मय-परिचया'ला पुनरुक्तीचा दोष न लागतां, उलट प्रत्येक विवेचनांतून कांहींना कांहींतरी नवें ऐकावयास व पाहावयास मिळेल. आपणास या ठिकाणीं समर्थांच्या समग्र चरित्राचा आढावा घ्यावयाचा नसून, केवळ त्यांच्या वाङ्मयाचाच तेवढा परिचय करून

घ्यावयाचा आहे, त्यामुळें पुष्कळसे वादग्रस्त प्रश्न आपोआपच टळतात. तथापि, समर्थांचें आपल्या आयुष्यांतील जगदोद्धाराचें ध्येय आणि त्यांच्या हृदयांतून प्रगट झालेली वाङ्मयगंगा या उभयतांचा अविभाज्य संबंध असल्यानें समर्थांच्या ध्येयाची यथार्थ कल्पना दृष्टीसमोर ठेवल्याखेरीज त्यांच्या काव्यांतील कित्येक गूढ विचार नीटसे उकलत नाहींत. यास्तव त्या संबंधानेंहि जरूरीपुरता उल्लेख करणें आवश्यक आहे.

समर्थ हे श्रीरामाचे परमभक्त होते, रामभक्तीच्या सांप्रदायाचे ते प्रवर्तक होते, भवसागरांतून स्वतः तरून जातांना इतरांना तारण्यालाहि ते बद्धपरिकर होते आणि याच दुहेरी हेतूनें त्यांनी आपली ग्रंथरचना केली. ही सगळी ग्रंथरचना निवृत्तिमार्गाची–मोक्षसाधनाची झाली; पण रामदास जसे रामभक्त होते तसेच ते राष्ट्रभक्तहि होते. त्यांना जशी पारमार्थिक मुक्तीची तळमळ लागली होती, तशीच राष्ट्राच्या मुक्तीची, म्हणजे स्वातंत्र्याची तळमळ लागून राहिली होती. समाजांतील धर्माची घडी बिघडली होती ती नीट चापूनचोपून बसविण्याकरितां धर्मस्थापनेची जरूरी होती; पण स्वराज्याचा आधार असल्याशिवाय स्वधर्मस्थापना होणार कशी व झाली तरी टिकणार कशी? यास्तव त्यांना स्वराज्यस्थापना झालेली पाहण्याची अत्युत्कंठा लागून राहिली होती. सारांश, ते जसे धर्म कारणांत सांप्रदाय गुरु झाले तसेंच ते राजकारणांत राष्ट्रगुरु झाले. अर्थातच त्यांच्या वाङ्मयांत धर्मोद्धाराचा जसा उपदेश आहे, तसाच राष्ट्रोद्धाराचाहि उपदेश आहे. कांहीं प्रकरणांतून हे उपदेश अगदीं अलग अलग आहेत तर कांहीं ठिकाणीं त्या दोहोंचा प्रीतिसंगम झालेला दिसून येतो. मुख्यतः त्यांच्या ‘ दासबोध ’ या ग्रंथराजांत हें एकीकरण इतकें बेमालूम झालें आहे कीं, प्रयोगक्षेत्रांतील गंगायमुनांच्या संगमानंतरच्या प्रवाहांत केवळ गंगेचें अथवा केवळ यमुनेचें पाणी काढून घेऊं म्हटल्यास तें जसें अशक्य होतें, तसेंच दासबोधाच्या उत्तरार्धांतून केवळ राजकारणीं दशक अगर केवळ परमार्थपर दशक वेगळे काढूं म्हटल्यास तेंहि अशक्य असल्याची प्रचीति येते.

या लेखांत समर्थांच्या वाङ्मयाचाच तेवढा परिचय करून द्यावयाचा उद्देश असल्यानें, त्यांच्या राजकारणविषयक भानगडींत गुरफटून जावयाचें नाहीं असें ठरविलें असलें तरी त्यांच्या वाङ्मयाचा यथार्थ परिचय होण्यास समर्थांच्या राजकारणविषयक तळमळीचा ठाव घेतल्याशिवाय कांहीं प्रकरणांचा नीट खुलासा होत नसल्यानें, त्यांच्या लिखाणांतील मर्म यथार्थतेनें जाणण्यासाठीं, ही उभयविध दृष्टि शाबूत ठेवावी लागते. या विधानाचें अधिक स्पष्टीकरण होण्याकरितां तीन उदाहरणें घेऊं :

पंचवटीच्या रामोपासकांस पत्र.

**॥ तुम्हीं निकट देवापासी । मी पडिलों दुरीं देशीं ॥**
**॥ कृपाळुपणें रघुनाथासी । माझी करुणा भाकावी ॥**
**॥ पुढें म्यां ऐसेंचि असावें । माझें मन न पालटावें ॥**
**॥ इतुकें देवासी मागावें । तुम्ही बंधुवर्गी ॥**

या पत्रांत एकंदर १२ ओव्या आहेत. त्यांतल्या दोन महत्त्वाच्या म्हणून निवडून वर दिल्या आहेत. या दोन ओव्यांचा अर्थ संपूर्णपणें मनांत बाणण्यांस कितीतरी इतिहास लक्षांत घ्यावा लागतो. रामाच्या भक्तीची जर समर्थांना एवढी तळमळ होती, तर ते आपल्यासाठीं रामाजवळ रदबदली करण्यास इतर उपासकास कां विनवितात? ‘ मी पडिलों दूरी देशीं ’ असें म्हणून परवशतेचे उद्गार त्याच्या तोंडून कां निघतात? त्यांना ‘ दूरी देशी ’ कोणी पाठविलें आणि परत पंचवटाला जाऊन अहोरात्र रामाची सेवा करण्याला कोणी प्रतिबंध केला होता? अर्थातच कांहीं विशिष्ट उच्च हेतु धरूनच ते कृष्णातीरीं आले होते, तें कार्य पंचवटीला राहून साधणार नव्हतें, कृष्णातीरच त्या कार्यसिद्धीला अनुकूल होतें. इतका खोल अर्थ यांतून निघत नाहीं काय?

आतां याच पत्रांतली दुसरी ओवी घेऊं तींत ते प्रार्थना करतात कीं, ‘ पुढें म्यां ऐसेचि असावें ’ म्हणजे राघवाचा अनन्य सेवकच रहावें. या ध्येयापासून ‘ माझें मन न पालटावें, ’ ‘ इतुकें देवासीं मागावें, तुम्ही बंधुवर्गी ’ यांतहि पुनः बंधुवर्ग जे पंचवटींतले उपासक त्यांनाच देवाजवळ

वकिली करण्याविषयीं विनंती केली आहे. विनंती काय, तर ' माझें मन न पालटावें !' बारा वर्षे पुरश्चरण करून श्रीरामाचा साक्षात्कार करून घेतल्यानंतर आणि बारा वर्षे तीर्थाटन करून वैराग्य व भक्ति दृढ केल्यानंतर आतां कृष्णातिरीला येऊन राहिल्यावर 'मन पालटण्याची' राघवाची भक्ति ओहोटीला लागण्याची शंका समर्थांना कां आली? रामभक्तीला अवसर न मिळेल अशा कोणत्या तरी राष्ट्रकार्यांत व्यग्र झाल्याखेरीज असें उद्गार त्यांच्या तोंडून का निघावें? आणि तो व्यापहि सामान्य नसून मोहजाल पाडणारा प्रबळ व्याप असला पाहिजे. राजकारणांत पडून शिवाजी महाराजांसारखे शिष्य होऊं लागले व महती वाढत चालली, आणि ' अवसर मिळेना जेवायला ' इतकी उपाधि वाढली असल्याशिवाय त्यांना अशी शंका कशी येईल? सांगण्याचा मतलब हाच कीं, समर्थांच्या हातच्या एका साध्या बारा ओव्यांच्या पत्रांतील भाव नीटपणें मनांत उतरावयास समर्थांचा सर्व चरित्र ग्रंथ डोळ्यासमोर उभा राहावा लागतो, तर मग समर्थांच्या समग्र ग्रंथांचा उलगडा समर्थांचें राजकारण बाजूस सारून कसा करतां येईल?

## शिवाजी महाराजांस पत्र.

दुसरें उदाहरण शिवाजी महाराजास लिहिलेलें छोटेसें ओवीबद्ध पत्र. ' निश्चयाचा महामेरु ' या गौरवयुक्त शब्दांनीं प्रारंभ असलेलें हें पत्र सर्व प्रसिद्ध आहे. पण या पत्रांतील संपूर्ण आशय केवळ तेवढ्या ओव्या वाचून ध्यानांत येऊं शकेल काय ? समर्थांनीं शिवाजी राजास हें पत्र कां लिहिलें? ही एक प्रकारें आगांतुकी कां केली? आणि प्रसंग नसतां ही आगांतुकी आपण करीत आहों असें त्यांचें त्यासच वाटूं लागल्यामुळें त्यांनीं शेवटीं ' प्रसंग नसतां लिहिलें। क्षमा केली पाहिजे ' अशी क्षमेची याचना कां केली? क्षमेची याचना करण्यापेक्षां पत्र लिहिण्याचेंच टाळलें असतें तर काय बिघडलें असतें? त्यांच्या डोकीवर ही कोणी गोणी दिली होती?

समर्थांसारख्या निस्पृह योग्यावर सक्ति अन्य कोण करूं शकेल? हृदयस्थ नारायणाच्या प्रेरणेशिवाय इतर कोणाची सक्ति चालणार? अर्थांतच धर्मरक्षणार्थ स्वराज्यस्थापना झाली पाहिजे आणि अशी स्वराज्यस्थापना,

'या भूमंडळाच्या ठायीं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ॥ महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं । तुम्हाकरितां'

अशा योग्यतेच्या शिवरायाशिवाय अन्य कोणीच पात्र नाहीं हें पाहून आणि त्याचबरोबर 'राजकारण उदंड दाटले। तेणें चित्त विभागलें' अशी दोलाचल चित्तवृत्ति झालेली पाहून समर्थांनी शिवाजी महाराजांना हें पत्र लिहिलें. या पत्राच्या पाठीमागची ही सर्व भूमिका लक्षांत घेतल्याशिवाय या पत्राचा संदर्भ सांगता येईल काय ?

तिसरें उदाहरण–तुळजामातेला केलेल्या प्रार्थनेचे. समर्थ प्रार्थना काय करतात–तर,

"तुझा तूं वाढवी राजा शीघ्र आम्हांचि देखतां;"
"रामदास म्हणे माझें सर्व आतुर बोलणें।
क्षमावे तुळजे माते इच्छा पूर्णाचि ते करीं"

यांतहि पुनश्च क्षमा मागण्याची पाळी आली, तरीसुद्धां त्याची फिकीर न करितां समर्थ आपला आग्रह सोडीत नाहींत. शिवरायाच्या उत्कर्षाविषयीं इतकी आतुरता आणि हेंच 'एकचि मागणें' मागण्याची तळमळ राजकारणाशी संबंध असल्याशिवाय असूं शकेल काय ?

सारांश, समर्थांचें वाङ्मय संपूर्णपणें समजण्यास व उमजण्यास त्यांचें राजकारणांतले धागेदोरेहि कळले पाहिजेत.

समर्थांच्या वाङ्मयाचा परिचय करून देण्याला एवढी लांबलचक प्रस्तावना कशाला, असें कोणासहि वाटेल. परंतु समर्थांचें वाङ्मय आणि त्यांचे राजकारण यांची ताडातोड केल्यास त्यांचें राजकारण तर कळणार नाहींच, पण त्यांच्या वाङ्मयांतलाहि पुष्कळसा महत्त्वाचा भाग नीट उकलतां येणार नाहीं. हा अन्योन्य संबंध ध्यानांत ठेवून आतां आपण समर्थांच्या वाङ्मयाचा प्रथम आढावा घेऊं आणि त्यानंतर त्या वाङ्मयाचें मूल्यमापन करूं.

श्री रामदास स्वामींची वाङ्मय-गंगा ही गंगेच्या प्रवाहासारखीच प्रदीर्घ, अगाध आणि पावन करणारी आहे. जगन्नाथ पंडितानें गंगालहरींत जें

गंगेचें महात्म्य वर्णिलें तें केवळ अर्थवादपर आहे. परंतु समर्थांच्या वाङ्मय गंगेला तें वर्णन यथार्थतेनें तंतोतंत लागू पडतें कीं नाहीं तें आपणच पाहा.

दरिद्राणां दैन्यं दुरितमय दुर्वासनहृदां ।
॥ द्रुतं दूरीकुर्वन् सकृदुपगतो दृष्टिसरणीम् ॥
॥ अविद्यागाविद्युद्रुमदलनदीक्षागुरुरिह ।
॥ प्रवाहस्ते वारां (वाचां) श्रियमयमपारां दिशतुनः ॥

वरील श्लोकांत 'वारां प्रवाहः' याच्या ऐवजीं 'वाचां प्रवाहः' एवढा बदल केला कीं, समर्थांच्या वाङ्मय-गंगेचें तें यथार्थ वर्णन होऊं शकतें.

समर्थांची कविता दळभद्र्यांचें, करंट्यांचें, दैन्य दूर करून त्यांना सदैव करून सोडते; ज्यांच्या हृदयांत दुष्टवासनांचें काहूर माजलें असेल त्यांच्या त्या दुष्ट वासना झाडून टाकून, त्यांना दुष्कृत्यांपासून परावृत्त करते. ही करामत करण्याला तिला दीर्घकाळहि लागत नाहीं. समर्थांचें काव्य दृष्टि-समोर येऊन एकदां नजरेंत भरलें कीं, तें मनाची अशी पकड घेतें कीं, करंट्याला आपल्या करंटेपणाची आणि पाप्याला आपल्या पापी कल्पनांची लाज वाटावयास लागून ते दुर्गुण वाचकांच्या मनांतलें आपलें बिऱ्हाड सोडून पळून जातात. अशा रीतीनें दुष्ट वासनांचें बिऱ्हाड मनांतून हाललें कीं, तेथें सद्विचारांचा प्रवेश होऊं लागतो आणि सर्व विद्यांचें पोषण होऊं लागतें. अशा रीतीनें ही वाङ्मयगंगा सद्विद्येची वाढ करणारी आणि अपार अशी शीलसंपत्ति देणारी पावनगंगा आहे. समर्थांच्या काव्यांतला उपदेश ऐहिक अभ्युदय आणि पारलौकिक निःश्रेयस असा दुहेरी लाभ करून देणारा, प्रपंच नेटका करून पारमार्थिक सुखाचाहि ठेवा हस्तगत करून देणारा असल्यानें त्याला ही गंगेची उपमा साजतें.

समर्थांनीं आपलें काव्य लेखनिविष्ट करण्याला कधींपासून प्रारंभ केला त्याचा नक्की काळ सांगतां येत नाहीं. तथापि पंचवटीला येऊन रामोपासना आणि गायत्री पुरश्चरण करून कृतार्थ झाल्यावरच त्यांनीं आपल्या लेखन-कार्यासाठीं लेखणी हातांत घेतली असेल. तोंपर्यंत त्यांचा नित्य पुराण-कीर्तन श्रवणाचा आणि 'ग्रंथमात्र धांडोळावा' हा उद्योग

चालू होता. गुरुमुखांतून पद्धतशीर असें त्यांचें शिक्षण झालेंच नाहीं, त्यामुळें त्यांच्या संस्कृत व प्राकृत शब्दांच्या रूपांत व्याकरणदृष्ट्या कांहीं दोष आढळतात. तथापि त्यांची बुद्धि तीक्ष्ण व सर्वगामी असल्यानें त्यांनीं अल्पावधींतच किती तरी ग्रंथांचें आलोडन केलें आणि कितीतरी गहन विषय आत्मसात् केले, हें पाहून विस्मय वाटतो. त्यांच्या लेखनकालाचे ठोकळ मानानें चार टप्पे ठरवितां येतातः (१) पंचवटींत राहून पुरश्चरण चालू होतें तोंपर्यंतचा पाहिला टप्पा. (२) तीर्थाटन करीत बारा वर्षे भारतखंडांतील देशस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करीत असतांनाचा बारा वर्षांचा दुसरा टप्पा. (३) कृष्णातीरीं वास करूं लागल्यानंतर महंत म्हणून प्रसिद्धी होणें, शिष्य समुदाय गोळा होऊं लागणें, राजगुरुत्व प्राप्त होऊन अधिकारवाणीनें काव्यौघ वाहूं लागणें, येथपर्यंतचा मध्यंतरीचा काल हा तिसरा टप्पा. (४) आणि सांप्रदाय स्थापनेचा व धर्मस्थापनेचा कार्यभार्ग यशस्वी होऊं लागल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागल्यापासून तो समाधी कालापर्यंतचा चवथा टप्पा. अशा या चारहि कालखंडांत त्यांचा लेखनव्यवसाय सतत चालू होता. या प्रदीर्घ कालांत त्यांच्या हातून जें वाङ्मय निर्माण झालें, त्यांतलें जेवढें प्रसिद्ध झालें आहे तेवढ्याची वर्गवारी पुढीलप्रमाणेः—

| (१) अभंगात्मक प्रकरणें— | ग्रंथसंख्या |
|---|---|
| चौदा ओवी शतें | १४०० |
| स्फुट ओव्या | २४७० |
| | एकूण ३८७० |

| (२) अष्टाक्षरी लघुकाव्यें— | ग्रंथसंख्या |
|---|---|
| षड्रिपू | ९६ |
| पंचीकरण योग | १०० |
| चतुर्थ-मान | १०० |
| मान पंचक | १२५ |
| पंचमान | १३४ |
| | एकूण ५५५ |

| (३) अष्टाक्षरी मोठीं काव्यें | | ग्रंथसंख्या |
|---|---|---|
| स्फुट प्रकरणें | ६९ | ९९० |
| स्फुट श्लोक | ६१ | ६८० |
| | एकूण | १६७० |

| (४) श्लोकबद्ध प्रकरणें | | ग्रंथसंख्या |
|---|---|---|
| रामायणें | | १४६२ |
| करुणाष्टकें ३० | | १५९५ |
| मनाचे श्लोक | | २०५ |
| | एकूण | ३२६२ |

| (५) ओवीबद्ध लघुकाव्यें | | ग्रंथसंख्या |
|---|---|---|
| पूर्वारंभ | | ६७ |
| जुनाट पुरुष | | ५७ |
| अंतर्भाव | | १२० |
| आत्माराम | | १७८ |
| पंचसमासी | | १५१ |
| सप्तसमासी | | २११ |
| सगुण ध्यान | | ११९ |
| निर्गुण ध्यान | | १७० |
| मानसपूजा | | १४५ |
| एकवीस समासी ( जुना दासबोध ) | | १३४० |
| एकवीस समासी परिशिष्ट | | ११३ |
| जनस्वभाव गोसावी | | ७० |
| | एकूण | २७४१ |

| (६) श्रीमद्दासबोध | | ग्रंथसंख्या |
|---|---|---|
| पूर्वार्ध दशक १ ते ८ | | ३८६६ |
| उत्तरार्ध दशक ९ ते २० | | ३८८५ |
| | एकूण | ७७५१ |

| | | |
|---|---|---|
| (७) | पदापदांतरें अंदाजें | ३५०० |
| (८) | प्रासंगिक प्रकरणें अंदाजें | ३००० |
| | एकूण ग्रंथसंख्या | ६५०० |

(हें कोष्टक समर्थहृदय ग्रंथांतून घेतलें आहे.)

समर्थकृत कवितांचें वरील वर्गीकरण कालानुरोधानें केलें नसून वृत्तानुसार केलें आहे; पण आपणाला समर्थांच्या वाङ्मयाचें मूल्यमापन करण्याकरितां त्याची वर्गवारी कालानुक्रमानें केली पाहिजे. हा कालानुक्रम नक्की ठरविणें अशक्य आहे. तथापि कांहीं तर्क चालवून साधारणपणें त्या कवितांचें पौर्वापर्य अनुमानतां येईल.

**पांच लघुकाव्यें** हें प्रकरण प्रारंभीचें दिसतें. अष्टाक्षरी प्रकरणें हीं देखील प्रारंभीचीच दिसतात. या अष्टाक्षरी प्रकरणांत '**लघुरामायण**' म्हणून एक प्रकरण आहे. त्यांत रामदास स्वतःचा उल्लेख '**लहानसा कवी नवा**' अशा शद्बांनीं करितात. त्यावरून हीं प्रकरणें त्यांनीं प्रारंभी लिहिलीं असावींत, या अनुमानाला बळकटी येते.

**करुणाष्टकें** हें प्रकरण यानंतरचें असावें. करुणाष्टकांची संख्या आठ आहे व त्यांत मुख्यतः श्रीरामाच्या भेटीची आर्तता विशेषत्वानें प्रतीत होत असल्यानें हीं करुणाष्टकें पूर्ववयांतली होत, याविषयीं शंका राहात नाहीं. करुणाष्टकांच्या जोडीनेंच रामभक्तिपर अनेक प्रकरणें समर्थांनीं श्लोकबद्ध केलीं आहेत. त्यांत समर्थांनीं स्वतःला 'लघुसा कवि' म्हणून घेतलें आहे. त्यावरून त्या श्लोकबद्ध प्रकरणांचा काल हा समर्थांच्या साधनावस्थेंतला होय असें मानण्यास हरकत नाहीं. तथापि, समर्थांची समग्र कविता छापतांना वृत्तानुसार वर्गीकरण केलें गेल्यानें श्लोकबद्ध प्रकरणांत जशीं पूर्ववयांतली करुणाष्टकें आलीं आहेत, तशींच उत्तरकालांतली बाहेगांवचा मारुति, कफाची व्यथा, पुतण्यांना बोध, धन्यतेचे उद्गार, इत्यादि प्रकरणेंहि समाविष्ट केलीं गेलीं आहेत. त्या प्रकरणांतील वर्ण्य-विषयावरूनच तीं प्रकरणें मागाहूनचीं हें उघड होतें. यास्तव कालानुक्रम ठरवितांना प्रत्येक बारीकसारीक प्रकरणाचा अंतरंग विचार करावा लागेल. इतक्या तपशिलांत

शिरण्याचें कारण नाहीं. यास्तव स्थूलमानानेंच कांहीं महत्वाच्या प्रकरणांचाच तेवढा विचार करण्यांत येत आहे.

'राममंत्राचे श्लोक,' 'लघुरामचरित्र,' 'लघुकृष्णचरित्र,' 'भूपाळ्या,' 'आरत्या,' नवविधाभक्तिपर अभंग, करुणापर अभंग, धावा, एकवीस समासी (जुना) दासबोध, ओव्या, शतकें इत्यादि काव्य हें पूर्ववयांतले म्हणजे तीर्थाटणाला निघण्याच्या पूर्वीचें असावें. पदापदांतरें, सृष्टिवर्णनपर, लोकस्थितिवर्णनपर कविता, हिंदी भाषेंतलीं पदें आणि रामस्तुतिपर व भजनपर पुष्कळशी कविता, ही तीर्थाटणाच्या काळांतली असावी. 'धीरधरा, हडबडूं गडबडूं नका' अशा स्वरुपाचा आश्वासनपर उपदेशहि याच काळांतला होय. तीर्थाटण संपवून, मतोश्रीस भेटून, पंचवटीच्या रामाचा निरोप घेऊन समर्थ कृष्णातीराला येऊन राहिले, अकरा मारुतींची स्थापना केली आणि प्रथम मसुरग्रामीं आणि मागाहून चाफळग्रामीं श्रीरामाच्या उत्सवाची मुहूर्तमेढ रोविली. येथपासून समर्थांच्या चरित्राचा उत्तरार्ध सुरु होतो. या उत्तरार्धांतहि शके १५७० पासून १५९४ पर्यंतचा कार्यव्यापृततेचा काळ आणि शके १५९४ पासून समाधिकालापर्यंतचीं शेवटचीं ९ वर्षे असे दोन भाग पडतातच. समर्थांचें जें कांहीं महत्वाचें काव्य प्रकट झालें तें शके १५७० ते १५९४ या काळांतच होय. शेवटच्या नऊ वर्षांत त्याचा लेखनाचा व्याप बहुतेक संपुष्टांत आला होता. तथापि या शेवटच्या काळांतली रामवरदायिनीचीं स्तोत्रें, आनंदभुवन हें प्रकरण आणि अगदीं अखेरचें संभाजी महाराजास उपदेशपर पत्र एवढीच कविता घेतली तरी ती समर्थांच्या वक्तृत्वावर, स्वभावावर आणि प्रतिभेवर चांगलाच प्रकाश पाडणारी आहे. चाफळखोऱ्यांत येऊन स्थिर झाल्यानंतर समर्थांनी आपल्या काव्यलेखनास जी सुरुवात केली ती 'पंचवटीच्या रामोपासकांस पत्र' या कवितेनें केली असें धरून चालण्यास हरकत नाहीं. हें पद्यमय पत्र अवघ्या १२ ओव्यांचें आहे; पण या बारा ओव्यांत समर्थांच्या काव्यांतील सगळे गुण सांठविलेले आहेत. यांत भक्ति आहे, ज्ञान आहे, कर्तव्यनिष्ठा आहे, बंधुप्रेम आहे, ईश्वरनिष्ठा आहे, आत्मविश्वास आहे आणि समर्थसांप्रदायाची चतुःसुत्रीहि

आहे. शितावरून भाताची परीक्षा करितात, त्याप्रमाणें समर्थांच्या कवितेतील काव्यगुणांची परीक्षाच करावयाची असल्यास हें पद्यमय पत्र कोणत्याहि कसोटीस उतरणारें असें अमोलिक आहे.

समर्थांची या नंतरची सर्व कविता उपदेशपर आणि हेतुपुरस्सर लिहिलेली आहे. हेतुपुरस्सर जें लिखाण तें काव्यच नव्हे, सहजोद्गार हेंच काव्याचें खरें स्वरूप होय, असें मानण्यांत येतें व ते बऱ्याच अंशीं खरेंहि आहे. तथापि प्रसंगानुरूप उपदेशपर कविता असें जिला आपण म्हणतों ती कविता त्या कवीच्या तोंडचे सहजोद्गार नव्हेत असें कां मानावें? एकाद्या अल्पबुद्धीच्या माणसाला जे दीर्घ प्रयत्नानेंहि साधत नाहीं तें प्रतिभासंपन्न माणसास सहज स्फूर्तीनें सुचलें, तर आपण त्यावर कृत्रिमतेचा छाप कां मारावा? समर्थांचें या नंतरचें सर्व काव्य हेतुपूर्वक उपदेश करण्यासाठींच असलें तरी ते त्यांच्या प्रतिभासंपन्नतेंतून निघालेले सहजोद्गारच आहेत.

चाफळ खोऱ्यांत येऊन अकरा मारुतींची स्थापना करून रामाचा उत्सव सुरू केल्यानंतर समर्थांनीं प्रथम 'भीमरुपी' स्तोत्रें आणि रामायणांतील 'सुंदरकांड' व 'युद्धकांड' ही प्रकरणें लिहिलीं असावींत. " अंतरीं कल्पना केली। एकान्ती बोलिलों बहु॥ रक्षिता देव देवांचा। त्याचा उत्छाव इच्छीला " यांत दर्शविल्याप्रमाणें देवांना बंधमुक्त करून त्यांना स्वातंत्र्य देणाऱ्या श्रीरामाचा उत्सव सुरू करणें, हें महाराष्ट्राला जागृत करून स्वातंत्र्योन्मुख करण्याचें साधन आहे, असें ठरविल्यानंतर रामकथेंतील मारुतीचा पराक्रम सुंदरकांडांतून आणि श्रीरामाचा अद्भुत पराक्रम युद्धकांडांतून वर्णनें करणें हें क्रमप्राप्तच होतें; विशेषतः मारुतीची भक्ति सर्वत्र अधिकारारूढ करण्यास भीमरुपी स्तोत्रें उपयोगी पडणारीं होतीं.

हें जनताजागृतीचें कार्य झपाट्यानें प्रसार पावण्यासाठीं एकनिष्ठ सांप्रदायिकांची आवश्यकता होती व त्यासाठीं समर्थांनी रामभक्तीचा सांप्रदाय सुरू केला. सांप्रदाय म्हटला कीं, त्याला धर्माचें व तत्त्वज्ञानाचें अधिष्ठान आवश्यक असतें. त्यासाठींच समर्थांनी दासबोध हा बहुधा अध्यात्मपर ग्रंथ तयार करण्याचें योजिलें व हेळवाकच्या घळींत जाऊन ते त्या कामास लागले. पंचवटींत असतांना

तयार केलेल्या जुन्या दासबोधांतली कांहीं प्रकरणें घेऊन त्यांचा अधिक विस्तार करून आणि त्यांना अवश्यक तितकी मागेपुढें जोड देऊन त्यांनी दासबोधाचा पूर्वार्ध तयार केला.

समग्र दासबोधाची रचना ही एका वेळी, एका टाकीं, योजनापूर्वक अशी झालेली नाहीं, ही गोष्ट सर्वमान्य आहे. प्रारंभींच्या दशकांची रचना क्रमवार आहे. त्यानंतरचे दोन दशकहि त्यास जुळते असेच आहेत. या आठ दशकांना दासबोधाचा पूर्वार्ध मानतात. त्यांतहि एक अपवाद लक्षांत घेतलाच पाहिजे. तो हा कीं, दासबोधाच्या पहिल्या दशकांतला पहिला समास हा समग्र दासबोधाच्या अनुक्रमणिकेच्या स्वरूपाचा असल्यानें तो पहिला समास अगदीं प्रारंभी लिहिला गेला नसून दशक फोडून, समास मागें पुढें लावून एकूण दहा दशक व प्रत्येक दशकांत दहा समास अशी मांडणी करण्यांत आल्यावर हा पहिला समास लिहिला गेला आहे.

उत्तरार्धातील पहिल्याच म्हणजे दासबोधांतील ९ व्या दशकांतला जो ४ था समास आहे तो पारमार्थिक स्वरूपाचा नसून लौकिक फलदायक असा आहे. तेथून पुढें तर ऐहिक व पारलौकिक, प्रापंचिक व पारमार्थिक विषयांची ठिकठिकाणीं गल्लत झाली आहे. त्यांतल्या त्यांत दहावा, तेरावा, सोळावा, सत्रावा व विसावा हे दशक बहुशीं आध्यात्मिक आहेत. इतर दशकांत ऐहिक फलोपदेशाचा भाग आधिक्यानें असला तरी अध्यात्माला अगदींच फांटा दिला गेला आहे असें नाहीं. कित्येक ठिकाणीं तर सबंध समास लौकिक उपदेशाचा असून शेवटच्या चार दोन ओव्यांत त्याचें पर्यवसान अध्यात्मांत केलेलें आहे. उत्तरार्धाचें स्वरूप असें संमिश्र असल्यामुळें त्यांतला कोणता भाग कोणत्या काळांत लिहिला हें ठरविणें कठीण आहे. यांतला पुष्कळसा उपदेश प्रसंगानुरोधानें स्फुट-प्रकरणासारखा वेगवेगळा लिहिला असून मागाहून तो कांहीं विशिष्ट धोरणानें एकेका दशकांत एकेका समासाच्या जागीं बसविला गेला असावा असें वाटतें.

दासबोधाचें लेखन अगदीं अंतकाळापर्यंत चालू होतें, ही समजूत निराधार आहे. अंतकाळ समीप आल्यावेळीं नवीन कांहीं लिखाण झालें नाहीं व नवी भर दासबोधांत पडली नाहीं. मात्र विस्कळीत व तुटक तुटक स्फुट प्रकरणें

जागोजागी बसवून प्रत्येक दशकांत दहा समास आणि असे दशक वीस, एवढी दासबोधाची निश्चित मर्यादा ठरवून टाकण्यांत आली. हें वर्गीकरण करतांना लौकिक व्यवहाराचे समास एकीकडे आणि पारमार्थिक स्वरूपाचें समास दुसरीकडे, अशी व्यवस्था करण्यांत आली नसून ऐहिक व पारलौकिक विषयांची खिचडी मुद्दामच बनविण्यांत आली असावी. ऐहिक व पारलौकिक यांची विभागणी करण्यांत आली असती तर वाचकांनी आपापल्या आवडी-नुसार कोणता तरी एकच भाग वाचला असता, पण समर्थांना असा विभक्त-पणा नको होता. त्यांना प्रपंच व परमार्थ, ऐहिक व पारलौकिक, आधिभौतिक व अध्यात्मिक यांचा समन्वय इष्ट वाटत होता. त्यांना एकांगीं उपदेश आणि एकांगीं कार्यकर्ताहि नको होता. 'मुख्य हरिकथा निरुपण, दुसरें तें राजकारण,' असें सांगून प्रपंच व परमार्थ यांची जोड सांधू पाहणाऱ्या समर्थांना दुरंगी गोफाच्या विणीप्रमाणें अभ्युदय व निःश्रेयस यांचा प्रीति-संगमच अभिप्रेत होता. यास्तव त्यांनीं दासबोधाची ही मांडणी अशी सरमिसळीची केली.

दासबोधाची गुंफण चालू असतांनाच, वेदांतपर अशी कित्येक स्फुट कविता आणि प्रसंगवशात् सावधानता, क्षात्रधर्म, सेवक-धर्म, इत्यादि स्फुट प्रक-रणें लेखनिविष्ट करण्याचें काम चालूच होतें. या मध्यंतरीच्या काळांत पूर्वारंभ, अंतर्भाव, सप्तसमासी, सगुण-निर्गुणध्यान, मानसपूजा, आत्माराम, जुनाट पुरुष इत्यादि प्रकरणें लिहिण्याचें काम चालूच होतें. मनाचे श्लोकांची रचनाहि याच काळांत झाली. मनाच्या श्लोकांतहि केवळ अध्यात्म नसून लौकिक उपदेशाचा भागहि ठसठसीतपणें आला आहे. यांतील संवादात्मक प्रकरणें फारच मजेशीर आहेत. या वाद प्रकरणांत निर्मळब्रह्मवाद, संत-मुमुक्षुवाद, गृहस्थविरक्तवाद, प्रारब्धप्रयत्नवाद इत्यादि प्रकरणें विशेष मनोरंजक असून बोधप्रद आहेत.

आनंदवनभूवन आणि संभाजीस उपदेशपर पत्र हीं स्फुट प्रकरणें अगदीं अखेरच्या काळांतली आहेत हें निर्विवाद आहे. तथापि रामवरदायिनी मातेचीं स्तोत्रें केव्हांची याविषयीं वाद आहे. 'तुझा तूं वाढवी राजा। शीघ्र आम्हांचि देखता' ही देवीची प्रार्थना कांहीं अंतकाळची नव्हे यांत

शंका नाहींच; पण ती अगदीं आरंभीच्या काळाचीहि नव्हे. शिवाजी राजा झाला आहे, पण त्याचें राज्य वृद्धिंगत होण्याऐवजीं संकुचित होत आहे. अशा वेळची ही प्रार्थना असावी. जयसिंगाच्या स्वारीनंतर २० किल्ले जाऊन १२ च किल्ले राहिले; अवरंगजेबाच्या भेटीला गेलेले शिवाजी महाराज अटकेंत गुंतून पडले, अशा संकटाच्या प्रसंगींचेंच हें स्तोत्र असावें. या स्तोत्राचा आणि श्रेष्ठांच्या पुत्रांचा प्रतापगडला येण्याचा कांहींच संबंध दिसत नाहीं.

'आनंदवनभूवन' हें नांव काशीक्षेत्राला उद्देशून आहे. अशी कित्येकांची समजूत आहे; पण तींत कांहीं अर्थ नाहीं. शिवाजीराजा, त्याच्या राज्याचा विस्तार, म्लेच्छांच्या सत्तेचें महाराष्ट्रांतून उच्चाटण आणि पैठणसारख्या विद्यापीठाचें पुनरुज्जीवन हें ध्येयच समर्थांच्या नजरेसमोर होतें. शिवाजीच्या राज्यारोहणानें मराठ्यांच्या रामराज्याची स्थापना झाली; तरीपण तें राज्य दिवसेंदिवस शुक्लेंदुवत् वाढत जाऊन कलापूर्ण व्हावें, अशी महाराष्ट्रीय पुढाऱ्यांची इच्छा होती, यांत शंकाच नाहीं. या इच्छेचें प्रतीक म्हणून समर्थांनी हें भविष्य कथन केलें. अखेरीस संभाजी महाराजांना उपदेश करण्याच्या प्रसंगानें 'आहे तितुकें जतन करावें। पुढें आणिक वाढवावें॥ महाराष्ट्र राज्य करावें। जिकडे तिकडे' असा संदेश सांगून समर्थांनीं आपल्या वाग्यज्ञाची समाप्ति केली.

समर्थांच्या वाङ्मयाची ग्रंथसंख्या २६ हजारांहून अधिकच आहे. तींत अगदीं छोट्या अभंगापासून तो शार्दूलविक्रीडितापर्यंत वृत्तांचे अनेक प्रकार आले आहेत. त्याचप्रमाणें अगदीं लहान मुलांना सांगितलेल्या 'बरें सत्य बोला यथातथ्य चाला' असल्या साध्या व्यावहारिक उपदेशापासून तो अनिर्वाच्य, शुद्ध, विमलब्रह्माच्या अनुभूतिपर्यंतचा अत्यंत गूढ वेदांताचा उपदेशहि त्यांत आला आहे. 'अधिकार तैसा करूं उपदेश' हा नियम समर्थांनीं जितका कसोशीनें पाळला तितका तो कोणीच पाळला नसेल.

'सब घोडे बारा टक्के' अशा स्वरुपाचा एकच शिक्याचा एकाच मापाचा उपदेश सरसकट सर्वांस सारखाच त्यांनीं केला नाहीं. लहान मुलांना मुलांच्या चालीनें, प्रापंचिक गृहस्थांना गृहस्थधर्माच्या विधिनियमांनी,

राजकारणी पुरुषास यथोचित चातुर्याने, क्षत्रियास क्षत्रिधर्माने समजूत पाडून यथोचित मार्गदर्शन करण्यात त्यांचा हातखंडा असे. त्यांच्या काव्यांतील बोध एकांगी नाहीं. परस्परविरुद्ध भासणाऱ्या वचनांचा समन्वय कसा करावा हें ते उत्तम जाणत. यामुळें त्यांनीं कोणताहि वाद, टाकला नाहीं. मायावाद व सत्कार्यवाद, सगुण-निर्गुणवाद प्रपंच-परमार्थवाद, भोगत्यागवाद, कर्मयोग-ज्ञानयोगवाद, इत्यादि अनेक वाद वाचकांना बुचकळ्यात पाडीत असतात. समर्थांनीं आपल्या काव्यांत ते वाद टाळले नसून त्यांचा यथोचित परामर्श घेतला आहे आणि प्रत्येकांत सत्यांश किती व त्याची मर्यादा कोणती हें विशद करून सांगितलें आहे. आपल्या सर्वंकष बुद्धीनें त्यांनीं आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व विषयांचा परामर्श आपल्या सर्वगामी वाङ्मयांत घेतला असल्यानें त्यांच्या वाङ्मयांत कोणकोणते गुण कसकसें प्रकट झाले हें विहंगम दृष्टीनें पाहून त्यांच्या वाङमयांतील वैशिष्ट्याचा व शाश्वतमूल्याचा परिचय करून घेऊं.

नुसती पद्यात्मक रचना केल्यानें कांहीं तें काव्य ठरत नाहीं; समर्थांच्या कवितेंत काव्याचे गुण मुळींच नाहींत असें म्हणणारे टीकाकार आढळतात. काव्य हें रसात्मक असतें; मनाला रसाची प्रतीति, त्या त्या रसानुकूल अशा भावनेनें हृदय उचंबळून येतें. अर्थातच जी कविता वाचतांना तींतील रसानुयोगी उत्कट भावनेने हृदय उचंबळून येतें, त्या कवितेंत काव्य हें मान्य केलेंच पाहिजे. ही विचारसरणी मान्य असून देखील जर कोणा टीकाकाराला समर्थांच्या कवितेंत काव्य नाहीं असें वाटत असेल तर तो टीकाकार सहृदय नाहीं असेंच म्हणणें प्राप्त आहे. सर्वसामान्य कवि-श्रेष्ठांच्याहि प्रत्येक पद्यांत काव्य भरून उतूं जात असतें असें क्वचितच आढळते. ग्रंथसंपत्ति जितकी विपुल तितकें काव्याचें प्रमाण कमी पडणार हें उघडच आहे. तथापि, तें प्रमाण कमी अंशानें कां होईना, पण कांहीं पद्यांत आढळतें असें निश्चित दिसून आल्यास त्या ग्रंथकाराची कवींत गणना करण्यास प्रत्यवाय मानूं नये. सूर्योदय झाला तरी जेथें त्याचा प्रकाश प्रवेश करूं शकत नाहीं अशीं शेकडों स्थानें असलीं तरी त्यावरून कांहीं सूर्योदय झाला नाहीं असें ठरवावयाचें नसतें; तर उलट

कोठें का होईना, सूर्याचे किरण पडलेले आढळलें कीं, सूर्योदय झाला असं निश्चित म्हणता येतें, त्याप्रमाणें ग्रंथकाराच्या अनेक ग्रंथांपैकीं, कोठल्याहि एका ग्रंथांत जरी त्याची काव्यप्रतिभा व्यक्त झाली तरी त्या ग्रंथकाराची कवीच्या मालिकेंत गणना करावयास हरकत नाहीं. पण समर्थांच्या वाङ्मयांत काव्यरस भरला आहे हें सिद्ध करण्यास इतकी वकिली करण्याची गरज नाहीं. सहृदय माणसानें पूर्वग्रहदूषित न होतां कित्येक प्रकरणें सहजासहजीं चाळलीं तरी त्याला समर्थांच्या काव्यांतील रसप्रतीति आल्यावांचून रहाणार नाहीं.

समर्थांचीं करुणाष्टकें काव्यरसानें थबथबलीं आहेत. त्यांत भक्तीची आतुरता, प्रेमळपणा, कारुण्यरस, उत्कटभावना, प्रसाद, स्फूर्ति इत्यादि अनेक गुण भरपूर आहेत. समर्थांच्या काव्यांत अलंकार बेताचेच असतात. तरीपण उपमा, दृष्टान्त व रूपक हे तीन प्रमुख अलंकार समर्थांच्या काव्यांत योग्य स्थळीं, समर्पकपणें, वाचकाच्या मनाची पकड घेतील अशा ठळक रीतीनें वापरलेले आढळतात.

**॥ झडकरि झड घाली धाव पंचानना रे ॥**
**॥ तुजविण मज नेती जंबुकी वासना रे ॥ १ ॥**
**॥ जळधर कण आशा लागली चातकासी ॥**
**॥ हिमकर अवलोकी पक्षिया भूमिवासी ॥ २ ॥**
**॥ जळचर जळवासी नेणती त्या जळासी ॥**
**॥ निशिदिनि तुजपाशी चूकलों गूणराशी ॥ ३ ॥**

यांतील उपमा, दृष्टान्त व रूपक अति सरस व समर्पक आहेत हें काय सांगावयास हवें ?

**॥ बळें लावितां चित्त कोठें जडेना ।**
**॥ समाधान तें कांहीं केल्या पटेना ॥**
**॥ नव्हे धीर डोळा सदानीर दाटे ।**
**॥ उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ १ ॥**
**॥ अखंडीत हे सांग सेवा घडावी ।**

**॥ न होतां तुझी भेट काया पडावी ॥**
**॥ दिसंदसि आयुष्य हें व्यर्थ लोटे ।**
**॥ उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ २ ॥**

या पद्यांतील रामभेटीची आर्तता हृदय पिळवटणारी नाहीं काय ? "रामचंद्रा तुझा वियोग । ऐसा नकोरे प्रसंग ॥ तुज कारणें सर्व संग व्यक्त केला ॥ रामा तुझीये स्वामीपणें मी ब्रह्मांड मानीं ठेंगणें । स्वामी तुजविण कोण जाणे । अंतर आमुचें" यांतला भक्तींचा जिव्हाळा मनाला चटका लावणारा नाहीं काय ?

समर्थांच्या काव्यांत जसे विशिष्ट अलंकार प्रामुख्यानें आढळतात त्याचप्रमाणें विशिष्ट रसच मुख्यतः हृदय उचंबळून सोडतात. नवरसापैकीं लौकिकोक्तीच्या कवींना प्रिय असणारा जो शृंगाररस तो समर्थांनीं संपूर्णतः वर्ज्य मानला आहे. रामदासांच्या कवितेंत चुकूनदेखील शृंगार रस आलेला दिसत नाहीं. एवढेंच नव्हे तर, शृंगारिक वर्णनाचा संबंध येईल तेथें ते शृंगारिक वर्णन आवर्जून टाळतात. श्रीकृष्णचरित्र वर्णन करीत असतां राधेच्या वर्णनाचा प्रसंग आला. त्या ठिकाणीं एकनाथांनी 'वारियानें कुंडल हाले । डोळे मोडित राधा चाले' अशी शब्दयोजना केली आहे. समर्थांना 'डोळे मोडित राधा चाले ही कल्पना शृंगारिक अतएव त्याज्य वाटली असावी. अतएव त्यांनीं 'डोलत डोलत राधा चाले । श्रवणीं कुंडल हाले' असें वर्णन केलें. अशा रीतीनें त्यांनी आपल्या काव्याला दुरूनहि शृंगार रसाचा संपर्क लागू दिला नाहीं.

काव्यरचनेंतलें समर्थांचें आवडते रस म्हटले म्हणजे वीर, करुण, हास्य, रौद्र, अदभुत हे होत. भयानक व बीभत्स हेहि रस समर्थांच्या काव्यांत अगदींच येत नाहींत असें नाहीं. परंतु भयानक व बीभत्स या रसांच्या आविर्भावानें काव्याला शोभा येण्याऐवजी विपरीत भावनाच डोकावते त्यामुळें समर्थांनी शक्यतोंवर भयानक व बीभत्स हे रस टाळले आहेत. अष्टरसांची ही विल्हेवाट झाली. याशिवाय शांत हा नववा आणि वात्सल्य हा दहावा रस साहित्तिकांनीं मानला आहे. या दोन रसांची मात्र समर्थांच्या

काव्यांत रेलचेल आहे. भक्तिपर वाङ्मयांत शांत व वात्सल्य या रसांना आद्य स्थान असतें व समर्थांच्याहि काव्यांत त्यांनी त्या रसांचा भरपूर आविर्भाव केला आहे. वेदान्तपर वाङ्मयांत शृंगार, वीर, हास्यादि रसांप्रमाणें शांत व वात्सल्य या रसांना मज्जाव नसून उलट त्यांना अग्रमान मिळत असल्यामुळें आणि समर्थांची पुष्कळशी कविता वेदान्तविषयावरच असल्यानें त्यांच्या काव्यांत शांत व वात्सल्य या रसांना भरपूर अवकाश मिळाला असल्यास नवल नाहीं.

शृंगाररसाचें उच्चाटन करून त्याच्या जागीं शांत रसाची स्थापना केली गेल्यामुळें ज्या रसिकांना शृंगाररसाशिवाय काव्य अगदींच अळणी वाटते, त्यांनी समर्थ हे कवि नव्हत आणि त्यांच्या वाङ्मयांत काव्यरस नाहीं, असा अभिप्राय देऊन टाकला आहे, पण हृदयांतील कोमल भावना जागृत करून उत्कट प्रेमानें मन उचंबळून सोडणें हें जें काव्याचें लक्षण तें शांत रसाच्या व वात्सल्यरसाच्या परिपोषाला लागू पडत असल्यामुळें आणि समर्थांच्या काव्यांत त्या दोहोंचा परिपोष भरपूर झाला असल्यामुळें समर्थांची कविता काव्याच्या सदरांत समाविष्ट केली पाहिजे व समर्थांचें परिगणन कवींच्या मालिकेंत केलें पाहिजे.

समर्थांचें लक्ष प्रतिपाद्य विषयाच्या तर्कशुद्ध मांडणीकडे जसें असे तसें तें आपल्या लिखाणांतील शब्दांच्या शुद्धतेकडे नसे, हें खरें आहे. त्यावेळचे लिखाण बव्हंशीं उच्चारानुसारी असल्यानें आपण अलिकडे शब्दांची जीं रूपें शुद्ध मानतो तशीं ती समर्थांच्या ग्रंथांत आढळत नाहींत. त्याचीं कारणें कोणतींहि असोत, पण ही वस्तुस्थिति नाकारतां येत नाहीं. त्याशिवाय अनुप्रासाची बेताल आवड, वर्णनांतील पुनरुक्तीची अथवा अतिरंजनाची हौस इत्यादि दोष समर्थांच्या काव्यांतून स्पष्टपणें दृग्गोचर होतात. परंतु या दोषामुळें समर्थांचें काव्य कानीं पडतांच जो अपेक्षित रसाविर्भाव व्हावयाचा तो अडतो आणि त्यांच्या काव्यांतलें काव्यत्व अजिबात लुप्त होतें, असें वाटत नाहीं. ग्रंथकाराच्या प्रत्येक पदांतून काव्यरसाचा झरा वाहात असतो असें नाहीं. त्यांतून ज्या कवीची वाङ्मयगंगा प्रदीर्घ प्रवास करून दूरवर वाहात जाते तिच्या जलौघांत ठिकठिकाणच्या भूभागाच्या परिस्थितीप्रमाणें कमीअधिक

गढूळपणा येणें अपरिहार्य आहे. पण तेवढ्यावरून समर्थांचें सगळेंच वाङ्मय नीरस ठरत नाहीं. गंगाजलाच्या गुणावगुणाची पारख करतांना ज्याप्रमाणें आपण गंगोत्री किंवा हरद्वारासारख्या ठिकाणचें शुद्ध गंगाजल घेऊन त्यावरून गंगोदकाचें पृथक्करण करून त्याचें मूल्य ठरवितों, त्याचप्रमाणें समर्थांच्याहि कांहीं विशिष्ट काव्यावरून त्यांच्या काव्यगुणाची पारख करावी. मनुष्याच्या अंगीं असलेले गुण विशिष्ट परिस्थितीच्या संसर्गानें लुप्त होऊं शकतात; पण ज्याच्या अंगीं जो गुण मुळांतच नाहीं, तो कोठल्याहि परिस्थितींत प्रगट होऊं शकत नाहीं. बिलोरी आरसा मातीनें लडबडल्यामुळें त्यांत व्यवस्थित प्रतिबिंब दिसूं शकणार नाहीं, परंतु मातीच्या मडक्यांत तें केव्हांच दिसणें शक्य नाहीं. याच दृष्टीनें विचार केल्यास समर्थांच्या करुणाष्टकें, ( मनाचे श्लोक इत्यादिकांत ) सरस काव्य-गुण जर स्पष्टपणें प्रतीत होतात, तर समर्थांच्या अंगीं काव्यप्रतिभा नव्हती असें कसें म्हणतां येईल? काव्यानुकूल प्रसंगांत तिची चमक दिसून आली. वेदान्ताच्या 'घटपटादि खटपटींत' ती सुप्तास्थितींत राहिली असल्यास नवल काय ?

**॥ तनास भेटलीं तनें । मनास चूकलीं मनें ॥**
**॥ चुकीचुकी बहु चुकी । परस्परें चुकाचुकी ॥**
**॥ मढ्यास भेटलें मढें । करील काय बापुडें ॥**
**॥ मनें मनाचिया खुणा । बुझेल लोभ त्या दुणा ॥**
**॥ मनें मनास राखणें । सुखें सुखास चाखणें ॥** (स्फुट ३०)

**॥ जठरीं लागो क्षुधा । होत नाना आपदा ॥**
**॥ भक्ति प्रेम कदा । न सोडी सत्य ॥**
**॥ शब्द न फुटे तरी । चिंती न अंतरीं ॥**
**॥ भक्ति प्रेम परी । न सोडी सत्य ॥**
**॥ आतांचि हा देह । राहो अथवा जावो ॥**
**॥ रामीं प्रेमभाव । न सोडी सत्य ॥**
**॥ म्हणे रामी रामदास । वरी पडो आकाश ॥**
**॥ राघवाची कास । न सोडी सत्य ॥** ( पदें २९ )

॥ जनाच्या मनाकारणें धीर केला ॥
॥ कृपेच्या कृपासागरा पूर आला ॥
॥ कृपादृष्टिनें पाहिलें जानकीला ॥
॥ पुढे शीघ्र आलिंगिले ते सितेला ॥ (रामायण १०६)

असें शेंकडो उतारे देतां येण्यासारखे आहेत. हें काव्य वाचून कोणाचें अंतःकरण भक्तीनें व प्रेमानें उचंबळून येणार नाहीं ?

तथापि, ही सगळी चर्चाच एकप्रकारें अप्रस्तुत आहे. समर्थांच्या तोंडून जें वाङ्मय प्रकट झालें तें कांहीं काव्याच्या चढाओढींत विक्रम करून पारितोषिक मिळविण्यासाठीं प्रकट झालें नाहीं. निवडक कवींच्या मालिकेंत समर्थांना तुम्ही वर, मध्यें, खालीं कोठेंहि बसवा अथवा तुमचें तसेंच मत झाल्यास कोठेंच न बसवा; तो तुमच्या गुणज्ञतेचा प्रश्न आहे व तो अप्रस्तुत आहे. गुणज्ञतेच्या पेक्षा कृतज्ञतेचा प्रश्न खरा प्रस्तुत व महत्त्वाचा आहे. समर्थांच्या पुढें एक महत्त्वाचें जीवितकार्य होतें. त्या कार्याला प्रारंभी विश्वोद्धार, जगदोद्धार असें व्यापक नांव दिलें गेलें, तरी प्रत्यक्ष कार्य करण्याचा प्रसंग आल्यावेळीं 'महाराष्ट्र' हेंच त्यांनी आपल्या कार्याचें क्षेत्र आखून घेतलें आणि महाराष्ट्रांत जागृति करून महाराष्ट्रधर्म आणि महाराष्ट्रराज्य यांची नीट घडी बसवावी हें ध्येय त्यांनी आपल्या डोळ्यापुढें ठेवलें. या ध्येयसिद्धीच्या प्रयत्नाच्या प्रारंभकाळीं शिवाजीमहाराजांना लिहिलेल्या पत्रांत त्यांनी. :—

॥ देवधर्म गोब्राह्मण । करावया संरक्षण ॥
॥ हृदयस्थ झाला नारायण । प्रेरणा केली ॥
॥ या भूमंडळाच्या ठायीं । धर्म रक्षी ऐसा नाहीं ॥
॥ महाराष्ट्र धर्म राहिला कांहीं । तुम्हाकारितां ॥
॥ सर्वज्ञ मंडळी धर्ममूर्ति । सांगणें काय तयाप्रति ॥
॥ धर्म स्थापनेची कीर्ति । संभाळिली पाहिजे ॥

अशी इच्छा प्रकट केली. पुढें अवतार समाप्तीच्या काळीं:—

॥ बुडाले सर्वही पापी । हिंदुस्थान बळावले ॥

॥ अभक्तांचा क्षयो झाला । आनंदवन भूवनी ॥
॥ बुडाला औरंग्या पापी । म्लेच्छ संहार जाहला ॥
॥ मोडलीं मांडली क्षेत्रें । आनंदवन भूवनीं ॥
॥ उदंड जाहले पाणी । स्नान संध्या करावया ॥
॥ जपतप अनुष्ठानें । आनंदवन भूवनीं ॥

असें त्यांनीं कृतार्थतेचे उद्गार काढले. त्यानंतर संभाजीला उपदेश करण्याचा प्रसंग आला. तेव्हां:—

॥ बहुत लोक मेळवावे । एक विचारें भरावे ॥
॥ कष्ट करूनि घसरावे । म्लेच्छावरी ॥
॥ आहे तितुकें जतन करावे । पुढे आणीक मेळवावे ॥
॥ महाराष्ट्र राज्यचि करावें । जिकडे तिकडे ॥

असें वाढत्या महत्त्वाकांक्षेचें ध्येय समर्थांनी संभाजीला सांगून दिलें.

समर्थांच्या पुढें धर्मरक्षण, स्वराज्य-स्थापन, स्वराज्याचें सुराज्य ( राम-राज्य ) करणें आणि अवघेचि सुखी असावे ही सदिच्छा पूर्ण होणें अशीं चार ध्येयें सतत वागत होतीं. आणि हीं ध्येयें गांठण्यासाठींच त्यांनीं प्रथम तपःश्चर्या करून रामकृपेचें सामर्थ्य संपादन केलें. नंतर तीर्थाटन करून सर्व परिस्थिति बरोबर हेरली. त्यानंतर ध्येयसिद्धीचें साधन म्हणून स्वतःशीं खोल विचार करून आणि एकान्तांत अनेकांशीं वाटाघाटी करून, देवांना बंधमुक्त करणारा जो कोदंडपाणी राम त्याचा उत्सव सर्वत्र सुरू करण्याची योजना आखली आणि राष्ट्राच्या जागृतीकरितां ‘ महंतें महंत करावे । युक्ति बुद्धीनें भरावे ’ अशी चढती वाढती सांप्रदायिक संघटना अमलांत आणली. या संघटनेला आधारभूत म्हणून विशिष्ट धोरणानें त्यांनी आपलें वाङ्मय प्रसृत केलें. समर्थांचे पूर्वार्धांतील वाङ्मय केवळ. रामभक्तीसाठीं आणि निवृत्तीमार्गाच्या उपदेशासाठीं लिहिलेलें व केवळ पारमार्थिक फलाचें मधाचें बोट लावणारें असें होतें. उत्तरार्धांतील वाङ्मयांतही उपासनेची कास न सोडण्याचा आग्रह आहेच, पण ती उपासना केवळ वैयक्तिक मोक्षासाठीं नसून राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं ती आहे. प्रपंचांत असो वा परमार्थांत असो, मनुष्य

मात्राला दैवीशक्तीचा पाठिंबा पाहिजेच. त्याशिवाय महत्त्वाच्या मार्गांत आडवीं येणारीं विघ्नें निरसून जात नाहींत. हा ठसा राष्ट्राच्या मनावर ठसविण्यासाठीं समर्थांनीं आपलें उत्तरकालीन वाङ्मय लिहिलें.

हें वाङ्मय त्यांनीं कांहींतरी गूढ-गुंजन करून जन-मन-रंजन करण्यासाठीं लिहिलें नाहीं; तर आपली चतुःसूत्री राष्ट्राच्या मनाला पटविण्यासाठीं त्यांनीं लिहिलें. 'मुख्य हरिकथा निरूपण। दुसरें तें राजकारण॥ तिसरें तें सावधपण। सर्वांविषयीं॥ चवथा साक्षेप' अशी ही समर्थांच्या उपदेशांतली चतुःसूत्री आहे. हीच चतुःसूत्री निराळ्या शब्दांत सांगावयाची झाल्यास 'भक्ति, युक्ति, शक्ति व मुक्ति' या चार शब्दांत सांगता येईल. या चतुःसूत्रीला धरूनच दुसऱ्या शब्दांतहि त्यांनीं आपली चतुःसूत्री मांडली आहे ती अशीः—

**॥ आधीं ते करावें कर्म। कर्ममार्गें उपासना॥**
**॥ उपासका सांपडे ज्ञान। ज्ञाने मोक्षाचि पावणें॥**

कर्म-उपासना-ज्ञान-मुक्ति ही चतुःसूत्री म्हणजेच कर्मयोग होय. अर्थातच श्रीसमर्थ हे प्रयत्नवादी, कर्मयोगी संत होते. ज्ञानोत्तरहि साधन—कर्म—सोडूं नये, यांवर त्यांचा मोठा कटाक्ष होता. यास्तव या कर्मयोगाची शिकवण देण्याकरितां समर्थांनीं आपल्या उत्तरवयांतील वाङ्मय लिहिलें. त्यांत 'यत्न तो देव जाणावा' असें प्रतिपादन करून जनतेला प्रवृत्तीचे धडे दिलें. या चतुःसूत्रींतील सूत्रांचा परस्परांशीं संबंध विशद करून दाखविण्याकरितां समर्थ लिहितातः—

**नाहीं उपासनेचा आधार। ते परमार्थ निराधार**
**कर्मेंविण अनाचार। भ्रष्ट होती।** दा. ५-२-५१

ज्ञानोत्तरहि कर्म टाकूं नये असा त्यांचा निश्चित अभिप्राय होता. मुक्तिशिवाय शाश्वतसुख नाहीं हा तात्विक सिद्धान्त त्यांस मान्य असल्यानें मुक्तिचा विरोधी जो प्रपंच त्याची त्यांनीं निंदा केली आहे. तरीपण ज्यांना उपाधींत राहूनहि अलिप्तपण राखतां येते, त्यांनीं उपाधीस कंटाळूं नये असें सांगण्याकडे त्यांचा कटाक्ष होता. 'आपण तरे इतरासि तारो' हेंच खऱ्या

साधूचें लक्षण होय. आपण तेवढा तरतो आणि इतरांस खुशाल बुडूं देतो तो साधूच नव्हे. 'अवघेच तरावे,' 'अवघेचि सुखी असावे' अशी वासना धारण केल्यावर स्वतःच्या सुखासाठीं नव्हे तर इतरांच्या उद्धारासाठीं कर्म करणें प्राप्त आहे अशा अलिप्ततेनें कर्म करणें हा राष्ट्रप्रपंच त्याज्य नसून स्वार्थमूलक, अज्ञानमूलक प्रपंच तेवढाच त्याज्य होय. अर्थातच स्वतः समर्थांनी आपला संकुचित अर्थाचा प्रपंच टाकला खरा, पण आपल्या तपःश्चर्येनें ब्रह्मसाक्षात्कार प्राप्त करून घेतल्यावर आणि 'उपाधीमध्यें मिळो जाणे, आलिप्तपण राखो जाणे' अशी भूमिका ठाम झाल्यावर त्यांनी राष्ट्रोद्धारासाठीं राष्ट्रप्रपंचाची उपाधी जन्मभर केली.

'आधी केलें मग सांगितलें' या न्यायानें समर्थांनी प्रथम महंतपण प्राप्त करून घेतलें आणि नंतर 'महंते महंत करावे। युक्ति बुद्धीनें भरावे भरोनि विखरावे। देशोदेशी' अशा स्वरूपाचा प्रचंड व्याप सुरू केला. राष्ट्रोद्धारार्थ ही जी प्रचंड संघटना त्यांनीं उभारली त्या संघटनेला आधारभूत असेंच वाङ्मय त्यांनीं आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धात निर्माण केलें. समर्थांच्या वाङ्मयनिर्मितीचें हें ध्येय मान्य केल्यावर त्या वाङ्मयांत कवित्व कितपत उतरलें हें पाहात बसणें हा मुद्दा गौण ठरतो. राष्ट्रांतील समाज जागृत करणें, जागृत होणाऱ्या समाजाला उपासनेच्या मार्गाला लावून शक्तिसंपन्न करणें, अशा शक्तिसंपन्न समाजाला 'युक्तिबुद्धीचा' उपदेश करून स्वराज्यप्राप्तीच्या ध्येयार्थ होणाऱ्या प्रयत्नाला हातभार लावण्याची कर्तव्यनिष्ठा पटवून देणें आणि अशा कर्तव्यनिष्ठेनें प्रेरित झालेल्या समाजाला रामराज्याचें सुख मिळून 'अवघेचि सुखी असावे' हें परमोच्च ध्येय सांगणें, हा समर्थकृत वाङ्मयाचा 'पोटस्थ' हेतु होता. हा हेतु सिद्धीस जाण्यासाठीं अवश्य लागणारे गुण त्या वाङ्मयांत आहेत का नाहींत हें पाहणें, हीच त्या वाङ्मयाची खरी कसोटी होय.

समर्थांचे वाङ्मय या कसोटीला उतरत नाहीं असें कोणीच म्हणूं शकत नाहीं. त्यांच्या धीरगंभीर वाणीनें अवघा महाराष्ट्र खडबडून जागा झाला,

धीर धरा धीर धरा, हडबडूं गडबडूं नको,' 'सांडावें भय पोटिचें' अशा आश्वासनानें समाजाला मोठा धीर आला.

॥ मर्दे तकवा सोडूं नये। म्हणजे प्राप्त होतो जय ॥
॥ कार्य प्रसंग समय। ओळखावा ॥
॥ मराठा तितुका मेळवावा। आपला महाराष्ट्र धर्म वाढवावा ॥
॥ ये विषयीं न करितां तकवा। पूर्वज हांसती ॥
॥ भले कुळवंत म्हणावे। ते ही वेगी हजीर व्हावे ॥
॥ हजीर न होतां कष्टावें। लागेल पुढे ॥
॥ देवद्रोही तितुके कुत्ते। मारूनि घालावे परतें ॥
॥ देवदास पावती फत्ते। यदर्थी संशय नाहीं ॥
॥ विवेक विचार सावधपणें। दीर्घ प्रयत्न केलाचि करणे ॥
॥ तुळजावराचेनि गुणें। रामें रावण मारिला ॥
॥ अहो हे तुळजाभवानी। प्रसिद्ध रामवरदायिनी ॥
॥ रामदास ध्यातो मनी। यन्निमित्तें ॥

वर उध्दृत केलेल्या स्वरूपाच्या उपदेशपर गर्जनेनें मृताच्या अंगांतहि संचार होईल, मग चालत्या, बोलत्या, जाणत्या महाराष्ट्राच्या अंगांत वीरश्री भरली असेल तर त्यांत नवल काय!

अशा रीतीनें जागृत झालेल्या समाजांतून जे कार्यकर्ते पराक्रम करूं लागले त्यांनी कर्तव्यभ्रष्ट होऊं नये, आपली पायरी सोडूं नये, भलत्या नादीं लागूं नये याविषयीं इषारा देण्यासहि समर्थ विसरले नाहींत.

॥ आपस्वार्थ उदंड करणें। आणि स्वामीकार्य बुडविणें ॥
॥ ऐसी नव्हेत कीं लक्षणें। सेवकांचीं ॥
॥ सेवकपणाचें मुख्यधर्म। कांहीं नसावें कृत्रिम
॥ कृत्रिम केलिया संभ्रम। कैचा पुढें ॥
॥ सेवक विश्वास दाविती। वैरियाकडे मिळोनि जाती ॥
॥ त्या चांडाळासि गती। कोठेचि नाहीं ॥

असा सेवकांना बोध केला तरी कित्येक सेवक कार्यकर्ते असूनहि अहंपणानें चढून जातात आणि स्वामिकार्य आपल्याविना होणार नाहीं या समजुतीनें स्वामीला अडवून स्वार्थ साधू पाहातात. असल्या स्वार्थी अडवणुकीनें कार्य नासूं नये म्हणून स्वामीलाहि दूरदृष्टीचा इषारा देण्या-इतकी सूक्ष्म व्यवहारदृष्टी समर्थांच्या अंगीं होतीं.

**॥ कामा कारणे ठेविले । काम पाहोनि वाढविले ॥**
**॥ तेही उगेच गर्वे फुगले । कोण्या हिशेबें ॥**
**॥ या कारणें बद्लित जाणे । सेवक आज्ञेच्या गुणे ॥**
**॥ तरीच समर्थपण जाणे । समर्थासी ॥**
**॥ काम नासलें तरी नासावें । परी सेवकाधीन न व्हावे**
**॥ दास म्हणे स्वभावें । बोलिलो न्याय ॥**

व्यवहारांतला इतका बारकावा समर्थ जाणीत असत आणि प्रसंगानुसार सावधपणाचा उपदेश करण्यास विसरत नसत, हें पाहून आश्चर्य वाटतें. असो. अशा प्रकारें ज्यांनी आपल्या उपदेशानें महाराष्ट्रांत क्रान्तीची लाट पसरविली त्या क्रान्तिकारक महंताच्या वाङ्मयांत काव्याचे गुण कित-पत उतरलें हे तुलनात्मक दृष्टीने पाहात बसणें आनाठायीं होय. ‘ कले करितां कला ’ अथवा ‘ काव्यासाठीं काव्य ’ या संकुचित दृष्टीनें काव्याची रचना करणारे कवि आणि—

**॥ प्रसंग हा तडातडी । करा विवेक तांतडी ॥**
**॥ सुचीत व्हा घडी घडी । प्रबोध घ्या खडाखडी ॥**

अशा कठीण प्रसंगांत तातडीनें हाक देऊन ‘ खडे तात्विक बोल ’ कानावर आदळणारा समर्थांसारखा निर्भीड उपदेशक यांच्या वाङ्मयांत काव्याच्या दृष्टीनें तुलना करणेंच उचित नाहीं. तुलना करण्याला उभय-तांची ध्येयें समान असावीं लागतात. जेथें ध्येयांत उघड उघड महदंतर आहे आणि प्रसंगमानहि सर्वथैव भिन्न आहे, तेथें तुलना करीत बसणें व्यर्थ होय. आधीं काव्यालंकार आणि मागाहून उपदेश अशी समर्थांची दृष्टि नसून आधीं ‘ खडे तात्विक बोल ’ आणि त्यांत अनुषंगानें येतील

तेवढे काव्यगुण असाच समर्थांचा खाक्या होता. यास्तव ते केव्हांहि ललित काव्याला साजेलशा शब्दासाठीं अडून बसले नाहींत; त्यांच्यापाशीं शब्दसंग्रह विपुल होता आणि तांतडीच्या उपदेशाच्या प्रसंगांत त्यांनीं जो शब्द वेळेवर सुचला तो राबवून घेतला. 'काम नासलें तरी चालेल पण स्वामीनें सेवकाच्या आधीन होऊं नये.' हें जसें धोरण त्यांनीं कार्यकर्त्यास सांगितलें, तसेंच 'कवित्वगुणाला उणेपणा आला तरी चालेल पण प्रबोधनकारानें शब्दासाठीं अडून बसूं नये' असा प्रकार त्यांच्या काव्यरचनेंत दिसून येतो.

या ठिकाणीं काव्यबोध आणि नीतिबोध यांचा संबंध काय याचा विचार सहजच ओघानें करावा लागतो. नीतिबोध प्रधान आणि काव्य हें गौण होय असेंच विचारी माणसाचें मत पडेल. नीतिबोधांत काव्य साधलें तर दुधांत साखर पडल्याप्रमाणें 'अयं विशेषः' असें मानतां येईल. पण नुसतीच साखर ही कांहीं जीवनसत्व होऊं शकत नाहीं. जीवनसत्व हें दुधांत असतें आणि त्या दुधांत साखर न घातली तरी चालेल, नुसत्या दुधानें मुलाचें शरीरपोषण होतें. त्याचप्रमाणें नुसत्या काव्यगुणांत समाजाचें धारणपोषण करण्या-इतकें जीवनसत्व नसतें. नीतिबोधच समाजाचें धारणपोषण करूं शकतो. मात्र तो नीतिबोध समाजानें हौसेनें, आवडीनें, ऐकावा याकरितां त्याला काव्यगुणाचें शर्करावगुंठन असलेलें चांगलें, याविषयीं वाद नाहीं. नीति-बोधाचा तो अलंकार झाला, पण तो आत्मा नव्हे. अलंकारानें शरीराला शोभा येते, पण शरीराशिवाय नुसते अलंकार काय कामाचे ? यावरून काव्याला स्वयंभू अशी कांहींच किंमत नाहीं असें म्हणण्याचा रोख नाहीं. काव्य ही एक जीवनांत आनंद निर्माण करणारी कला आहे, म्हणूनच तर इतक्या कला निर्माण झाल्या आहेत व त्या वृद्धीही पावत आहेत. हें सगळें खरें असलें तरीं काव्याची व नीतिबोधाची फारकत करून चालत नाहीं. आणि त्या दोहोंतून कोणतें तरी एकच निवडून घ्या असें म्हटल्यास नीतिबोधाला अग्रमान मिळेल.

दुसऱ्या एका दृष्टीनें पाहूं गेल्यास समर्थांचें वाङ्मय काव्याच्या व्याख्येंत बरोबर बसतें असें दाखवितां येईल. 'काव्य म्हणजे उत्कट भावनेनें निघा-

लेले सहजोद्गार ' असे मानल्यास समर्थांचें वाङ्मय जितकें सहजस्फूर्त आहे, तितकें फारच थोड्या कवीचें असतें. पुष्कळसे कवि काव्य करावयास बसतात, याचाच अर्थ त्यांची काव्यनिर्मिति सहजस्फूर्त नसून प्रयत्नकृत असते. समर्थांच्या वाङ्मयांत असा आवर्जून केलेला प्रयत्न कोठेंच नसून त्यांचें सगळें वाङ्मय प्रसंगानुरोधानें सहजोद्गारांतून उमटलेलें आहे.

असो. या तात्त्विक विवेचनांत खोल शिरण्याची आवश्यकता नाहीं. समर्थांच्या वाङ्मयानें महाराष्ट्रांत तीनशें वर्षांपूर्वी केवढी जागृति केली व राष्ट्राला कसें कर्तव्यप्रवण केलें हें त्या वेळचा इतिहासच सांगत आहे. त्यांची त्या वेळची कामगिरी तत्कालीन प्रसंगाला अनुरूप अशी होती याविषयीं तर संशय नाहींच. पण त्या शिकवणीचा सद्यःस्थितींत काय उपयोग? ती शिकवण कालबाह्य झाली नाहीं काय, अशी कित्येकांस शंका येईल. परंतु समर्थांची शिकवण चिरंतन तत्त्वावर अधिष्ठित झाली असल्यानें ती कालबाह्य होऊं शकत नाहीं. त्यांतून देशाच्या दुर्दैवानें प्रस्तुत कालांतहि एक प्रकारचें अराजक माजल्यानें समर्थांचा उपदेश जणूं काय आजच्या परिस्थितीला अनुलक्षूनच केलेला आहे कीं काय, असें वाटूं लागतें. उदाहरणार्थ, ' खबरदार राजा ' हें प्रकरण वाचून आजच्या परिस्थितीशीं ताडून पाहावें.

॥ लाच चोरी बहु झाली । घाला घाली परस्परें ॥
॥ धण्याला नेणवे कांहीं । बेदादी नगरी पहा ॥
॥ धणी तो राहिला मागें । कारबारीच नासिती ॥
॥ पाप हें थोर लोकांचे । सांगावें कवणापुढें ॥
॥ मोठें तें पाप लोकांचे । प्रभु तो जाणता नव्हे ॥
॥ वर्तती शिकविल्या बोलें । तो काय म्हैसमंगळू ॥
॥ खचते काम तें ऐसें । रचते काम ते नव्हे ॥
॥ कारबार बुडाला तो । कोण कोणास पूसते ॥

याच्या उलट रामराज्याचें वर्णन पाहा :—

॥ सदा सर्वदा न्यायु अन्याय नाहीं ॥
॥ नसे हो भुमी वोस ऊदास कांहीं ॥

॥ सुखानंद आनंद उल्हास वाटे ॥
॥ महासुकृती लोक धार्मीक मोठे ॥
॥ पहा बंद निर्बंद कोण्हा असेना ॥
॥ जनी मच्छरु पाहता ही दिसेना ॥

असलें हें ध्येय आजच्या जनतेनेंहि आपल्या डोळ्यापुढें ठेवण्यासारखें नाहीं काय ?

ज्यांना ब्रह्म आणि माया यांचा व्यर्थ काथ्याकूट नको त्यांनीं तो भाग टाकावा. तेवढा भाग वगळला तरी समर्थांच्या मुख्य शिकवणीची हानि होऊं शकत नाहीं. मात्र समर्थांची "**उपासकांसि सूचना। उपासना उपासना**" हीं शिकवण टाकतां येणार नाहीं; कारण उपासना हा आंतरिक शक्तीचा उगम व सांठा आहे. मानवी शक्ति हीं अत्यल्प असल्यानें राष्ट्रोद्धारासारखें प्रचंड कार्य केवळ आपल्या आधिभौतिक शक्तीवर पार पाडतां येत नाहीं. त्या शक्तीला आधिदैविक आणि आध्यात्मिक शक्तीची जोड पाहिजे. हें सर्व प्रचीतीचें बोलणें आहे आणि इतिहास या प्रचीतीची साक्ष देत आहे. या करितांच समर्थांनी–"मुख्य हरिकथा निरूपण। दुसरें तें राजकारण" असें म्हटलें. याचा अर्थ कित्येकजण असा करतात कीं, समर्थांनीहि राजकारणाला दुसरें म्हणजे दुय्यम स्थान दिलें आहे. पण समर्थांच्या मनांतला अभिप्राय तसा नाहीं. धर्मस्थापना व स्वराज्यप्राप्ति यासाठीं 'राजकारण' हें केलेंच पाहिजे; पण ते राजकारण करण्याला जें सामर्थ्य संपादन करावयाचें तें हरिकथा निरुपणानें म्हणजे ईश्वरी उपासनेनें प्राप्त करून घ्यावयाचें. याचाच अर्थ हा कीं, राजकारणाची उभारणी करण्याला ईश्वरोपासना हा पाया आहे. हाच सिद्धांत 'सामर्थ्य आहे चळवळीचें। जो जो करील तयाचें॥ परंतु तेथें भगवंताचें अधिष्ठान पाहिजे' यांत अधिक स्पष्ट केलें आहे. यावरून आजच्या परिस्थितींत आपण समर्थांच्या वाङ्मयापासून काय बोध घ्यावयाचा तें स्पष्ट होईल.

---

# तु का रा म

## प्रा. गं. बा. सरदार

तुकारामांच्या व्यक्तित्वाचा व वाङ्मयाचा आपण विचार करूं लागलों, म्हणजे अत्यंत प्रतिकूल परिस्थितींतून पुढें आलेल्या या शूद्र कवीला मराठी साहित्याच्या वैभवकाळांतहि जी अनन्यसाधारण लोकप्रियता लाभली ती पाहून आपणांस आश्चर्य व अभिमान वाटल्याखेरीज रहात नाहीं. जुन्या मराठी वाङ्मयांतील दहा सर्वश्रेष्ठ साहित्यिकांची नांवें घ्यावयाचीं झालीं, तर त्यांतील पांच नांवें तरी शिवकालांतील निघतील. मुक्तेश्वर, रामदास, रघुनाथ, वामन यांच्यासारखे धुरंधर लेखक ज्या काळांत वाङ्मय-निर्मिति करीत होते त्याच काळांत तुकारामांनीं आपल्या अभंगवाणीचा प्रभाव गाजविला. मुक्तेश्वरांपाशीं अलौकिक प्रतिभेची नैसर्गिक देणगी होती. रामदासांच्या पाठीशीं निष्ठावंत महंतांची प्रबळ संघटना होती; रघुनाथ-पंडिताच्या वाङ्मयाला साहित्यशास्त्राचा व्यासंग उपकारक झाला आणि वामनांच्या ग्रंथांना तर शास्त्राध्ययनाचें भरभक्कम अधिष्टान होतें. यांपैकीं कोणतीच अनुकूलता नसतांना केवळ निष्ठेच्या व तपःश्चर्येच्या जोरावर तुकारामांचें वाङ्मय अल्पावधींतच सर्वतोमुखी झालें. यांतच त्यांच्या काव्याचें वैशिष्टय व थोरवी सांठावलेली आहे.

### काव्याचें स्वरूप

तुकारामांचें सारें लिखाण स्फुट स्वरूपाचें आहे. यामुळें त्या त्या वेळीं अंतःकरणांत उसळलेल्या नानाविध तरंगांचें प्रतिबिंब त्यांत अनायासें पडलें आहे. या प्रासंगिक व स्फूर्तिनिष्ठ वाङ्मयांत आपल्याला प्रवाहीपणा दिसतो, तशीच अंतःकरणाची संवेदनक्षमता व जीवनाची विकसनशीलताहि

आढळते. त्यांनीं स्वतः म्हटल्याप्रमाणें " अनेक बुद्धीचे तरंग । क्षणाक्षण पालटती रंग । " अशी त्यांच्या अभंगांची धाटणी आहे. त्यांत कधीं उत्कट आशावाद डोकावतो, तर कधीं उदासीनतेची व निराशेचीं छाया दिसूं लागते. कुठें आत्मविश्वासाची प्रचीति येते, तर मधूनच दुबळेपणाची बोंच आढळते. एखाद्या अभंगांत सफलतेचे उद्गार ऐकूं येतात, तर दुसऱ्या कांहीं अभंगांत विफलतेची जाणीव व्यक्त होते. " अद्वैताची वाणी । नाहीं ऐकत मी कानीं । ", " अद्वैतीं तो माझें नाहीं समाधान " असें म्हणून ते केव्हां केव्हां द्वैत भावनेची कास धरतात, तर उलट " गोडपणें जैसा गुळ । तैसा देव झाला सकळ ॥ आतां मजीं कवणें परी, । देव सबाह्य अंतरीं ॥ " अशा शद्बांत पुनःपुन्हां अद्वैतनिष्ठेचा पुरस्कार करतात. बौद्धिक व्यापारांतील सुसूत्रतेचा, आंदोलनशील भावजीवनांत बहुधा अभावच असतो. म्हणून तुकारामांसारख्या भावनाप्रधान संतांचें अभंग वाचतांना त्यांतील परस्पर-विरोधी वृत्तींची व वचनांची नीट संगति लावण्याची प्रथम खबरदारी घेतली पाहिजे. त्या शिवाय त्यांच्या वाङ्मयाचें रहस्य उमगणार नाहीं, त्यांच्या व्यक्तित्वाची ओळख पटणार नाहीं.

## तुकारामांचा जीवनक्रम

तुकारामांनीं आपल्या पूर्ववयांत आपली प्रापंचिक जबाबदारी नेटकेपणानें सांभाळली होती. पुढें दुष्काळांत त्यांच्या संसाराची व घरादाराची वाताहत झाली. त्यांना आपली बायकामुलें मृत्यूच्या तडाक्यांतून सोडवितां आलीं नाहींत आणि " काळाची हे उडी पडेल बा जेव्हां । सोडविना तेव्हां माय-बाप । " हें कटु सत्य त्यांना कळून चुकलें. अशा तऱ्हेनें अनपेक्षितपणें संसारांतून उठल्यावर आपला दुःखभार हलका करण्यासाठीं त्यांनीं भक्तीचा रूढ मार्ग स्वीकारला. नामस्मरणाच्या तंद्रीत त्यांनीं आपल्या दुःखमय प्रापंचिक आठवणी बुडवून टाकल्या. त्यामुळें कालांतरानें त्यांना पुन्हा आपली मनःशांती मिळवितां आली. मात्र त्यानंतरहि त्यांनीं तात्कालिक विरंगुळ्यासाठीं पत्करलेलें नामसंकीर्तनाचें व्रत अव्याहत चालू ठेवलें. त्यांच्या वैतागाची वैराग्यांत परिणति झाली. त्यांच्या भक्तीला

विवेकाची जोड मिळाली. मानवी जीवनाचें रहस्य काय हें शोधून काढण्याची जिज्ञासा त्यांना स्वस्थ बसूं देईना. सुखदुःखाच्या व आशानिराशेच्या द्वंद्वांतून मुक्त होण्यासाठीं त्यांचें मन धडपडूं लागलें. त्यासाठीं प्रपंचाकडे पाठ फिरवून त्यांनीं परमार्थाच्या मार्गावर पाऊल टाकलें. हा मार्ग सोपा नाहीं याची त्यांना कल्पना होती. साधकावस्थेंतील या एकाकीपणाची व निराधारतेची जाणीव त्यांच्या अभंगांत वारंवार प्रगट झाली आहे. त्यांच्यापाशीं ग्रंथाध्ययनाची शिदोरी तर नव्हतीच, पण त्यांना गुरुकृपेचा आधारहि नव्हता. "एकला निःसंग फांकती मारग। भितों नव्हे लाग चालावया। तुका म्हणे वाट दावूनि सद्गुरु। राहिला हा दुरु पांडुरंग।" अशा तऱ्हेच्या अगतिकतेस त्यांना तोंड द्यावें लागलें. पण त्यांनीं आपला धीर सोडला नाहीं. "सत्य असत्यासी मन केलें ग्वाही। मानियेलें नाहीं बहुमता।" अशा निर्धारानें त्यांनीं आपला शोध व साधना चालू ठेवली. मात्र अंतःकरणांतील निकोप प्रेरणा आणि मनांतील स्वैरकामना यांतील फरक त्यांनीं कधीं दृष्टिआड केला नाहीं. "तुका म्हणे मना पाहिजे अंकुश। नित्य नवा दिस जागृतीचा." या भावनेनें सतत जागरुक राहून प्रवाहपतितत्व आणि स्वयंकेंद्रितता हीं दोन्ही टोकें त्यांनीं कटाक्षानें टाळलीं. अंतःप्रेरणा व आत्मपरीक्षण या दोन्हीं प्रवृत्तींचा त्यांच्या ठिकाणीं मिलाफ झाला होता. या विवेकशील आणि खडतर साधनेंतच तुकारामांच्या यशाचें मर्म आहे.

तुकारामादि सर्व संतांच्या चरित्रांत चमत्कारांचा सुळसुळाट दिसून येतो. परंतु त्यांनीं स्वतः अशा चमत्कारांचें कधीं बंड माजविलें नाहीं; उलट आपल्या वाङ्मयांत त्यांचा जागोजाग निषेधच केला आहे. इतकेंच नव्हे तर केवळ चमत्कारावर जगणाऱ्या व भोळ्याभाबड्या भक्तांच्या अंधःश्रद्धेचा गैरफायदा घेणाऱ्या संतमहंतांची त्यांनीं रेवडी उडविली आहे. प्रत्यक्ष गुरुसहवास न लाभल्यामुळें ते व्यक्तिपूजेच्या भावनेपासून अलिप्त राहिले. शिवाय त्यांनीं स्वतःहि "मेघवृष्टीनें करावा उपदेश। परि गुरुनें न करावा शिष्य।" असें ब्रीद बाळगलें होतें. म्हणूनच त्यांना गुरुबाजीचा निःसंकोचपणें समाचार घेतां आला. गुरुशिष्यसंबंधांतील अनुग्रहाच्या कल्पनेपेक्षां

सहप्रवाश्यांच्या सहकार्याची भावनाच त्यांना अधिक श्रेयस्कर वाटत होती म्हणून " एक एका साह्य करूं। अवघे धरूं सुपंथ।" या भूमिकेचा त्यांनीं आश्रय केला.

तुकाराम हे सदेह वैकुंठाला गेले अशी सर्वसामान्य समजूत आहे. परंतु देहबुद्धीचा निरास करण्यासाठीं रात्रंदिवस तपस्या करणाऱ्या तुकारामां-सारख्या संतांच्या बाबतींत स्वाभाविक देहत्याग टाळण्याची कल्पना संभवत नाहीं. " तुका म्हणे त्यांनीं। केली वैकुंठ मेदिनी।", " तुका म्हणे आम्हीं मृत्युलोकीं भले। तुझेचि अंकिले पांडुरंगा।" इत्यादि त्यांचे उद्-गारहि त्यांना वैकुंठ सुखापेक्षां विठ्ठलभक्तीचाच हव्यास अधिक होता, याची साक्ष देतात. यामुळें यदाकदाचित् त्यांना सदेह वैकुंठास नेण्यासाठीं खरोखरच एखादें विमान आलें असतें, तरी त्यांनीं तें शिवाजीच्या नजराण्यां-प्रमाणें ताबडतोब परत पाठविलें असतें.

## व्यक्तित्व

तुकारामांचा अध्यात्मिक अधिकार जरी कितीहि मोठा असला, तरी व्यावहारिकदृष्ट्या ते एक भोळेभाबडे, निष्क्रिय व टाळकुटे संत होते अशी पुष्कळांची कल्पना आहे, परंतु त्यांचें कर्तृत्व व साहित्य बारकाईनें तपासलें, तर ते बाणेदार व निष्ठावंत समाजसुधारक होते अशी खात्री पटल्याशिवाय रहात नाहीं. दैनंदिन जीवनांतील लहान–सहान गोष्टींबद्दल जरी ते नेहमीं उदासीन असले, तरी सामाजिक जीवनांतील भल्याबुऱ्या प्रवृत्तींची दखल घेतांना ते अत्यंत जागरुक व चोखंदळ होते. लोकव्यवहाराचें व मनुष्य-स्वभावाचें त्यांना सूक्ष्म ज्ञान होतें. प्रतिष्ठित गांवगुंडांना व सनातनी पंडितांना ते पुरून उरले. दांभिक समाजकंटकांना त्यांनीं आपल्या मर्मभेदी टीकास्त्राची जरब बसविली. दुर्जनांना व्यक्तिशः जरी त्यांनीं सौजन्य दाखविलें, तरीं त्यांच्या दुष्ट प्रवृत्तींची कधीं गय केली नाहीं. "जैसी खड्गाची धार । विठ्ठलचरणीं तुका शूर।" अशी त्यांची तडफदार वृत्ति होती. दीनदुर्बलांशीं वागतांना ते मेणाहून मऊ असले तरी प्रतिगामी शक्तीशीं झगडतांना ते वज्राहूनहि कठिण होऊं शकत.

## शूद्र समाजाचें आशास्थान

तुकारामाच्या वाङ्मयांत भगवद्भक्तीचा गौरव आहे, नामसंकीर्तनाचा उदोउदो आहे. एवढेंच त्याचें वैशिष्ट्य नाहीं तर त्यांच्या अभंगांत त्यांच्या जीवनांतील दुहेरी झगडा प्रतिबिंबित झाला आहे. "रात्रिदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग। अंतर्बाह्य जग आणि मन।" या उक्तींत त्यांच्या प्रगतिशील जीवनाचें स्वरूप व्यक्त झालें आहे. त्यांच्या अंतःकरणांतील एक झगडा सर्व काळांतील मानवाच्या अंतःसंघर्षाचा द्योतक आहे. बुद्धि आणि मन, पूर्वग्रह आणि प्रेरणा विचार आणि विकार, दुर्बलता आणि सामर्थ्य, यांच्यातील नैसर्गिक विरोधांना प्रत्येक साधकाला नेहमींच तोंड द्यावें लागतें. या दृष्टीनें परमार्थ मार्गांतील एक ज्येष्ठ सहप्रवासी म्हणून तुकारामाचे अनुभवाचे बोल सर्वांनाच उद्बोधक व स्फूर्तिदायक वाटतात. त्यांच्या अंतःकरणांतील दुसरा झगडा हा सामाजिक स्वरूपाचा आहे. त्यामध्यें रूढ कल्पना आणि नव्या जाणीवा, जीर्ण संस्कार आणि नव्या प्रवृत्ती यांच्यातील कलहानें तुकारामाचें मन व्यग्र झालेलें दिसून येतें. जुने संस्कार प्रबळ झाले म्हणजे ते सनदशीरपणें प्रचलित मूल्यांची तरफदारी करतात. परंतु रूढीच्या पाशांतून मुक्त होण्या-साठीं धडपडणाऱ्या त्यांच्या मनांतील बंडखोरपणा उफाळून आला म्हणजे त्याच परंपरागत कल्पनांवर ते चौफेर हल्ला चढवितात. या ठिकाणीं त्यांच्या उद्गारांतून दिसून येणारी अगतिकता, असमाधान, त्वेष, आणि रूढि-भंजकता यांत तुकाराम या एका व्यक्तीचेंच मनोगत प्रगट झालेलें नाहीं, तर सगळ्या दलितवर्गांच्या भावना व आकांक्षा सामावल्या आहेत. ज्या क्षेत्रांत पदार्पण करण्याचा शूद्रातिशूद्रांना अधिकार नव्हता, त्या क्षेत्रांतील साधनांचा फोलपणा त्यांनीं बेधडक उघडकीस आणला. कर्मठपणांतील ढोंग त्यांनीं चव्हाट्यावर मांडलें, शाब्दिक पोपटपंचीची त्यांनीं भंबेरी उडविली. आणि चित्तशुद्धीच्या व सदाचरणाच्या भांडवलावर एखादा सामान्य शूद्रही अशा बुभुक्षित कर्मठांना आणि पोटभरू पंडितांना सहज निष्प्रभ करून टाकूं शकतो याचें त्यांनीं सर्व समाजाला प्रत्यंतर आणून दिलें. म्हणूनच तुकारामांचा जीवनक्रम हा प्रयत्नवादाचा एक आदर्श वस्तुपाठ आहे.

विद्येच्या आणि वाङ्मयाच्या क्षेत्रांतील हें लोकोत्तर यश कनिष्ठ जातींतील लोकांना अभिमानास्पद व प्रोत्साहक झालें असल्यास नवल नाहीं. डॉ. आंबेडकरांसारखा एखादा हरिजन नेता मध्यवर्ती सरकारांत मंत्री झालेला पाहून जसें अस्पृष्ट वर्गांत नवें चैतन्य निर्माण होतें, आपल्या भवितव्याविषयीं जशी त्यांना नवी आशा वाटूं लागते, तद्वतच तुकारामासारख्या शूद्र कवीचा जयजयकार ऐकून त्या काळच्या शूद्रांना एक नवें आशास्थान गवसलें.

## रामदास व तुकाराम

रामदास व तुकाराम यांची तुलना करतांना पुष्कळदां तुकारामांवर अन्याय होतो. रामदासांनीं राजकारणाचें महत्त्व ओळखून परधर्मीयांच्या गुलामगिरींत खितपत पडलेल्या लोकांना प्रतिकाराची व पराक्रमाची शिकवण दिली. त्यामुळें रामदास हे इतर संतांपेक्षां श्रेष्ठ आहेत असें आपण मानतों. तसेंच तुकारामांनीं राजकारणाकडे पाठ फिरवून समाजकारणां-तच लक्ष घातलें म्हणून त्यांना आपण साहजिकच कमी लेखतों. परंतु असें करतांना या दोन्ही संतांची सामाजिक पार्श्वभूमि आपण मुळींच विचारांत घेत नाहीं. शिवाय त्याकाळीं राजकारणाचें क्षेत्र आजच्या मानानें फारच मर्यादित होतें, ही गोष्टहि आपण जमेस धरीत नाहीं. तुकाराम हे जातीनें शूद्र व व्यवसायानें वैश्य होते. या वर्गाच्या राजकीय आकांक्षा अद्याप जागृत व्हावयाच्या होत्या; पण सामाजिक विषमतेचें शल्य मात्र त्यांच्या अंतःकरणांत सतत सलत होतें. त्यावेळच्या शासनपद्धतींत गांवचा पाटील व कुळकर्णी यांच्याखेरीज बाकीच्या सर्वसामान्य जनांचा राजसत्तेशीं किंवा राजकीय घडामोडींशीं फारच थोडा संबंध येत असे. त्यामुळें एक राजा जाऊन दुसरा राजा आला, किंवा एक राजवट संपून दुसरी राजवट आली, तरी त्यामुळें खालच्या थरांतील लोकांच्या दैनंदिन जीवनांत विशेष फरक पडत नसे. कित्येक राजवटी आल्या आणि गेल्या, परंतु शूद्रातिशूद्रांची आर्थिक पिळवणूक थांबली नाहीं. किंवा बौद्धिक कुचंबणाहि कमी झाली नाहीं. उलट मुसलमानी अमदानींत ब्राह्मणांचा राजाश्रय तुटला, तसेंच मराठे

जहागीरदारांची सत्ता संपुष्टांत आली. अशा रीतीनें या वरिष्ठ वर्गाचे हित-संबंध राजकारणाशीं प्रत्यक्ष निगडित असल्यामुळें त्यांना त्याबद्दल आस्था वाटणें स्वाभाविक होतें. परंतु खेड्यापाड्यांतील बहुसंख्य शूद्रांच्या प्रगतीला सामाजिक निर्बंधच पदोपदीं नडत होते. त्यांचा सर्व व्यवहार राजकीय स्थित्यंतरापासून अलिप्त होता. कारण निरानिराळ्या राजवटींत ग्राम-संस्थांचें क्षेत्र बरेंचसें अबाधित राहिलें. म्हणून तुकारामादि संतांनीं राज-कारण वर्ज्य मानून धार्मिक समतेचा पुकारा केला व सामाजिक विषम-तेची तीव्रता कमी केली. ब्रह्मविद्या ही विशिष्ट वर्गाची मिरास असूं नये, पांडित्य व कर्मठपणा यावर माणसाचा मोठेपणा मोजला जाऊं नये, देवाच्या दरबारांत तरी हा ब्राम्हण हा, शूद्र, हा उच्च हा नीच, अशा भेदभावाला जागा नसावी असें शूद्रातिशूद्रांना वाटे. तुकाराम हे या दलितवर्गाचे प्रतिनिधी असल्यामुळें त्यांनीं वरील तत्त्वांचा निर्भयतेनें प्रचार केला. रामदास हे वरिष्ठ वर्गाचे–ब्राह्मणक्षत्रियांचे प्रतिनिधि असल्यामुळें त्यांनीं आपल्या शिकवणींत साहजिकच राजकारणावर भर दिला. मात्र त्यांचें राजकारणहि निवृत्तिप्रधान व अध्यात्मनिष्ठच होतें. राजकारण हें कितीहि आकर्षक व सद्यःफलदायक असलें, तरी बहुजन समाजाच्या दृष्टीनें सामाजिक प्रश्नच अधिक निकडीचे व मूलगामी स्वरू-पाचे होते. तुकारामांनीं त्यांकडे कधींच दुर्लक्ष केलें नाहीं.

## जातिवंत साहित्यिक

तुकाराम हे जातिवंत साहित्यिक होते. शब्दांच्या माध्यमावर त्यांची दृढ श्रद्धा होती. "तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेउनि बाण फिरें" अशा लढाऊ बाण्यानें ते अभंगरचना करीत. समाजधारणेला शस्त्रबळाइतकीच शब्दसामर्थ्याचीहि गरज आहे. शस्त्र हें पराक्रमाचें अधिष्ठान असलें, तर शब्द हें त्या पराक्रमाला प्रेरणा देणाऱ्या विचारसरणीचें वाहन आहे. शब्दाचें माध्यम वापरावयाचें कीं शस्त्राचें माध्यम पत्करावयाचें हें ज्याच्या त्याच्या प्रकृतीवर व परिस्थितीवर अवलंबून आहे. पण कोणतेंहि माध्यम एकदां पत्करलें, कीं त्याच्या उपासकांनीं त्यावरील आपली निष्ठा रेसभरहि ढळूं देतां कामा नये. "आम्हां घरीं धन शब्दांचीच रत्नें"

"नव्हे एकदेशी शब्द हा उखता। ब्रह्मांडापुरता घेईल त्यासी।" अशा तऱ्हेने तुकारामांनीं जागोजाग शद्बाचा गौरव केला आहे. त्यांच्या वाङ्मयांत उसनेपणा किंवा कृत्रिमता नाहीं. "जोडिली अक्षरें। नव्हती बुद्धीचीं उत्तरें।", "तुका म्हणे भरा। आहे मुळींचाचि खरा।" अशी आपल्या वाचकांना त्यांनीं ग्वाही दिली आहे. मात्र आपण केवळ निमित्तमात्र आहोंत, "बोलविता धनी" पांडुरंगच आहे असें ते वारंवार म्हणत. कवि प्रतिभेचें स्वरूप जर आजहि आपणांस गूढ व अनिर्वचनीय वाटतें, तर त्याकाळीं "माक्षिये युक्तीचा नव्हे हा प्रकार। मज विश्वंभर बोलवितो।" असें तुकारामांनीं म्हणावें यांत कांहींच आश्चर्य नाहीं.

## ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ व तुकाराम

ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ व तुकाराम हे सगळे विठ्ठलभक्त खरे, परंतु प्रत्येकाच्या वाङ्मयाची घडण अगदीं वेगवेगळी आहे. ज्ञानेश्वरांच्या साहित्यांत विचारांची सखोलता व सुभगता आहे, कल्पनेचें ऐश्वर्य व उत्तुंगता आहे. नामदेवांच्या काव्यांत भावनेची आर्तता व उत्कटता आहे; एकनाथांच्या ग्रंथांत पांडित्याचा प्रकर्ष आहे, त्याबरोबरच भूतदयेचा उमाळाहि आहे. तुकारामांच्या अभंगांत आत्मप्रकटीकरणाची धडपड आहे; तशीच पाखांडखंडणाची ईर्षा आहे. आपापल्या कार्याला अनुरूप अशीच या सर्वांची शैली आहे. ज्ञानेश्वरांनीं अद्वैतनिष्ठेच्या खंबीर पायावर भागवत धर्माची उभारणी केली. नामदेवांनीं कीर्तनसंस्थेच्या द्वारें बहुजन समाजांत भक्तीचा जिव्हाळा निर्माण केला. आचारधर्माचें तपशीलवार निरूपण करून एकनाथांनीं वेदांत आणि व्यवहार यांची सांगड घातली. दांभिकतेवर कोरडे ओढून तुकारामांनीं नीतिमूल्याचें संगोपन केलें. नुसतें तत्त्वज्ञान हें प्रसंगीं कोरडें असूं शकतें. नुसती भावना ही बहुधा आंधळी असते. नुसत्या आचारांत कालांतरानें यांत्रिकता येते. म्हणून तत्वज्ञान, भक्ति आणि आचार यांना सामाजिक व्यवहारांतील व्यापक नीतिमूल्याची जोड लाभल्याशिवाय मानवी जीवनाला पूर्णता नाहीं. या दृष्टीनें तुकारामांचें नीतिसंवर्धनाचें कार्य सामाजिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचें आहे.

# वे णा बा ई

## डॉ. कमलाबाई देशपांडे

समर्थ म्हणतात, "जें कांहीं आपणास ठावें। तें तें इतरांस सांगावें। शहाणे करून सोडावे, सकळ जन ॥ १ ॥" माझ्या बाबतींत मात्र वेगळी स्थिति आहे. 'आपणास कांहीं ठावें आहे' व तें लोकांस सांगून 'आपण त्यांना शहाणे करून सोडूं' ही माझी समजूत नाहीं. उलट 'जें कांहीं आपणास नसतें ठावें। तें जरि अभ्यासिलें वाटे जावें। तरी आवश्य व्याख्यानामंत्रण स्वीकारावें। त्या विषयाचें॥" अशी माझी भूमिका आहे. संतवाङ्मयाबद्दल मला गोडी असली व आळश्यावर येणाऱ्या गंगेप्रमाणें तें लहानपणापासून घरीं दारीं कानांवर पडत असलें तरी गोडी म्हणजे व्यासंग नव्हे हें आपण जाणतांच. फारतर व्यासंगाला अनुकूल अशी मनाची भूमिका म्हणता येईल व म्हणूनच आपले हातून या दिशेनें व्यासंग, निदान व्यासंगाची सुरवात व्हावी या हेतूनें मी हें थोडेसें परमुलुखांत पाऊल टाकलें आहे. तेथें तें स्थिरावतें कीं कसें हें आजच कोण सांगूं शकणार ! असो.

व्याख्यानाला विषय देतांना चालकांनीं 'मुख्य संत कवयित्री' असा सुचविला होता व या कवयित्रींमध्यें जनाबाई, मुक्ताबाई, वेणाबाई व बहिणाबाई इत्यादिकांचा समावेश करावयाचा होता. प्रत्यक्ष अभ्यास कर-तांना हें फार मोठें क्षेत्र आहे असा मला अनुभव आला व म्हणून 'मुख्य संत कवयित्री' हा शब्दसमूह मी एकवचनी समजून एक प्रमुख संत कवयित्री म्हणजे 'वेणाबाई' असा समजलें व तिच्या वाङ्मयाचाच विचार आतां करणार आहें.

कवीचें वाङ्मय समजण्यास कवीचें जीवन कळावयास हवें असें मला तरी वाटतें. " कोणीही पुसणार नाहिं कवि तो होता कसा आननी " असें केशवसुत म्हणाले. कवीच्या मुखाची चौकशी केल्याखेरीज इतर काव्य कळलें, तरी वरील ओळींतील त्वेष कळण्यास, कवीला रूपसंपदेचें देणें नव्हतें व त्याला ' सदा दुर्मुखलेला ' असें गुरुजींनीं वर्गांत संबोधल्यामुळें वरील कविता लिहिली गेली हें कळलें तरच कवितेंतील त्वेष रसिकाला कळतो. हें ' आनना ' बद्दल झालें तर मग ' जीवना ' बद्दल कळणें याहून कितीतरीपट आवश्यक ठरतें आणि म्हणून वेणाबाईच्या कवितेचा रसास्वाद घेण्यापूर्वी तिच्या जीवनाची माहिती कळणें जरूर आहे.

' वेणाबाई ' ही कोल्हापुरच्या देशपांडे घराण्यांतील. वेणाबाईचे प्रशिष्य गिरिधरस्वामी आपल्या ' समर्थ प्रताप ' ग्रंथांत पुढील माहिती देतात.

बापजी गोसावी वेणुबाईजनक।
ज्यासी साह्य श्रीरघुनायक॥
बाळपणीं उपदेशिले श्लोक।
अध्यात्मरामायणाचे। स. प्र. १० - ३३
काशिराज-कन्यासंतति वेणाबाई
एकनिष्ठ उपासक भक्तराज पाही। स. प्र. १०-३४

इत्यादि. यावरून त्या सुसंस्कृत घराण्यांतील कन्यका होत्या व त्याकाळीं सर्व स्त्रियांना सरसहा न येणारी लेखन वाचनाची कला त्यांनी अवगत होतीसें दिसतें. आजोळ व माहेर रामउपासक; मुलीला कौतुकानें का होईना पण अध्यात्मरामायणाचे श्लोक म्हणण्यास शिकविलेले. सहज टाकलेलें हें बीज रुजलें. वैधव्याच्या प्रखर तापानें तें सुकावयाच्या ऐवजीं मुरलें व उफाळून वाढीस लागलें. यावेळीं यांचें वय काय असावें हें कळत नाहीं; पण समर्थभक्त देव हे वेणाबाईचा जन्मशक १५४९ ( इ. स. १६२७ ) मानतात व म्हणून आपणहि तोच स्वीकारावयास हरकत नाहीं. यांचें सासर मिरजेस. बालवयांत वैधव्य आलेलें, दुःख विसरण्यासाठीं पूर्वी रुजलेली रामभक्ति आठवली व आधींच थोडेसें परमार्थाकडे

झुकलेलें मन त्याकडे पूर्ण वळलें. धार्मिक ग्रंथवाचनाची गोडी लागली. रामदासस्वामी पुरश्चरण व तीर्थाटण संपवून सातारप्रांतीं आले व त्यांनीं संघटनेची सुरवात केली. त्यावेळीं भिक्षेसाठीं हिंडत असतां ते मिरजेस आले व वेणाबाईच्या घरीं येऊन त्यांनीं पुढील श्लोक म्हटला,

" मुखीं राम त्या काम बाधूं शकेना । "
" गुणें इष्ट धारिष्ट त्याचें चुकेना । "
" हरीभक्त तो शक्त कामास मारी । "
" जगीं धन्य तो मारुती ब्रह्मचारी । "

व तुंबाभर दुध मागितलें. समोर दूध होतें पण तें दुसऱ्या कोणास द्यावयाचें होतें. वेणाबाई सासूबाईची अनुज्ञा मागण्यास घरांत गेल्या परंतु त्या बाहेर येईपर्यंत समर्थ निघून गेले होते. ही पहिली भेट. पुन्हां कांहीं दिवसांनीं समर्थ भिक्षेस आले. वेणाबाई पोथी वाचीत बसल्या होत्या त्यावेळीं मुलीचे हातांत भागवत ग्रंथ पाहून समर्थांनीं कौतुकानें प्रश्न विचारला कीं, 'मुली, तूं वाचतेस तें समजतें काय?' वेणाबाईनीं, " समजत नाहीं पण प्रयत्न करतें " असें उत्तर दिलें; त्यावेळीं जीव म्हणजे काय, शिव म्हणजे काय इ. प्रश्न वेणाबाईनीं विचारले व तेच प्रश्न अभंगांत गुंफून त्यांचीं उत्तरें ही पुढें त्याच अभंगवृत्तांत समर्थांनीं रचिलीं व वेणाबाईस दिलीं अशी आख्यायिका आहे. भिक्षा मागण्याचे वेळीं अभंगरचना झाली अगर नाहीं हें नक्की सांगतां आलें नाहीं तरी प्रश्नोत्तरें झालीं असणार व त्या स्मृतीनें पुढें समर्थांनीं ती पद्यरचना केली असणार हें उघड दिसतें. यानंतर वेणाबाई समर्थसंप्रदायाकडे जास्त वळल्या. कोल्हापुरास माहेरीं त्या आल्या त्यावेळीं गांवामध्यें समर्थांची कीर्तनें चाललीं होतीं. तीं त्या नेमानें ऐकत व पुढें त्यांचे शिष्यत्वहि त्यांनीं स्वीकारलें. वृत्ति वैराग्यशील असली तरी वय विरुद्ध म्हणून त्यांच्या वैराग्यशीलतेबद्दल लोकांना विश्वास वाटेना.

यथा स्त्रीणां तथा वाचां साधुत्वं दुर्जनो जनः

हें त्रिकाल खरें आहे. वर्तमानकाळींसुद्धां ही वस्तुस्थिति दिसते. मग तीनशें वर्षांपूर्वी ज्यावेळीं स्त्री ही सर्वस्वी परावलंबी होती, स्त्री व पुरुष यांचें

बाबतींत नीतिनियम वेगवेगळे होते (double code of morality), 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' हें वचन ज्यावेळी सर्वमान्य होतें, त्यावेळीं असा अपवाद उत्पन्न व्हावा यांत आश्चर्य नाहीं. ठरलेल्या रूढ मार्गाला सोडून ज्या स्त्रिया थोडासा वेगळा मार्ग अवलंबूं लागल्या त्या सर्वांना त्या दिव्यांतून जावें लागलें. संत मिराबाई, संत सखू, संत कान्होपात्रा यांच्या आयुष्यात असेच प्रसंग आले व त्यांची भक्ती कसाला लागल्यावर मगच त्या वंदनीय ठरल्या. लहान वयाची बालविधवा गुरूचे उपदेशानें मोहून त्यांचें शिष्यत्व स्वीकारते, हें आईबापांना व आप्तेष्टांना नावडलें असणार यांत शंका नाहीं. मग विषप्रयोगाबद्दल आख्यायिका खरी असो वा खोटी असो. 'सबसे जीव प्यारा' हें खरें; अपत्यप्रेम सर्वांत जोरदार हेंही खरें आहे; तरी इतर कोणतीही भावना अशी नाहीं कीं जी जीव व अपत्यप्रेम याहून बलवत्तर होणार नाहीं. पतिनिष्ठा, स्वामिनिष्ठा, धर्मनिष्ठा, कुलप्रतिष्ठा, या सर्व निष्ठा प्रसंगविशेषी बलवत्तर झालेल्या साध्वी रमाबाई, पन्नादाई संभाजी, मिराबाई यांचे उदाहरणामध्यें आपण पाहतों. तेव्हां त्या काळाचा विचार करतां ती गोष्ट अशक्यही मानण्याचें कारण नाहीं. आख्यायिका पुढें सांगते कीं, समर्थांनीं त्यावेळीं वेणाबाईस दर्शन दिलें, त्यायोगें तिचें विष उतरलें व आप्तांचा सहवास सोडून समर्थांचे शिष्यत्व उघड पतकरून ती समर्थांच्या संघटनेंत समाविष्ट झाली. एकप्रकारें हें उपनयन म्हणण्यास हरकत नाहीं. समर्थांचें मठांतील काम करावें आणि तेथें चालणाऱ्या प्रवचन कीर्तन श्रवणांत गुंगावें, मनन, चिंतन करावें असें त्यांचें अध्ययन सुरू झालें. आधींच आवडत असलेल्या वेदांत विषयाची संपूर्ण शिकवण त्यांना येथें मिळाली. घरची रामोपासना होतीच. त्यांत येथील राहण्यानें भर पडून वृत्ति रामाकार झाली. सुप्त असलेला काव्याचा अंकुर येथें वर आला. छापण्याची कला नसलेल्या त्या काळांत वाचलेलें लक्षांत राहण्यास वृत्तबद्ध रचनेची मदत होई व म्हणूनच आत्मचिंतनांत गुंगणारा कोणीही भक्त असो तो थोडी फार पद्यरचना करीच. वेणाबाईचा हा गुण त्यावेळीं समर्थांच्या लक्षांत आला व जेवणाची, कोठीची व्यवस्था ठेवणें इत्यादि कामें ती इतर सेवकांप्रमाणें करीत असतांनाच समर्थ वेणाबाईस प्रवचनें

व कीर्तनें करण्याचें शिक्षण देऊं लागले. अशा तऱ्हेनें तिची तयारी झाल्या-नंतर म्हणजे समर्थांची व त्यांची भेट झाल्यानंतर सुमारे सहा वर्षांनीं त्यांना मिरजेस मठस्थापना करून राहण्यास व संप्रदाय वाढवून शिष्य तयार करण्यास समर्थांनीं आज्ञा दिली. या वेणाबाईची शिष्या बाईयाबाई व त्यांचा शिष्य गिरिधर स्वामी; यांनींच पुढें ' समर्थ प्रताप' हा ग्रंथ लिहिला. यावरून स्वतः वेणाबाई महंत पदवीस पोंचल्या एवढेंच नव्हे तर त्यांची शिष्यपरंपराही पुढें वाढली व कर्तबगार निघाली असें दिसतें. वेणाबाईंना महंती करावयास मिरजेस पाठविलें या समर्थांच्या कृतींतही औचित्य दिसतें. ज्या मिरज कोल्हापूर प्रांतांतून बाईला एकवेळ अपवाद घेऊन आप्त सोडून यावें लागलें, तेथेंच पुन्हां जाऊन त्या लोकांचा विश्वास त्या मिळवूं शकल्या हें पहिल्या लोकांच्या अविश्वासाला अप्रत्यक्ष उत्तरच होतें.

वेणाबाईनीं केलेल्या ग्रंथरचनेचा परामर्ष आपणांस पुढें सविस्तर घ्यावयाचा आहेच; पण त्यांच्या प्रवचन कीर्तनाबद्दलच्या आख्यायिकाही उल्लेखनीय आहेत. एकदां एक काशीचे पंडित शिवाजीकडे आले व राम-दासांबरोबर वाद करण्यास निघाले. समर्थ पंढरपुरास होते तेथें दोघांची भेट झाली; तेव्हां समर्थांनीं वेणाबाईस पोथी वाचण्यास बोलाविलें व 'बाई, ज्यांत चौदा ब्रह्मांचा अन्वय झाला आहे तो समास वाच' असें सांगितलें. बाईनीं सातव्या दशकाचा तिसरा समास वाचला. इ. स. १६७६ मध्यें सज्जनगडावर सर्व संतांना आमंत्रणें दिली. शिवाजीराजे आले होते. अशा वेळीं सर्व संतांनीं कीर्तनें केली, खुद्द शिवाजी महाराजांनीही कीर्तन केलें. त्यावेळीं कीर्तन केलेल्या संतांचे यादींत वेणाबाईचें नांव येतें. यावरून त्यांची कीर्तनाची चांगली तयारी असावी असें दिसतें. त्यांच्या उपलब्ध ग्रंथामध्यें वारंवार श्रोत्यानें शंका विचाराव्या व वक्त्यानें त्यांचें निरसन करावें अशा तऱ्हेची रचनापद्धती आढळते; तीही त्यांच्या प्रवचन, कीर्तनाच्या संपत्तींचीच द्योतक आहे. किंबहुना ही समर्थसंप्रदायाचीच खूण म्हणण्यास हरकत नाहीं. दासबोधांत अशीच पद्धति आहे. समर्थही कीर्तनें करीतच आणि वेणाबाईच्या ग्रंथरचनेवर दासबोधाची सावली असणें स्वाभाविक आहे.

बाई कर्तबगार खऱ्या पण अशक्त. प्रथम वैधव्यामुळें व नंतर संप्रदाय प्रवेशामुळें कष्टकारक राहणी. विषप्रयोगाची गोष्ट खरी असेल तर त्यामुळेंहि बाईच्या प्रकृतीवर परिणाम होऊन ती अशक्त झालेली असणें सहज वाटतें. नेहमीं वसती मिरजेस परंतु दर रामनवमीस त्या चाफळास येत. पुढें सज्जनगडाची स्थापना झाल्यावर त्या तेथेंही येत. इ. स. १६७८ मध्यें त्या सज्जनगडीं आल्या असतां समर्थांनीं त्यांना कीर्तन करण्यास सांगितलें. चैत्र वद्य १४ सह अमावास्येचा तो दिवस होता. वेणाबाईनीं कीर्तन केलें; आरती झाली व शेवटीं गुरुचरणीं नमन करण्यासाठीं त्यांनीं खालीं मस्तक टेकलें आणि त्याच क्षणीं त्या समर्थचरणीं लीन होऊन गेल्या.

दासविश्रामधामकार ( १११-९८ ) म्हणतात—

सोपुनि विणा तो सद्गुरुकरीं । वाहूनि मस्तक पदाब्जावरी ।
प्राणज्योतीते काढूनि झडकरी । सद्गुरुहृदईं मिळविली ॥

ही झाली वेणाबाईची जीवनकथा. तारीखवार आंकड्यांत बोलावयाचें तर असें म्हणतां येतें कीः—

इ. स. १६२७ मध्यें जन्म.

" " १६५० समर्थांची भेट व शिष्यत्व स्वीकार

" " १६५६ मिरजेस मठस्थापना

" " १६७८ मृत्यू.

ह्या सर्व तारखा बरोबर आहेत असें मानलें तर असें म्हणावयाचें की, त्यांचें वय सुमारें २३।२४ असतां समर्थांचें शिष्यत्व त्यांनीं स्वीकारलें. पुढें सहा वर्षांनीं म्हणजे तिशीच्या सुमारास त्या मिरज मठाच्या महंत झाल्या व तेथें सुमारें २२ वर्षे संप्रदाय वाढवून वयाच्या बावन वर्षांचे सुमारास मृत्यू पावल्या.

दृष्टांत देऊन हीच गोष्ट याहून सुगम तऱ्हेनें सांगावयाची म्हणजे वेणाबाई शिवाजीच्या नुसत्या समकालीन नव्हत तर समान वयाच्या. 'शिवाजीचा जन्म इ. स. १६२७ सालीं शिवनेरी किल्ल्यांत झाला,' असें

मी लहानपणीं घोकलेलें; त्यामुळें मला त्या शिवाजीच्या बरोबरीच्या वाट-तात. पण शिवजन्माची दुरुस्त तारीख म्हणजे १६३० साल घोकणाऱ्या माझ्या पुढच्या पिढीला त्या शिवाजीपेक्षां तीन वर्षांनीं वडील वाटणार. म्हणजे त्या शिवाजीची वडील बहिण शोभायला हरकत नाहीं. इ. स. १६४६ मध्यें शिवाजीनें तोरणा घेऊन स्वराज्याची मुहूर्त मेढ रोविली व त्यानंतर चार वर्षांनीं म्हणजे इ. स. १६५० च्या सुमारास वेणाबाईंनी स्वगृहत्याग करून समर्थभक्तीची मुहूर्त मेढ रोविली आणि १६५६ मध्यें मठस्थापनेचे रूपानें आपली गादी स्थापिली. शिवाजीचा राज्यारोहण उत्सव १६७४ मध्यें पाहून पुढें चार वर्षांनी म्हणजे १६७८ मध्यें त्यांनीं इहलोक सोडला. शिवाजीचे आधीं तीन वर्षें त्या जन्मास आल्या व शिवाजीचे आधीं दोन वर्षें मृत्यु पावल्या.

याचवेळीं शिवकालीन संतकवयित्री बहिणाबाई हिचाही उल्लेख करणें अप्रस्तुत होणार नाहीं. वेणाबाई देशपांड्यांची तर ही कुळकर्ण्यांची मुलगी. हिचा जन्मकाळ इ. स. १६२८ व मृत्युकाळ इ. स. १७०० आहे. म्हणजे वेणाबाई व बहिणाबाई अगदीं एका वयाच्या होतात. आणखी सादृश्य म्हणजे दोघींची वस्ती कोल्हापुरांत होती. अर्थात् अगदीं एकावेळीं नव्हे पण दहापांच वर्षांच्या फरकानें. भक्तिरसाची गोडी लागणें, सद्गुरुच्या उपदेशाची ओढ लागणें व त्यासाठीं आप्तस्वकीयांकडून छळ सोसून आपली पात्रता सिद्ध करणें या दोन गोष्टी दोघींच्या आयुष्यांत कोल्हापूर क्षेत्रींच घडल्या. वेणा-बाईस आईबापांचा छळ सोसावा लागला तर बहिणाबाईस नवऱ्याकडून मारहाण करून घ्यावी लागली. दोघींना सद्गुरुदर्शन कोल्हापुरांतच घडलें. वेणाबाईस विषप्रयोग होऊन मृत्यूचे दारीं ती पडली असतां समर्थ भेटले व बहिणाबाई आवडत्या वासराचे मृत्यूमुळें बेशुद्ध असतां स्वप्नांत तुकारामबुवा भेटले. वेणाबाई समर्थांचे शिष्यत्व स्वीकारून त्यांचे परिवारांत चाफळास आली तर बहिणाबाई पतिसहवर्तमान देहूस जाऊन राहिली. तुकाराम-बुवांच्या मृत्यूनंतर कांही दिवस त्या समर्थांचे परिवारांतही रहात होत्या. आयुष्य मात्र त्यांना भरपूर होतें. या बहिणाबाई, वेणाबाई व रामदास स्वामी यांचे निर्याणानंतर १८।२० वर्षांनीं मृत्यू पावल्या. ही तुलना

आतां करण्याचें कारण असें कीं दोघींच्या कवित्वाची व भाषेची तुलना करतांना त्याचा उपयोग आहे.

## वेणाबाईची ग्रंथसंपदा

आतांपर्यंत आपण वेणाबाईच्या जीवनाची माहिती करून घेतली. यापुढें त्यांचे ग्रंथसंपदेकडे वळलें पाहिजे. वेणाबाईच्या ग्रंथसंपदेची पहिल्यानें गणना करून नंतर बहिरंग व अंतरंग परीक्षण केलें पाहिजे. वेणाबाईची ग्रंथसंपदा इतर संतांप्रमाणें समुद्रासारखी अमर्याद पसरलेली नाहीं. एकादी लहानशी नदी रानावनांतून खळखळत चालावी तशी आहे. त्यांचे नांवावर पुढील ग्रंथ मोडतात.

१ स्फुट आख्यानें, पदें इ.

२ सीतास्वयंवर.

३ रामायण.

४ गद्यनिबंध—पंचीकरण.

वरीलपैकीं पंचीकरण हें गद्य निबंध स्वरूपाचें आहे. तें लोकांसाठीं नसून स्वतःच्या अभ्यासासाठीं केलेलीं टिपणें आहेत. त्यावरून वेदांत विषयाचा अभ्यास त्यांनीं कसा केला हें कळतें. प्रवचन कीर्तन त्या यशस्वी तऱ्हेनें करीत तेव्हां असा व्यासंग त्याला करावा लागला हें उघड आहे.

त्यांच्या फुटकळ कवितेपैकीं बरीचशीं रामस्तवनपर आहे. एक आख्यान कृष्णस्तुतिपर आहे. विषय भीष्म शरपंजरीं पडले असून पडल्या पडल्या ते कृष्णस्तुति करतात असें वर्णन येतें. पण रामगुणवर्णनांत बाई जशा रंगतात तशा कृष्णवर्णनांत रंगत नाहींत व कृष्ण अगर इतर दैवतांच्या स्तुतिपर त्यांनी या आख्यानाखेरीज इतर कांहीं लिहिलेलेंही नाहीं. या पद्यरचना सुमारें सत्तर एकाहत्तर होतात. त्यापैकीं बरीच सामान्य तऱ्हेची कविता रचनेच्या सरावासाठीं लिहिलेल्या खर्ड्याप्रमाणे वाटते. पण बाई जेथें अनुभव लिहितात तें पद एकदम मनाची पकड घेतें. उदाहरणार्थ, 'आका गेली गांवा!'

## रामगुहक संवाद व कौल

फुटकळ कवितामध्येंच सामावलेलीं दोन लहान आख्यानकें आहेत. आख्यानकें मूर्ति लहान पण कीर्ति थोर अशीं आहेत व तीं म्हणजे 'रामगुहक संवाद' आणि 'कौल'. यांची चर्चा पुढें प्रसंगानें येईलच. मोठे स्वतंत्र ग्रंथ असें ज्यांना म्हणतां येईल असे ग्रंथ दोन. एक सीतास्वयंवर व दुसरा रामायण.

(१) सीतास्वयंवर–कोणत्याही वाङ्मयांत 'स्वयंवर' हा प्रसंग काव्यरचनेस पोषक असतो. मराठी वाङ्मयाकडे नजर फेकिली तरी रुक्मिणीस्वयंवराची एक परंपराच दिसते. तसेंच सीतास्वयंवराचे बद्दल. भागवत पंथांतील आणि महानुभाव वाङ्मयांतील रुक्मिणीस्वयंवरें प्रसिद्ध आहेत. रामसंप्रदायी लोक सीतास्वयंवर भक्तीनें गातात. त्या स्वयंवरांत स्त्रीनें लिहिलेला ग्रंथ हें प्रस्तुत पुस्तकाचें आणखी एक वैशिष्ठ्य आहे.

ग्रंथाचे एकंदर चवदा समास म्हणजे अध्याय असून ओवीसंख्या १५४६ भरते (खालीं टीपेंत बाडांतील संख्या १५६८ असें दिलें आहे).

ग्रंथाची सुरवात केव्हां व कोठें झाली याचा निर्देश नाहीं. तसेंच शेवटीं समाप्तीचा दिवस कार्तिक शुद्ध चतुर्दशी असा लिहिला आहे. परंतु वर्ष दिलें नसल्यानें ग्रंथ केव्हां समाप्त झाला हेंही कळत नाहीं.

(२) रामायण–हा ग्रंथ वेणाबाईनीं सुंदरकांडापर्यंतच लिहिला आहे. पहिलीं पांच काण्डें, १ आदि काण्ड, २ अयोध्या काण्ड, ३ अरण्य काण्ड' ४ किष्किंधा व ५ सुंदरकाण्ड येवढी रचना करून सुंदरकाण्डाचे शेवटींच आपला हेतू पूर्ण झाला असें त्या म्हणतात व पुढें आठ श्लोकांत उरलेला कथा भाग त्यांनीं सांगून टाकला आहे. या पांच काण्डांची विभागणी त्यांनीं तेरा 'शतांत' केलेली आहे. दासबोधाच्या धर्तीवर त्या सीतास्वयंवरांतील अध्यायाला समास म्हणतात. तसेंच दासांच्या ओवीशतांच्या धर्तीवर त्या रामायणाच्या काण्डांतर्गत अध्यायांस 'शत,

म्हणतात. 'शत' म्हणजे शंभर श्लोकांचा गट असा स्थूलमानानें अर्थ घ्यावयाचा. कारण कांहीं ठिकाणीं श्लोकसंख्या शंभरापेक्षां जास्त आहे. एकंदर श्लोक संख्या १५३६ भरते म्हणजे सरासरी ११८ श्लोकांचा शतबंध होतो.

रामायणांतील काण्डाच्या शतांच्या विभागणीकडे पाहिलें तर आरण्यकांड त्या एक शतांत संपवितात तर किष्किंधाकांडावर दोन शतें खर्च करतात. आदिकांडाचीं शतें तीन. त्यापैकीं पहिलें रामजन्म इ. उपक्रमाचें आहे तर सीतास्वयंवरावर त्यांनीं दोन शतें लिहिलीं. एकंदरींत स्वयंवर कथा वर्णनाची त्यांना आवड दिसते व तें स्वाभाविकहि आहे. अयोध्याकांडाची शतें तीन तर सुंदर कांडावर त्यांनीं चार शतें लिहिलीं. त्याचें कारण सुंदरकांडांत मारुतीचा पराक्रम फार. बाई समर्थ संप्रदायाच्या. संप्रदायाचें दैवत मारुती. समर्थ हेही मारुतीचा अवतार अशी कल्पना आणि यायोगें मारुतीच्या या वर्णनांत बाई तन्मय झाल्या व या ठिकाणची कविता जास्त रसाळ वठली.

दोन्ही ग्रंथांत म्हणजे 'स्वयंवर' व 'रामायण' यांत सुरवातीचा देवतावंदनाचा क्रम एकच आहे. प्रथम गणपती, मग शारदा, तदनंतर सद्गुरु व पुढें कुलदैवत राम. कारण सीतास्वयंवरांत त्या म्हणतात—

आतां माझिया कुळदैवता। नमूं नमस्कार श्रीमंता।
जो हरादिकांचा वरदाता। अनाथ बंधू ॥ १? ॥

परंतु राम हेंच परम दैवत, नव्हे परब्रह्म, हीच त्यांची भावना. 'स्वयंवरा'त त्या सुरवातीस म्हणतात.—

राम गुणाचा सागरु। राम सुखाचा सुखतरु।
राम भक्ताचे माहेरु। राम विसावा जनाचा। १-१२

रामायणांत त्या म्हणतातः—

मुळीं राम हें नाम हो ब्रह्मवाची। जिथे लागलीसे
समाधी शिवाची॥

महद्भूत विष्णू महद्रूप येणें। विधीलागि उपदेशिले
सर्व तेणें। १-१२

प्रत्येक समासाचे शेवटीं पुढच्या समासांत येणाऱ्या कथानकाची सूचना देऊन त्या कथानक संपवितात. उदा :—

पुढिलियें समासीं मनोरमा। माळ घाली रघोत्तमा।
वेण्णी म्हणे त्या संभ्रमा। श्रोते जनीं परिसावें। ९-१६१

दोन्ही ग्रंथांत कथाभाग संपल्यावर उपसंहारात्मक अशा कांहीं ओव्या वा श्लोक त्या लिहितात व ग्रंथ रामार्पण करतात. उदाः—स्वयंवरांतील उपसंहारांतील त्या म्हणतात—

हें सीतेचें स्वैवर। वाल्मिक बोलिला विस्तार।
रम्य रसाळ सुंदर। नाना विलासें करूनि। १४७
वाल्मीक बोलिला गहन। तें वांच्छित होतें मन।
तव त्याचा साभिमान। सर्वज्ञ रायें घेतला। १४८
हें बोलणें यथार्थ। कर्ता राम याचा समर्थ।
कोणा सांगो हा पुरुषार्थ। माझा मीच जाणें। १४९

रामायणाच्या उपसंहारांत एका सुरेख दृष्टांन्तानें आपला दीनपणा त्यांनीं व्यक्त केला आहे.

असें बोलिलें वाल्मिकें मूळ ग्रंथीं।
तसें काय साधेल आम्हांसि अर्थी।
समर्थी करावी यथासांग पूजा।
दिना दूबळा बेल भावार्थ माझा॥ ५-४-९८

वाल्मीक ऋषींनीं रामायण लिहिलें तसें मला गरिबाला काय साधणार! जे समर्थ असतात त्यांनीं म्हणजे वाल्मिकांनी यथास्थित पूजा करावी; माझ्या दुबळ्याचा भावार्थ म्हणजेच बेल. ज्याला षोडषोचार पूजा शक्य नाहीं त्यानें भावनेनें बेल वाहिला तरी पुरतो. येथें समर्थ म्हणजे वाल्मिकी तसेंच समर्थ रामदास हाही अर्थ सूचित झाला. समर्थांनीं सामर्थ्यानें काव्य लिहावें, रामायणें लिहावीत. मी दुबळी किती लिहिणार हा भावार्थ.

माझी हौस पुरली. कारण-

यथानुक्रमें ग्रंथ येथानुशक्त्या।
मती सारिखा लीहिला प्रीति भक्त्या।
उदासीन श्रोतीं कदा हीन कीजे।
असें न्यून तें पूर्ण साधून घीजे। ५-४-९९

कथा संपली अन्वयो सर्व जाला।
वेणी आवडी हेत पूरोन गेला।
रघूराजपादारविंदी विलासीं।
असे ठेविला ग्रंथ आचार्य राशी। ५-४-१००

या सर्व ग्रंथसंपदेंत लेखनाचा कालनिर्देश नाहीं. त्यामुळें कोणता प्रथम, कोणता मागाहून हें कळण्यास मार्ग नाहीं. प्रत्येक समासाचे अगर शताचे शेवटीं बहुतेक त्या वेणीस्वामी (कांही वेळेस 'वेणी') असा आपला उल्लेख करतात त्यावरून मिरजेस मठस्थापना करून महंती स्वीकारल्या-नंतरचे हे दोन्ही ग्रंथ असावे. इतर पदांतही कोठें 'वेणी' कोठें वेणीस्वामी येतें. पण लेखन काल व क्रम निश्चित करणें कठीण आहे.

## अंतरंग परीक्षण

येथपर्यंत बहिरंग परीक्षण केल्यानंतर ग्रंथाच्या अंतरंगाकडे वळणें योग्य होईल. वेणाबाईंना तत्कालीन पंडितांत मोजण्यास हरकत नाहीं. समर्थांचें शिष्यत्व स्वीकारल्यावर पूर्वी असलेला त्यांचा भक्तीचा अंकुर वाढीस लागला. अध्यात्म रामायण, भागवत वगैरे ग्रंथ त्यांनीं कसोशीनें वाचले असणार. वाल्मिकी रामायणाचाहि त्यांनीं अभ्यास केला असणार. समर्थांनीं नाशिकास पुरश्चरण करतांना वाल्मिकी प्रत हातानें लिहिली होती ती त्यांचे वाचनांतून सुटणें शक्य नव्हतें. स्वयंवर व रामायण लिहितांना आपण वाल्मिकीनें जें सांगितले तेंच लिहितों असें त्या सांगतात. (हें सीतेचें सैवर वाल्मीक बोलिला विस्तार। १४-४७) शिवाय त्यांत कांहीं बदल, इतर पुराणांचे आधारे केला असेल तर त्याचाहि उल्लेख त्या

करतात. उदाहरणार्थः- अध्यात्मरामायणाचा उल्लेख किष्किंधा कांडात आहे. तेथें पहिल्या शतांत त्या लिहितात-

नमस्कारिला मुख्य आदी कवी हो।
जेणें काव्य विस्तारिलें हे गुणी हो॥
जयाचीं भाविष्यें शिवें पाहिली हो।
सदा मानसी सज्जनीं राहिली हो॥ ४-१०९

कथा सर्व विस्तारिली सप्त कांडे।
तयामाजि तें संपलीं तीन कांडे॥
पुढें कांड किष्किंध हें आइकावें।
कथाकीर्तनीं सादरें चित्त द्यावें॥ १०

कथारण्य कांडी सिता मिथ्य नेली।
कळा अंतरीं राघवें गुप्त केली।
असे शीव ' अध्यात्म सांगे गुजार्थ।
सिता शक्ति वामांग रामी यथार्थ॥ ११॥

यावरुन अध्यात्म रामायणांत खरी सीता गुप्त होती असें सांगितलें आहे व तेंच वर्णन वेणाबाईनें स्वीकारलें आहे. याचा परिणाम मात्र असा झाला आहे कीं सीताविरहासारखे करुणरसाचे प्रसंग रंगूं शकले नाहींत.

सीतास्वयंवराच्या कथानकाकडे पाहतां तें पसंत करण्यांत व त्याची मांडणी करण्यांत वेणाबाईचें कौशल्य दिसून येतें. स्वयंवर हाच मुख्य विषय असल्यानें त्याचे वर्णनास अवसर भरपूर व विषय स्त्रियांच्या अत्यंत आवडीचा. यामुळें वेणाबाईची वाणी सहज लीलेनें वर्णन करते. चवदा समासापैकीं पहिल्या दोन समासांत विश्वामित्र रामाला यज्ञरक्षणासाठीं घेऊन जातो व पुढें राम यज्ञरक्षण करुन ताटिका वध करतो. येथें वीर रसाचा परिपोष होतो व शेवटीं ही स्वयंवरानंतर अयोध्येस परत जातांना, परशुराम गर्वपरिहार रामाचे हातून करवून शेवटीं रामाचा पराक्रम दाख-विला आहे. पुढें मागें वीररस व मध्यें शृंगाररस भरण्यांत सीतेला राम सर्वस्वी योग्य होता हें दाखविणें हें तर असतेंच पण एकाच वर्णनानें

कंटाळा घेऊं नये व शिवाय रुची पालटहि व्हावा, हेंही जमतें. थोडक्यांत प्रथम व शेवटीं भात वाढून मध्यें विवाह सोहळ्याचें पक्वान्न तयार करून वेणाबाईनें वाचकांस अस्सल महाराष्ट्रीय जेवण दिलें आहे असें म्हटलें पाहिजे. मी मध्यंतरी शृंगाररस म्हटलें तेंहि थोडें बदललें पाहिजे. स्वयंवर म्हणजे शृंगाररसाचा उठाव होतो हें सामान्यतः खरें असलें तरी येथें 'परब्रह्माचा विवाह आहे' ही गोष्ट वेणाबाई विसरूं शकत नाहीं. तिचा नायक राम हा स्थितप्रज्ञ दाखविला आहे.

स्वयंवरमंडपांत राम येतो त्याला पाहून सीता उल्हसित होते.

सीता पाहे मदन मूर्ती । तव त्या अवघ्या चितोवृत्ति ।
रामी वेधल्या विश्रांती निचेष्टित राहिली । ४-६४
सखी म्हणे गे सावधान । अझुनी जालें नाहीं ध्यान ।
पदकमळें दाखवीन । सख्य उत्तीर्ण हें माझें । ४-६९

* * * *

चरण कमळें विराजमान । आपुली मिरासी देखोन ।
जानकी चालिलें स्फुंदन । रोमांच आंगीं थरथरिले । ४-६८
मुख दाटले अंतरीं । शब्द फुटेना बाहेरी ।
निचेष्टित धरेवरी । जनकात्मजा ते काळीं ॥ ४-६९

अशी तिची स्थिति होते. परंतु रामाचे मनःस्थितीचें वर्णन सर्व ग्रंथांत कोठेंच येत नाहीं.

रावणाचे अंगावर धनुष्य पडलें. तें कोणी काढीना तेव्हां लक्ष्मण रामास म्हणतो—

श्रीरघुवंश रत्ना पाहे । विमल दास मी तुझा आहे ।
माझ्या बळापुढें स्वामी हे । चाप केवीं उरेल । ४-११६

पण राम स्तब्धच. विश्वामित्र सांगतात.

तंव विश्वामित्र म्हणे फणिवरा । तूं बोलिलासी अर्थ खरा ।
परि धनुष्य परिहारा । तूं नव्हेसी सौमित्रा । ४-११८

मग रामाकडे वळून ते म्हणतात—

**तों कौशिक म्हणे रघुनाथा। रावण पावलाहे परम चेथा**
**त्यासी वांचवावें समर्था। चाप ओढून काढावें। ५-१**

पराक्रम करण्याचे वेळींही त्याचें चित्त हलत नाहीं. तसेंच विवाहाचे प्रसंगांतही नाहीं. विवाहाचे वेळींही तीच स्थिति. आधीं रामास कोणी मित्र समानधर्मी दिसत नाहीं. लक्ष्मण वगैरे धाकटे बंधू, एक प्रकारें छत्रधर. थट्टा विनोद करण्यास बरोबरीचा मित्र नाहीं त्यामुळें सर्व विवाह समारंभांत रामाचे तोंडून एकही उद्गार नाहीं, चेहऱ्यावर कसलाही भाव नाहीं, अशी स्थिति झाली आहे. सीता गौरीहर पूजीत असतां जनक सीतेस नेण्यास येतो त्यावेळीं तिच्याजवळ मैत्रिणी असतात त्या चेष्टा करतात कीं,

**सखिया हांसती कौतुकें। पूजा फळ लाधलें निकें।**
**सुंदर रामासारिखें। अक्षईवर जानकी॥ १०-७१**

"ऊठ आतां गौरीहर पावला" व त्या थट्टेनें सीतेचा आनंद दुणावतो. पण रामाच्या बाबतींत असें वर्णन नाहीं. चवदापैकीं तीनचार समास युद्धवर्णनाचे सोडले तर बाकीचे दहा समास लग्नाचा उत्सव वर्णन केला आहे. सतिच्या मनाचें थोडेसें वर्णन आहे. त्यांत रामाच्या मनाचें एक अक्षर नाहीं. सर्व इतर वऱ्हाड्यांची, मिरवणुकांची, जेवणावळीची गडबड थोडक्यांत अस्सल बालविवाहाचें तें वर्णन आहे. आणि म्हणूनं शृंगाररसाचा परिपोष न होतां भक्तिरसांत त्याचें पर्यवसान झालें आहे. वीरसाचे बाबतींत तेंच. स्त्रीला वीररस वर्णन करणें कठीण जाणें स्वाभाविक आहे व म्हणूनच वेणाबाईनीं तें ओळखून युद्धप्रसंग थोडक्यांत आवरले आहेत. दुसरा समास युद्धाचा. 'तारिका' व 'मरिची' आणि 'सुबाहु' राक्षस यांचा वध. पण हा समास फार लहान सारा ५५ ओव्यांचा असून त्यांत प्रत्यक्ष समर प्रसंग ३०।३५ ओव्यांतच आवरला आहे. तीच स्थिती शेवटच्या समासांत. परशुराम गर्व हरणाचा तो प्रसंगही असाच. ११८ ते १४० म्हणजे २२।२५ ओव्यांत तो संपविला आहे. (

विश्वामित्राचे स्वाधीन रामलक्ष्मण करतांना कौसल्या दशरथ यांना वाटलेला शोक, तसेंच सीतेची पाठवणी करतांना जनक सुमेधेस झालेला शोक,

या ठिकाणीं उत्पन्न होणारा करुण रस, विवाह उत्सवाचे वर्णनांतील अद्‍भुत रस, प्रथम निर्दिष्ट केलेला वीररस, हे सर्व येथें संचारिभावासारखें वावरत असून मुख्य जो भक्तिरस त्याचा परिपोष करतात.

येथें भक्तिरसांचे धरा। अद्‍भुत शृंगार आला पाहुणेरा।

अशी स्थिती.

वेणाबाईच्या रामायणाकडे वळून पाहिलें तर असें दिसतें कीं थोड्या जागेंत पुष्कळ कथाभाग कोंडल्यने कथानकाचा कोंडमारा झाला आहे. सीतास्वयंवर सुटसुटींत. त्याचे वर्णनास १५४६ ओव्या लागल्या. पण पांच कांडें रामायण १५३६ ओव्यांत गोवलेलें आहे. म्हणजे सीतास्वयंवरापेक्षां दहा ओव्या कमीच होतात. कथानक सांगण्यांत फार ओव्या खर्च होतात व एकादा विषय घेऊन भावना रंगविण्यास जागा थोडी उरते. आदिकाण्डांतील तीन शतांपैकीं 'सेवर'च दोन शतांत वर्णिलें आहे. सीतास्वयंवराचे मानानें हें दोन शतांचें 'सैवर' रसाला कमी पडतें. पण बारीक वर्णनाच्या कांहीं गोष्टी सीतास्वयंवरांत नसलेल्या यांत आढळतात. रामायण लिहितांना कथा वाल्मिकीची म्हटली तरी अध्यात्म रामायणावर जास्त भर दिसतो. प्रत्येक ठिकाणीं हर्षामर्षाचा प्रसंग येईल तेथें अगोदरच रामास आपल्या अवतार कार्याची आठवण दिली आहे असें वर्णन येतें; त्यामुळें सर्व प्रसंगांत राम स्थितप्रज्ञाप्रमाणें वागतांना दिसतो. उदाहरणार्थ अयोध्याकांडांत रामाच्या राज्याभिषेकाची तयारी चालू असते. इतक्यांत नारद येतात व त्यास अवतार कृत्याची आठवण देतात.

पुढें नारदू उत्तरें व्योमपंथें।
अकस्मात आला रघूराज तेथें। १-१३

× × ×

चळेना प्रतिज्ञा कदाही मुनीशा।
उद्यां जातहो दंडकारण्य देशा। १-१६

यामुळें वाचक रामाचें देवपण कोठं विसरूं शकत नाहीं. रामायणांतील सीता पळवून नेल्याचा प्रसंग विप्रलंभ शृंगार व करुणरसास योग्य. अनेक

कवींनीं त्यावर आपलें कवित्व खर्च करून नांव मिळविलें. पण तो प्रसंग वेणाबाईचे रामायणांत कथानकरूपानें संपतो. पुढें किष्किंधाकांडांत शरद्-ऋतूला सुरवात होते व रामाला सीताविरह तीव्रपणें भासूं लागतो. त्याठिकाणीं थोडेसें वर्णन येतें.

शरदृतूचा काळ तो रात्रि भागीं।
उदो पूर्ण चंद्रे प्रभू तप्त आंगीं।
म्हणे बंधु नेरे मला वृक्ष मूळीं।
निशि माजि हा भानु तो अंग पोळी॥ ११

प्रभु भानुवंशी आम्ही राघवेशा।
निशि भानु कैचा जी देवा परेशा।
तरी कोण आम्हांसि रे बाधिताहे ?
प्रभु पूर्ण चंद्र; अग्नि तो वर्षताहे॥ १२॥

रमाकांत तूं हा रमा बंधु चंद्र।
अरे बाण दे सीघ्र छेदी द्विजेंद्र।
प्रभू ऊपमा जानकीच्या मुखाची।
तुम्ही रामचंद्र जगीं मान साची॥ १३॥

हें वर्णन काव्यप्रकाशांतील सुप्रसिद्ध "सौमित्रे तनु सेव्यतां तरुतटः चंडांशुरुज्जृंभते। चंडांशोर्निशाको कथा? रघुपते चंद्रोऽयमुन्मीलति॥ वत्सैतद्विदितं कथंनु भवता? धत्ते कुरंगं यथा। क्वासि प्रेयसी! हा कुरंगनयनें! चंद्राननें जानकि!॥ या श्लोकावरून त्यांना सुचलेले असणार. काव्यशास्त्रासारखे विषय अर्थात्च त्या पढल्या नव्हत्या. पण कथा पुराणांतून इतर हरिदासांनीं या श्लोकांचे मदतीनें रंगविलेले रामविरहाचें वर्णन त्यांच्या ऐकण्यांत असणार व त्यावरून वरील वर्णन लिहिलें गेलें. पण राम हा विष्णूचा अवतार, परब्रह्म ही जाणीव लागलीच जागृत होऊन त्या सांगतात, "रामाला खरें माहित होतें, सीता रावणानें नेलीच नव्हती तरी पण नाटकांत स्वीकारलेलें काम पात्रानें नीट वठवावयाचें म्हणून रामांनीं शोक केला इतकेंच!"

फणीला लिळा राम दावीत आहे
देहे सोंग संपादणी सर्व आहे ॥

पुढें सुग्रीव आपल्या नगरींत स्वस्थ आहे. "त्याची बायको परत मिळाली आतां माझी काय त्याला चिंता? माझी पत्नी परत मिळण्यास मदत करण्याचें वचन तो विसरला." अशी शंका घेऊन राम संतापतो व सुग्रीवास मारीन असें म्हणतो. तेव्हां लक्ष्मण सांत्वन करून म्हणतो,

तुम्ही जे करा ते करा देव देवा।
परी वाल्मिकालागि हा मान द्यावा ॥ १७ ॥
तिथें सुग्रिवा मृत्यु नाहीं श्रीरामा—

लक्ष्मण सुग्रीवास बोलाविण्यास जातो व मदतीला उशीर केल्याबद्दल संतापतो. तेव्हां सुग्रीव तेंच कारण सांगतो,

" प्रभु वाल्मिकी ग्रंथ मी पाहताहे।
तदाधार किष्किंध मी राहताहे ॥
शरद्दतू आतां प्रभु संपले हो।
कपीभार संपूर्ण बोलाविले हो ॥ ३६ ॥

जणुं कांहीं हातांत वाल्मिकी रामायणाची नक्कल घेऊन प्रत्येक पात्र आपलें काम करण्यास उभें आहे. यामुळें या ठिकाणीं धड करुणरस उत्पन्न होत नाहीं व भक्तिरसही निर्माण होत नाहीं. नाटकाची रंगीत तालिम करतांना मध्येंच नाटक, मध्येंच चर्चा चालते, तसें वाटतें.

प्रभु रामचंद्राची गोष्ट सोडली तर सीतेच्या वर्णनांत मात्र रसपरिपोष बरा साधला आहे. सीतेला अशोक वनांत मारुति भेटतो तेव्हांचें वर्णन सुंदर आहे; मारुती सीतेला सांगतो,

वदे मारुती, जननी राम सूखी।
सुमित्रासुतेसी तया ऋष्यमूकीं।
तुजकारणें क्षेम बो लोकपाळें।
असें बोलिले त्या द्विजांच्या दयाळें ॥ २२ ॥

या ठिकाणीं मेघदूतांतील 'भर्तुर्मित्रं प्रियमविधवे' या श्लोकाची आठवण होते. 'अव्यापन्नः कुशलमबले पृच्छति त्वां वियुक्तं'

"पूर्वा भाष्यं सुलभविपदां प्राणिनामेतदेव ॥"

रसामध्यें कवयित्री तद्रूप झाली म्हणजे एकादा अलंकार सहजींच तिच्या लेखनांत येतो व रसाच्या रंगतीला उठाव देतो. येथेंच पहा;

सिता शोक संताप दावाग्नि मळीं।
पयोमेघ तो मारुती ते चि काळीं।
त्वरें उत्तरें शब्द पियूष धारा।
सिता शोक संतापनाच्या निवारा ॥ ९ ॥
अवस्था असे वाटली आठवानें।
मिठी घातलीसे मनाच्या मनानें।
न बोले न सूचे सिता स्तब्ध राहे।
नयनांबुजें झांकिली, ते न पाहे ॥ २२ ॥
पुसे जानकी हेत तो मुद्रिकेशी।
सुखें राम सांगे सुमित्रा सुतेसी ॥ २५ ॥

हें वर्णन सरस साधलें आहे. वस्तुतः सीतेची व मुद्रिकेची भेट हा प्रसंग इतका रम्य आहे कीं, 'कान्तोदन्तः सुहृदुपगपात् संगमात् किंचिदूनः' असेंच याचें वर्णन केलें पाहिजे. स्त्रियांच्या गाण्यांत या प्रसंगावर इतकी पद्यरचना झाली आहे कीं द्रौपदीच्या 'थाळ्या' प्रमाणें 'मुद्रिका' हा एक पद्यांचा वेगळा गठ्ठा करावा लागतो.

उदाः—मुद्रिके सुखी आहे ना।! मनमोहन तो प्रभु माझा ॥
तसेंच—मुद्रिके राम टाकुनि आलिस तूं कशी।
भक्षिलें किंवा सोडिलें तुवां राम वनीं उपवासी ॥

इत्यादि अत्यंत रसाळ रचना उपलब्ध असून लोकप्रिय आहे. अशाच तऱ्हेचा दुसरा सौभद्र नाटकांतील प्रसंग व त्यावेळचें 'अरसिक किती हा शेला' सुप्रसिद्धच आहे. वेणाबाईनीं येथें केलेलें वर्णन त्याच तोलाचें तर आहेच पण पुढील श्लोकांत त्यांनीं मुद्रिकेचा केलेला निषेध फारच जोर-

दार आहे. इतर गाण्यांत तसा क्वचित सांपडतो. अलंकारांचा फारसा उपयोग न करणाऱ्या वेणाबाईंच्या तोंडून सहजस्फूर्त उद्गार आले व त्यांत एक सुंदर अर्थांतरन्यास नकळत बाहेर पडला.

श्रिया राहिली ते अयोध्यापुरीशी।
जनस्थानिं म्या सांडिला सूखराशी॥
तुवां ही कसे सोडिलें राघवाला।
स्त्रिया सर्व विश्वास मुद्रे! उडाला॥

शेवटच्या ओळीची Frailty thy name is woman! या शेक्सपीअरच्या सुप्रसिद्ध ओळीशीं सहज तुलना होऊं शकेल. स्त्रियांच्या भावनांचे चित्रण त्या यशस्वी तऱ्हेनें करतात.

एकंदरींत सुंदरकांड त्यांच्या पांची कांडांत सुंदर वठलें आहेसें वाटतें. चार शतें लिहिल्यानें थोड्या ओव्यांत पुष्कळ कथानक सांगण्याची तिरपिट उडत नाहीं. डोंगरमाथ्यावर चढल्यानंतर मनुष्य जसा चढण्याचे श्रम विसरून इकडे तिकडे पाहूं लागतो व मोकळेपणें भोवतालच्या सृष्टिसौंदर्याचा आस्वाद घेऊं शकतो तशी परिस्थिती येथें वाटते. या कांडांतील सीतामारुती संवाद, रावण मारुती संवाद हे सुंदर साधले आहेत तसेंच मारुतीनें लंका जाळली त्या प्रसंगाचें वर्णन उत्कृष्ट वाटतें. कविताशक्ति भरास येते अलंकार अनाहूतपणें सिद्ध होतात. लंकादहनाचें पुढील वर्णन पहा—

सळे उठिला रावणू फुंकु घाली।
धडाडीत अग्नी मुखा झेपे घाली।
जळाल्या मिशा पापण्या सर्वदाही।
विसा भोंवया जाळिल चर्म कांही॥

+ +

किती येक ते सांगती रावणाला।
महाद्वारिच्या तारेणी अग्नि आला॥
भयाभीत चित्तें महा चोज व्याला।
शिरोवेष्टणाधीण बाहेर आला॥ २६

+ +

महामाजला अग्नि जाळीत सैरा।
असंभाव्य हा दाटलासे उबारा॥
शशी सीतळा बैसली ज्वाळ आहे।
तयाची तनू शाम अद्याप पाहे॥ ४५
पथीं चालतां सूर्य लोहित जाला।
तनू रंग आरक्त बैसून गेला।
म्हणे मारुता राख आम्हांस आतां।
करी चोज तो पश्चिमे जात जातां॥ ४६
दिशा तापल्या हा फुलोरा नभाचा।
झडो लागला सर्व तारांगणांचा।
महा ज्वाळ कल्लोळ लोटे प्रसंगे।
नभा नीळिमा ठाकली त्याच योगें॥ ४७
सिमा मांडिली ज्वाळ कैलासपूरा।
बळें धांवली दाटलासे उबारा।
त्वरें शैलजा शूळपाणी वगत्रा।
कडे न्याहळी भाळ तृतीय नेत्रा॥ ४९

शेवटीं मारुती थांबला केव्हां? त्याला एकदम सीतेची आठवण झाली.

पस्तावला मारुती थोर चिंता।
म्हणे जाळिली काय म्यां रामकांता?।

व सीतेला त्रास पोचूं नये म्हणून तो थांबला. एकूण काव्य या दृष्टीनें रामायणांतील सुंदर कांड सुंदर आहे.

## वेणाबाईची भाषाशैली

आतांपर्यंत वेणाबाईच्या ग्रंथसंपदेचा अंतरंगपरिचय करून घेतला. आतां या ग्रंथांच्या भाषाशैलीबद्दल बोलणें झाल्यास तें त्यांच्या शब्दांत थोडक्यांत पण समर्थक तऱ्हेनें सांगतां येईल. स्वतःच्या कवितेबद्दल वेणाबाई म्हणतातः-

कवि प्रार्थितो श्रोतया मान्य लोकां
अती आदरें चित्पत्तीच्या अनेकां॥

असें न्यून तें पूर्ण साधून घ्यावें ।
तुम्हां सांगणें हें न लागे स्वभावें ॥ ६ ॥
नसे मात्रुका साधल्या अर्थ वोजे ।
नसो अन्वयो, या गुणें चित्त लाजे ॥
म्हणोनी करी प्रार्थना शुद्ध भावे ।
समर्थी तुम्ही सर्व मानून घ्यावें ॥ ७ ॥
असे दीन मी आपुल्या युक्तिभक्त्या ।
कथा सावडी गाऊं येथानुशक्त्या ॥
नये वर्णितां वाड ना जाड कांहीं ।
नसे बंद, प्रबंद ना छंद कांहीं ॥ ८ ॥

शुद्ध, अशुद्ध, ऱ्हस्व, दीर्घ, यांसाठीं थांबावयाचें नाहीं. शब्दाच्या स्वरूपाबद्दल घासाघीस नाहीं. वेळेस सर्व शब्द वृत्तांत बसत नसला तर अर्धाच घ्यावयाचा. उदा.—' कैकेयी'बद्दल "कैके", "भार्गव 'बद्दल "भार्ग" "अंगिकारलें "बद्दल "आंगिकेलें"; स्वतःच्या व्यासंगास संस्कृतीचें अधिष्ठान असूनहि शुद्धाशुद्धाकडे लक्ष ठेवलेलें दिसत नाहीं. उदाः—"शुभ"बद्दल "शूभ". थोडक्यांत रामदासांच्या भाषेचे जे गुणदोष म्हणावे लागतात ते सर्व यांचे भाषेंत आहेत. पण वरील दोष असूनहि भाषेंतील जोर श्रोत्याला जाणवतो. प्रसाद आहे. भाषेच्या ओबडधोबडपणामुळें रसनिर्मितीस अडचण होत नाहीं. प्रसंगीं कांहीं विशेष चांगले शब्दहि त्यांचे वर्णनांत दिसतात. उदाः—"बैस बैसकार झाले" (असें "नमस्कार चमत्कार झाले") विवाहप्रसंगी व्याह्यांच्या भेटी वारंवार होतात व एकमेकांस "या बसा" असा जो मान देण्याचा उपचार चालतो त्याची कल्पना या शब्दानें चांगली येते. तसेंच 'पंगतीकार' पंगती बसविणें, थाकार देणगी देणें इ. शब्दयोजना विशेष चांगली वाटते. रामदास हे त्यांचे गुरु व त्यांच्या ग्रंथांचे त्यांचे सदैव परिशीलन चाललेलें असावयाचें. स्वाभाविकच स्वतः त्या लेखनास बसल्या म्हणजे न कळत त्यांचेच शब्द लेखणींतून लिहिले जातः-

असें:- मना सज्जना—आवडे राम जीवा।
सख्या पारख्या राम सर्वत्र व्हावा ॥९॥
अयोध्या कांड–शत १ लें

भला रे भला अंगदा गूणवंता।
कसें चांगले बोलसी भाग्यवंता॥
किष्किंधा कांड–शत १ लें

असल्या श्लोकांतील 'मना सज्जना' 'भला रे भला' हे शब्दसमूह त्यांच्या मनावरील 'मनाच्या श्लोकांची' पकड दाखवितात.

भाषेच्या बाबतींत शुद्धाशुद्धाबद्दलहि जेथें उदासीनता आहे तेथें बुद्धिपूर्वक भाषेला अलंकाराचा साज शृंगार चढविणें कठीणच. पण विषयाच्या वर्णनांत बाई तन्मय झाल्या म्हणजे सहज अलंकार बनतात. अलंकारांच्या याख्य/ लक्षांत घेऊन बाईनीं तसा प्रयत्न केलेला नाहीं तेव्हां त्यांचे लिखाणांतील चमत्कृतिरम्य स्थळांना प्रत्यक्ष अलंकार न म्हणतां अलंकारांच्या छटा म्हणणें जास्त शोभून दिसेल. अपौरुषेय म्हणजे स्त्रियांच्या वाङ्मयांत विपुल सांपडणाऱ्या साम्याधिष्टित, उपमा, उत्प्रेक्षा, रूपक, अनन्वय इ. अलंकाराचीं उदाहरणें आहेतच. पण बाईंचा भर एकंदरीत सार व उदात्त अलंकारावर जास्त. त्रयलोकश्रेष्ठ अशा रामरायाचें चरित्र व स्वयंवर वर्णावयाचें मग तेथें 'लोकातिशय संपत्तिवर्णनोदात्त' 'उदात्त अलंकार जास्त आल्यास नवल तें काय ?

नमुन्यादाखल एकेक उदाहरण पाहून पुढें जाणें बरें !

(१) उत्प्रेक्षा—चुकल्या धना पावे धनिक।
किं गतराज्यापावे नायक।
राम भेटतां सुख।
तैसें झालें रायासी। सी. स्व. ६–८८

जें विश्रांतीचें राहतें स्थळ। सुखाचें अधिष्ठान केवळ
राम पाऊलें सुनीळ। जनकें भूषणें पूजिलीं॥
सी. स्व. ७–४२

(२) रूपक—सिता शोक संताप दावाग्नि मेळीं ।
पयोमेघ तो मारुती तोचि काळीं ॥
त्वरें उत्तरें शब्द पीयूषधारा ।
सिता शोक संतापनाच्या निवारा ॥

(३) अनन्वयः—
उपमे नाहीं या दुसरें। येचि भुवनत्रई सुंदरें।
रामजानकी वधुवरें। येकयेकाच्या पाडें॥ सी. स्व. १०.९.७
पाडे पाडे रुपवंते। पाडे पाडे गुणवंते।
पाडे पाडे भूषणवंते। येकपणें साजिरी॥ सी. स्व. १०.९.८

(४) उल्लेखः—
देवा वाटला साभिमानी। सुंदर धाकुटा भोळा जनी।
जानकी भावला जाउनी। माळ घालूं आतां॥ सी. स्व. ५.८
भक्तराज सभेप्रती। त्यास भावला ध्येयमूर्ती।
सभे बैसले भूपती। महावीर त्यास भासे॥ सी. स्व. ५.९

(५) स्वभावोक्तिः—
सिते देखिले तोषला चित्तकोशीं !
हरुषे मिठी घातली लांगुलाशी॥ सुंदर काण्ड १.६७

मारुतीला सीता दिसल्याबरोबर इतका आनंद झाला कीं त्यानें आपल्या शेपटीला मिठी घातली हें मर्कट स्वभावाचें वर्णन येथें त्यांचें बारीक निरक्षण दाखवितें.

(६) श्लेषः—
(१) बहु मोडिले त्या अशोकावनाला ।
अशोकास त्या शोक उत्पन्न केला ॥
(२) तया अक्षयाला क्षयो प्राप्त झाला ।
कपीच्या करे वीर मळा निमाला ॥

अशीं श्लेषाची उदाहरणेंहि क्वचित् आहेत. पण एकंदर भर ‘सार’ ‘उदात्त’ इ. अलंकारावर जास्त. आणि भक्तीच्या मदतीला अद्भुत रस येत असल्यानें ‘सार’, ‘उदात्त’ अलंकार निर्माण होणें सहज आहे.

(७) सारः—

रत्नचौकियावरी । मुक्तकीळाची कुसरी ।
सुंदर पाउलें साजिरी । पाये जोडा शोभला
अभिनव संपत्तीची थोराई । आणि आवडीची नवाई ।
विशेष रामजावाई । आश्रिय जनकपूजेचें ॥

सीतास्वयंवर ७ ४४ । ४५

(८) उदात्तः—

वरा तेल वहावया । शिवजाया, विधिजाया ।
गाइत्री सावित्री उमिया । सुरेंद्रपानी पांचवी ।

सी. स्वयं. ८'८

जो विधीस ध्यानीं न फावे । शिव नामें चि समजावे ।
राहिले सर्वांचे थोरावे । त्या बरवंटा माखिती ॥

सी. स्वयं. ८–११

ज्याचे ग्रामीं चहुंकडे । चिंतामणि जिकडे तिकडे ।
रानोमाळ परिसखडे । त्या बरवंटा माखिती ।

सी. स्वयं. ८. ४८

## वर्णनांतील कांहीं लकबा

वेणाबाईना पुराण कीर्तनाची संवय. त्यामुळें श्रोत्यांशी बोलत, प्रश्नोत्तरें करीत वर्णन करण्याची संवय लागलेली. तीहि कवितेंत सर्वत्र दिसते. श्रोत्यांनीं आशंका घ्यावयाची व मग वक्त्यानें त्यांचें समाधान करावयाचें श्रोत्यांनीं घेतलेल्या कांहीं आशंकाहि मोठ्या मार्मिक आहेत. रामाचा वरघोडा निघाला, पुढें धर्म, अर्थ, काम मोक्ष हे चारी पुरुषार्थ वऱ्हाडी म्हणून मिरवत होते असें प्रथम सांगून मग श्रोत्यांनीं घेतलेली आशंका त्यां सांगतात. सीतास्वयंवरांतील पुढील दोन उदाहरणें पहा.—

(१) धर्म अर्थ मोक्ष काम । निघाले वऱ्हाडी परम ।
तव श्रोतीं अनुक्रम । आशंका घेतली ॥ ६.४८

धर्म अर्थ काम वाणी । अगत्य वदे पाणिग्रहणी ।
मोक्ष नसे उच्चारणी । तरी कां कवी बोलिला ॥ ६·४९
रामा जानकी समर्पण । धर्म अर्थ काम निवारण ।
मोक्ष पाहिजे या कारण । मुगुटमणी वऱ्हाडी ॥ ६·५०

(२) लाज्या होमाचा उछाव । थोर मांडला नवलाव ।
ऐकोनि श्रोता आयुर्भाव । आशंका घेतली ॥ १०·७
आशंकेचा उपक्रम । दिवसां नाही लाजाहोम ।
शास्त्र वाहे विषम । कां पा कवि बोलिला ॥ १०·८
तरि लाज्या होमाचे अवसरी । शशी झालासे छत्रधारी ।
सप्त ऋषी संभ्रमें करी । विधी विधान सांगती ॥१०-९॥

अर्थात येथेंही अद्‌भुतरसाची बैठक आहेच. "धर्मेच अर्थेच कामेच नाति चरामि" अशी शपथ विवाहप्रसंगीं घ्यावयाची असते तेव्हां वर घोड्याबरोबर धर्म, अर्थ, काम वऱ्हाडी आले हें बरोबर. पण लग्न म्हणजे संसाराचा आरंभ. तेव्हां त्याच वेळीं मोक्ष कशाला सांगितला? ही श्रोत्यांची शंका. "शंका खरी आहे" वक्ता म्हणजे वेणाबाई म्हणतात. "पण या लग्नप्रसंगांत 'राम-परब्रह्म' हा वर आहे. याची गांठ पडतांच धर्म, अर्थ, काम संपतात व मोक्षच उरतो म्हणून या वर्णनांत मोक्षाचा उल्लेख आहे."

दुसऱ्या उदाहरणांत श्रोते विचारतात, "अहो दिवसा लाजाहोम कसा? कारण लाजाहोम होतांच नक्षत्र दर्शन म्हणजे सप्तर्षि दर्शन असतें. दिवसा तर नक्षत्रें दिसत नाहीत." कवयित्री सांगते कीं, ज्या विवाहांत चंद्र स्वतः छत्र घेऊन उभा होता व साक्षात् सप्तर्षिच उपाध्याय असून लाजा होमांतील मंत्र सांगत होते, तेथें सप्तर्षि दर्शनाची अडचण कसली? हा शंका-परिहार रामाच्या सर्व श्रेष्ठपणावर व त्याचे सत्तेखालीं येणाऱ्या सप्तर्षि आदि सर्व आकाशस्थ ज्योतींवर आधारला आहे. तरीपण सकाळचा लग्नमुहूर्त असतां लाजाहोमासाठीं संध्याकाळपर्यंत थांबावें अशी रूढि आज दिसत नाहीं. गृह्यसूत्रांमध्यें होम वगैरे लग्नकृत्य झाल्यानंतर नक्षत्रदर्शन होई पर्यंत वधुवरांनीं मौन धारण करावें असे उल्लेख येतात. तेव्हां अशी शंकाच-

येण्याचें कारण काय असा प्रश्न पडतो. वेणाबाई यांच्या काळीं किंवा त्यांच्या प्रांतांत अशी पद्धति होती कीं काय ही शोधून पाहण्याची गोष्ट आहे. असो.

लक्षांत येण्याजोगी आणखी एक गोष्ट म्हणजे वेणाबाईची गायनकलेची आवड व ज्ञान. रामदासांच्या लिखाणाप्रमाणेंच वेणाबाईच्या लिखाणांत प्रसंगोपात्त ती प्रगट होते. उदाहरणार्थ रामायणांत आदिकांड शत दुसरें यांत विश्वामित्राचा यज्ञ पुरा झाला त्यावेळचें वर्णन—

विभासादि रामक्रिया राम मानी।
धनश्र्यादि सारंग माध्यान्ह मानी।
नटावीक मल्लार हे तान मानी।
किती राग की रागिणी अस्तमानी॥

आदिकांड शत २·८४

किती येक श्रीराग कल्याण रात्रीं।
आडाणादि केदार श्रीमध्यरात्रीं।
समस्तेक ते मुक्त संकीर्तनी हो।
सुखे राम सिद्धाश्रयीं श्रीमुनी हो॥

आदिकांड शत २·८५

## तत्कालीन लोकस्थिति व समजुती

कृष्ण भक्तांनीं कृष्णस्तुती गाण्यासाठीं रुक्मीणीस्वयंवरें लिहिलीं. तशींच रामभक्तांनी सीतास्वयंवरें लिहिली वेणाबाई नीं आपल्या रामायणांत स्वयंवर वर्णनासाठीं आदिकांडातील दोन शतें खर्च केलीं व शिवाय स्वतंत्र स्वयंवरच लिहिलें. या वर्णनावरून विवाहसमारंभा संबंधी पुष्कळ लिहितां येईल पण ते स्वतंत्र निबंधाचा विषय होईल. म्हणून त्याबद्दल येथें न लिहितां इतर कांहीं गोष्टींचा उल्लेख करून हा भाग संपविणें इष्ट होईल.

वधुवरांचे वर्णन करतांना वधू गौरवर्ण व वर सांवळा असावयाचा असा जणु संकेत ठरलेला दिसतो. वेणाबाईनीं वर्णन केलें आहे कीं,

सुंदर शाम रघुनंदन। हेमपुतळी जानकी॥

सी. स्वयं १०·९

कृष्णरुक्मिणीचें असेंच वर्णन येतें. कृष्णरुक्मिणी यांचा स्त्रीगीतांतील पुढील विनोद, प्रसिद्धच आहे. "तुम्हि थोराचे आह्मां परंतु, काळे का हो मी गोरी" "तोंडाळ बायको व बावळट नवरा" हें असें एक जागतिक 'हास्यक' आहे तसेंच 'काळा नवरा व गोरी बायको' हें अखिल भारतीय 'हास्यक' आहे. याचे मूळ बहुतेक दोन मानववंशांच्या संकरांत शोधावें लागेल.

लोकसमजुतीपैकीं कांहीं प्रसंगोपात्त उल्लेखिल्या गेल्या आहेत—

'तीन' या आंकड्याबद्दल अशुभपणा. मारुतीनें समुद्र ओलांडिला, लंकानगरी शोधली व सीता पाहिली. पण तीन गोष्टी करूं नयेत चार असाव्या असा विचार मारुतीचे मनांत येतो.

**जळा लंघिले, पूर शुद्धिनिमित्तें।**
**सिता दृश्य संपादिली तीन कृत्यें॥**
**असे ऊरले कार्य चतुर्थ कांहीं।**
**नये तीन सांगूं भल्या योग्य नाहीं॥** सुंदर कांड

तसेंच

**किती सांगती राजया लागि मातूं।**
**अरे बा अरे बा असे धूमकेतू॥** सुं. २-६४
**किती येक ते सांगती रावणाला।**
**महाद्वारिच्या तोरणीं अग्नि आला।**
**भयाभित चित्तें महाचोज त्याला**
**शिरोवेष्टणावीण बाहेर आला॥** सुं. कांड ४·२६

यामध्यें धूमकेतु दिसणें राजाला वाईट व डोक्यावर पागोटें घातल्याखेरीज दाराबाहेर पडणें अशुभ इ. लोक समजुती दिसून येतात. सुंदर कांडांत किष्किंधा नगरींतिल घरांचें वर्णन येतें त्यावरून घरांपुढें सडासंमार्जन, दारांत वृंदावन इ. तत्कालीन म्हणजे वेणाबाईंच्या वेळच्या सुसंस्कृत घराची त्यांची कल्पना कळते.

**दिसे रम्य वृंदावनें रंगमाळा।**
**सडे मार्जनें होमशाळा विशाळा॥** सुंदर कांड शत १·४४

किष्किंधेंतील बाजाराचेंही लांबलचक वर्णन आहे. तेव्हांही महाग व स्वस्त वस्तूंचा उल्लेख आलेला पाहिला म्हणजे आजच्या परिस्थितींत जास्त मौज वाटतें.

किती येक बाजार कणी दुकानें
किती चालवा चौक शोभायमानें ॥
किती येक वस्तु विके स्वस्त तेथें ।
श्रीरामेतिरामेति गर्जेति येथें ॥ किं. कांड २.८०

रामानें पावसाळ्याचे चार महिने कसे काढले या वर्णनांत वेणाबाईंच्या वेळीं चातुर्मासांत लोक काळ कसा घालवीत तें समजून येतें.

आषाढ क्रमीं रामस्वामी तपानें ।
क्रमी श्रावणू सव लिंगार्चनानें ॥
सरे भाद्रपद मास पितृस्वधानें ।
करी दिव्य नवरात्र दैवी विधानें ॥ किं. कांड २.९.
प्रभू वीजया दीनप्रस्थान आहे ।
प्रभु दक्षणे सर्वथा जात आहे ॥
दिपोत्साह सारुनिया स्वार होती ।
शरदृतु वारुनिया हीमप्राप्ति ॥ किं. कांड २.१०

## वातावरणांतील पडसाद

वेणाबाई या शिवाजीच्या समकालीन हें आपण सुरवातीस पाहिलें आहेच. शिवाजीच्या राज्यस्थापनेपूर्वीची परिस्थिति व घडामोडी त्यांनीं पाहिलेल्या व अनुभवलेल्या. रावणाच्या राज्यांतील जुलुम आणि दुष्ट राजा यांची त्यांनीं केलेली वर्णनें म्हणजे त्यांनीं भोवतालीं पाहिलेली ऐकलेलीं वर्णनेंच वाटतात. उदाहरणार्थ मारुतीला दिसलेलीं लंकेंतील स्थिती.

वसे दुष्ट राजा क्रिया भ्रष्ट रूपी ।
तया सारिखे लोक हे सर्व पापी ॥
पुरीच्या ज..ाची क्रिया मारुताला ।
सिता शोधिता दृश्य जाली कपीला ॥ ४० ॥

पुरी द्वीज ते भ्रष्ट चाण्डाळ कोपी ।
अभक्षेचि भक्षूनिया पापरुपी ॥
मुखें बोलती ज्ञान वेदांग वाचा ।
सदाचार तो लेश नाहीं क्रियेचा ॥ ४१ ॥
व्यभिचारिणी अंगना त्या समस्ता ।
कुरुपा विरुपा सदा वेस्तमस्ता ॥
तया राक्षसांच्या स्त्रिया ये गतीनें ।
सिता शोधितां देखिल्या मारुतीनें ॥ ४२ ॥

सुंदर कांड पहिलें शत.

मारुतीच्या शेपटाला बांधावयास वस्त्रें कमीं पडली म्हणून घरोघर जाऊन लोकांचीं वस्त्रें जुलुमानें हिरावून आणलीं. यावेळचें वर्णनहि शिव-राज्यापूर्वी असलेल्या बेबंद राजवटींतील कोणत्याहि नगरींतील स्थितीशी शोभेल असें आहे.

महायुद्ध, श्रीपाद ते नग्न केले ।
किती ताडिले सर्व कूपीन नेले ॥ ३. ९७
सदाचार्य आचार्य जें थोर मुंडें ।
तयांचीं असे मांडिलीं थोर भंडे ॥
महामान्य जे राजकी राजयाला ।
चिरें नेदितां मार होती तयाला ॥ ३. ९८

+ + +

पुराणीक याज्ञीक वैदीक लोकां ।
षड्दर्शनी रीघ पेशा अनेका ॥
महाधुंदली कोण पूसे तातयें ।
बळें काढिती सर्व यज्ञोपवीतें ॥ ३. १००

+ + +

शिरोवेष्टणें वीण ते ब्रह्मवृंदे ।
नसे सूत्र ते बालिके सर्व वोदें ॥ ३. १०२

वेणाबाई रामदासांच्या परिवारांतील. शिवाजी राजे वारंवार रामदासांना भेटत, राजकारणाच्या गोष्टी चालत व इतरहि अनेक तऱ्हेनें त्या वेळेला झालेल्या सैन्याच्या हालचाली, स्वाऱ्या व त्यासंबंधी चालणारीं खलबतें त्यांनीं पाहिलेलीं, ऐकलेलीं असणार. पुढील वर्णन सुग्रीवाच्या राजधानींत झालेल्या मंत्रिमंडळाचे सभेचे वेळचें आहे. सर्वांनीं विचार करून लंकेवर स्वारी करावयाचा निर्णय घेतला. भोंवतालच्या वानरचमूंतहि स्वारीबद्दल उत्सुकता ' होतीच. तेव्हां मंत्रिमंडळ काय निर्णय ठरविणार या बद्दल वानरांच्या उत्सुकतेचें वर्णन मोठें स्वाभाविक व सरस वठलें आहे. वस्तुतः वेणाबाईनीं ऐकलेल्या वा अनुभविलेल्या एकाद्या शिवकालीन प्रसंगाची ही पडछाया असणार व वर्तमानकाळांतील वाचक ही वर्तमानकाळांतील महायुद्ध सुरूं होण्यापूर्वीची किंवा त्याहीपेक्षां विशेष म्हणजे कॉंग्रेसच्या ' दांडी मार्च ' किंवा ' चले जाव ' निर्णयाच्या वेळची स्वतःची उत्सुकता आठवून त्या वर्णनाशी समरस होणार. तें वर्णन असें:—

असंभाव्य सेनेंत वार्ता कळाली।
चला रे चला रे चला हेचि बोली
भुभुत्कारले भार ते सिद्ध झाले।
दरी डोंगरीं राहिले सर्व आले॥ ४·७७
कपी पूसती काय आहे वदंती।
किती सांगती आजि येथें न ऱ्हाती।
किती बोलती रे हनुमंत आला।
सिताशुद्धि घेऊनि संतोष जाला॥ ४·७८
किती सांगती रे महामुख्य वीरीं।
रघुराज हा बैसलासे विचारी।
कसा काय सिद्धांत होईल तेथें।
तशासारखी मात येईल येथें॥ ४·७९
त्वरें पातली सर्व सेनेंत बोली।
रघूनायकें दक्षिणे चाल केली॥
दिसे तातडी आजि येथें न ऱ्हाती
किती बोलती ये क्षणीं स्वार होती॥ ४·८०

पुढाऱ्यांचा चाललेला विचार, त्यांचा निर्णय कळवून घेण्याची जनतेची जिज्ञासा व ठरेल त्या निर्णयाप्रमाणें कार्यप्रवण होण्याची उत्सुकता या दृष्टीनें वर्तमानकालींहि हें वर्णन लागूं पडण्यासारखें आहे.

## अंतरंगांतील पडसाद

वेणाबाईच्या काळांतील लोकसमजुती, चालिरीती व सभोवतालीं चाललेल्या उलाढाली यांची चित्रें आतांपर्यंत पाहिलीं. त्यांच्या स्वतःच्या मनःस्थितीचें चित्र कोठें उमटलें असेल काय? या दृष्टीनें विचार करतां अहिल्योद्धाराचे प्रसंग उल्लेखनीय वाटतात. हे प्रसंग दोन ठिकाणीं येतात. एक रामायणांत आदिकांडांतील दुसऱ्या शतांत व दुसरा सीतास्वयंवरांत तिसऱ्या समासांत. दोन्ही पैकीं सीतास्वयंवरांतील वर्णन–निदान मला तरी सरस वाटतें. वेणाबाईंना लोकापवाद सहन करावा लागला; विषप्रयोग होऊन त्या मरणाचें दारीं पडल्या. शेवटीं समर्थ प्रकट झाले व त्यांनीं त्यांचा जणुं पुनर्जन्म केला. कारण काय तर स्त्री जाति, त्यांतून बालविधवा व गुरुभजनीं लागलेली. अहिल्योद्धाराचें वेळीं त्या स्वतःच्या आठवणींत तन्मय होऊन रामाला ' समर्थ ' म्हणूं लागतात.

कौशिक वदे रघुनाथा । गौतम आश्रम हा समर्था ॥
अहिल्या शापाची कथा । समर्था निवेदन केली ॥ ३·३९
स्त्रीदेहाचा समंधु । भोगीत होते अपराधु ।
मजकारणे दीनबंधू । कोणेकडून आलासी ॥ ३·३८
सौख्यणी वेगळा । देह धरिला होता सीळा ।
मजकारणें दीनदयाळा । अरण्य शोधित आलासी ॥ ३·३९
मज पाषाणाचें अंतर । जाणोनि केला उद्धार ।
सर्वज्ञ नामाचा बडिवार । प्रचीतीसी मज आला ॥ ३·४१
रविवंशजा रघुनंदना । जन्मोजन्मीं उपासना ।
तुझेचि ध्यान भजना । पात्र करी मज स्वामी ॥ ३·४२

वरील वर्णन रामांनीं केलेल्या अहिल्योद्धाराला जितकें लागू पडतें तितकेंच समर्थांनीं केलेल्या वेणीउद्धारालाहि लागू पडतें.

रामभजनीं मति तन्मय झाली, देव म्हणजे समर्थ व आपण बलहीन ही कल्पना जाऊन रामाबरोबर बरोबरीच्या नात्यानें संभाषण करण्याची त्यांची तयारी झाली; त्या मनःस्थितीचें चित्र 'रामगुहकसंवाद' किंवा 'नावेचे श्लोक' या छोट्या प्रकरणांत सांपडतें. पण तें प्रकरण इतकें छोटें व इतकें सरस आहे कीं, दोनचार श्लोकांचा वानवळा न दाखवितां वाचकांनीं मुळांतूनच सर्व वाचावें असें सांगावेसें वाटतें.

## समारोप

आतांपर्यंत वेणाबाईचा जीवनइतिहास व त्यांनीं निर्माण केलेलें वाङ्मय आपण पाहिलें. श्लोक संख्येच्या दृष्टीनें पाहिलें तर संतकवींच्या मानानें त्यांचें वाङ्मय फार नाहीं. काव्यगुणाच्या दृष्टीने त्याला सर्वसामान्यपणें उत्तम श्रेणींत घालतां आलें नाहीं तरी त्यांतील कांहीं काव्य स्थळें मनाला चटका लावतात यांत शंका नाहीं. विशेषतः वातावरणांतील पडसाद व अंतरंगांतील पडसाद जेथें उमटतात तेथें त्यांत प्रसाद व रसाळपणाबरोबर अलंकाराच्या छटा आपोआप येऊं लागतात. आज पुष्कळ वर्षे तें वाङ्मय अप्रसिद्ध होतें त्यामुळें पुष्कळांना तें माहित नव्हतें. आतां माहित झालें असलें तरी आजची भाषेची खाराखोरीं व विषयांच्या बदललेल्या आवडी पाहतां तें सर्वांसच आवडेल असें नाहीं. तरीपण ज्यावेळीं त्यांनीं तें लिहिलें व त्याचे मदतीनें जो समर्थ संप्रदायाचा व रामभक्तीचा प्रसार केला त्यास तें फार उपयुक्त झालें असणार यांत शंका नाहीं.

वेणाबाईचें कविमंडळांत स्थान काय! याचा विचार करतां असें म्हणावें लागतें कीं महाराष्ट्रांतल्या एका जोरदार संप्रदायाच्या प्रमुख प्रभावळींत त्यांचें स्थान आहे. एका प्रभावशाली ग्रहाभोवतालचा उपग्रह त्या होत. तेव्हां मुख्य ग्रहापेक्षां गुणानें कमी तेजस्वी व त्याचेभोवतीं फिरणारा छोटा ग्रह असें म्हटलें असतें. पण या म्हणण्यास थोडीशी मुरड घातली पाहिजे. समर्थांची रामभक्ति, कवितापद्धति, भाषेचा खडबडीतपणा इ. सर्व त्यांनीं अनुकारिले असलें तरी कांहीं बाबतींत त्यांचें वैशिष्ट्य आहे. रामदासांनीं वेणाबाईच्या सुंदरकांडापेक्षां मारुतीच्या पराक्रमाचें वेळेस

सरस वर्णन केलें असतें पण सीतास्वयंवर इतक्या रसाळपणें लिहिणें रामदासांस शक्य नव्हतें. स्वराज्यस्थापनेचा आनंद रामदासांच्या 'आनंदवन भुवन' काव्यांत जास्त आहे कां वेणाबाईच्या 'कौलांत' आहे याची तुलना करणें शक्य आहे, पण कन्येची पाठवणी करतांना जनक सुमेधेची झालेली खळबळ, सीतेची रामाला पाहून झालेलीं मनःस्थितीं, नांवाचा उच्चार न करतां नवऱ्याचें नांव सांगण्याची तिची खुबी तसेंच, मुद्रिकेची व सीतेची भेट हे प्रसंग रामदासांना सुद्धां वर्णन करणें साधलें नसतें. यावरून असें म्हणावेसें वाटतें कीं सप्तर्षिंच्या तारापुंजांत जें अरुंधतीचें स्थान असतें तें रामदासांच्या प्रभावळींत वेणाबाईचें आहे. इतर ताऱ्यांचें मानानें आकार लहान असला तरी त्यांचें स्वतःचें म्हणून एक वैशिष्टय आहे व तेज थोडें असलें तरी तें स्वयंभू आहे.

---

# मुक्तेश्वर

## अ. का. प्रियोळकर

महाराष्ट्रकवि मुक्तेश्वर याला मराठी कवींमध्यें अग्रस्थान दिलें जातें. मोरोपंत व मुक्तेश्वर यांची तुलना पांगारकरांनीं आपल्या 'मोरोपंत' (चरित्र आणि काव्यविवेचन) या ग्रंथांत केली आहे त्यांत ते म्हणतात, "त्याच्या (मुक्तेश्वराच्या) भारताचीं जीं पांचच पर्वें उपलब्ध झालीं आहेत, त्यांवरून पाहतां कवित्वाच्या दृष्टीनें मुक्तेश्वराची बरोबरी कोणताही मराठी कवि करूं शकणार नाहीं असें मला वाटतें मुक्तेश्वराच्या वाणींत लोकोत्तर प्रसाद, दिव्य ओजस्विता, व सृष्टिसौंदर्यवर्णनाची अनुपम शोभा दृष्टीस पडतात. मुक्तेश्वरानें प्रबळ मनोवृत्तींच्या प्रचंड प्रवाहाबरोबर भारती आख्यानांची महानदी खळखळाट वाहविली आहे; पंतांनीं दुतर्फा मनोहर घांट बांधून व जागोजाग उपवनाचे रम्य देखावे निर्माण करून त्या महानदीचा ओघ दोन्ही पात्रांमधून अचूक सोडून दिला आहे. मुक्तेश्वराची कविता एखाद्या खेडवळ पण कुलीन देशस्थ ब्राह्मणाच्या मुलीसारखी साधीभोळी, काळीसांवळी, पण ठसठसीत, मोकळ्या मनाची व सशक्त अशी आहे व मोरोपंताची कविता ही सुस्वरूप टापटिपीची व सुगरण अशा नगरवासी कऱ्हाड्याच्या मुलीसारखी आहे !...मुक्तेश्वरी भारती व मोरोपंती भारती यांचा विचार करतां 'दूरीकृताः खलु गुणैरुद्यानलता वनलताभिः' या दुष्यंताच्या उक्तीचें स्मरण होतें. मोरोपंत स्वतः फार मार्मिक होते. त्यांना मुक्तेश्वराची कविता पाहून फारच समाधान झालें. 'मुक्तेश्वराच्या कवितेच्या तोलाची कविता आपणास उत्पन्न करितां येणार नाहीं असे वाटून मराठी कवि हतवीर्य झाले.' असें त्यानीं म्हटलें आहे :—

मुक्तेश्वरकृत भारत आवडतें विठ्ठलासि, कीं पर्व ।
सर्व श्रवणें हरितें आशा कविच्या, अशेषही गर्व ॥१॥"

एकाद्याचें चरित्र लिहितांना लेखक आपल्या चरित्रनायकालाच सर्वश्रेष्ठ स्थान देत असतो. परंतु पांगारकरांना मोरोपंतांचें चरित्र लिहितांना त्याच्यापेक्षांही मुक्तश्वराला श्रेष्ठ ठरविण्याखेरीज राहवलें नाहीं, ह्यावरून मुक्तेश्वराची कवि या नात्यानें योग्यता सहज कळून येते. पांगारकरांप्रमाणें विनायकराव भावेही मुक्तेश्वराच्या कवितेवर निहायत खूष दिसतात. 'मुक्तेश्वर कवि लोकोत्तर आहे,' असें ते मानतात आणि म्हणतात, "ज्यानें एकदां मुक्तेश्वरी .आदिपर्वांतील आख्यानाचा स्वाद चाखला आहे तो त्यांतील रसानें वेडा होऊन पुन्हां पुन्हां तेथेंच भ्रमत राहतो. वाहात्या पाण्याचा धबधब्याचा धोत पाहून कोणाचे डोळे विटले आहेत ? गोड आम्रफळें खातां खातां त्यांची कोणाच्या जीभेला शिसारी आली आहे ? गंधर्वांच्या गाण्यानें आणि कोकिळेच्या स्वरानें कोणाच्या कानठळ्या बसल्या आहेत ? आणि कपाळ उठलें आहे ? तसेंच मुक्तेश्वराचें गोड काव्य वाचीत असतां कोणाला त्याचा कंटाळा वाटला आहे ?"

"महाराष्ट्रकवींत 'कवि' ही संज्ञा एका मुक्तेश्वराला मात्र बरोबर रीतीनें लागेल" असें कृष्णशास्त्री चिपळुणकर नेहमीं म्हणत, असें विष्णुशास्त्र्यांनीं लिहून ठेवलें आहे. हरि नारायण आपटे लिहितात, "निसर्गमनोहर अशा युवतीच्या दर्शनानें जो आनंद होतो तो आनंद मुक्तेश्वराच्या काव्यापासून होतो. तसा शुद्धानंद पंडिताच्या किंवा पंताच्या काव्यापासून होत नाहीं." फर्ग्युसन कॉलेजचे इंग्रजी भाषेचे प्रोफेसर कै. वा. ब. पटवर्धन यांनींही मुक्तेश्वराची मुक्तकंठानें स्तुति केली आहे. ते आपल्या विल्सन भाषाशास्त्रीय व्याख्यानांत म्हणतात,

" The first poet who no doubt caught the poetic fire from the torch set aflame by the Bhakti School, but who laid it freely at the service of the literary art, and composed for the sake of pure joy of literary achievement was

Mukteshwar, a Marathi poet of the very best order historically. Poetry was in his blood. For he was the grandson of Eknath, being the son of the latter's daughter.— The Mahabharata of Mukteshwar is indeed a mine of poetic beauies."

अशा प्रकारें सर्व जुन्या–नव्या लोकांनीं मुक्तेश्वराची श्रेष्ठता एकमतानें मान्य केलीं आहे.

अशा या थोर कविवराची आपणास असावी तेवढी माहिती उपलब्ध नाहीं ही खेदाची गोष्ट होय. एकादा कवि संतहि असला म्हणजे त्याच्या भक्तगणांमुळें किंवा त्याच्या सांप्रदायामुळें अतिशयोक्तिपूर्ण कां होईना कांहीं माहितीं मिळूं शकते. मुक्तेश्वर हा विशेषतः कलाकवि असल्यामुळें त्याच्यासंबंधी विशेष माहिती शिल्लक राहिली नाहीं. सुप्रसिद्ध जुना चरित्रकार महीपति याला मुक्तेश्वरानें महाभारत रचिलें आहे हें माहीत होतें. आपल्या भक्तिलीलामृत या ग्रंथांत त्यानें—

**जीं सकळ चातुर्याची खाणी। मुक्तेश्वर कवि प्रसिद्ध जनीं,**
**भारती टीका केली त्यानीं। ऐकतां श्रवणीं सुख वाटे॥**

असें लिहिलें आहे, परंतु मुक्तेश्वर हा एकनाथाच्या मुलीचा मुलगा ही माहिती त्याला असलेली दिसत नाहीं; कारण एकनाथाचें चरित्र वर्णन करीत असतांना त्यानें भक्तीलीलामृत ग्रंथांत (अ. २३) कर्नाटकांत दिलेल्या गंगाबाई या एकनाथाच्या मुलीच्या 'पुंडाजी' या मुलाचा उल्लेख केला आहे, पण मुक्तेश्वराचा केलेला नाहीं। महीपतीनें एकनाथाला गोदुबाई व गंगाबाई अशा दोन मुली होत्या असें लिहिलें आहे, पण तंजावरच्या श्री. गोविंद बाळ स्वामीच्या मठांत सांपडलेल्या टांचणावरून "एकनाथांना उमा नांवाची एक कन्या होती. ती कर्नाटकांत नागनाथ नांवाच्या गृहस्थास दिलेली होती. तिचा कनिष्ट पुत्र म्हणजे नाथांचा दौहित्र माधवस्वामी यानें शके १६१५–१६२९ या काळांत समग्र महाभारतावर ओवीबद्ध रचना केली," अशी माहिती कै. दा. के. ओक यांनीं आपल्या विराटपर्वाच्या उपोद्घातांत दिली आहे. इतकेंच नव्हे तर रामदासालाहि मुक्ते-

श्वराचा भावसभाक त्यांनीं ठरविलेलें आहे ! हें मत मान्य करण्यापूर्वी त्याचा जास्त विचार होणें अवश्य आहे. माधवस्वामी यांनीं एकनाथ आपला आजा असल्याचा उल्लेख महाभारत किंवा आपलें अन्य ग्रंथ यांमध्यें केलेला दिसत नाहीं. 'माधव' या नांवाखालीं एकनाथाची एक आरती मला धुळ्याच्या श्री. समर्थवाग्देवता मंदिरामध्यें सांपडली. ती अशी—

जयदेव जैदेव जै यकनाथा ॥ श्री येकनाथा ॥
नामस्मरणें प्राणी न पवे भ वेथा ॥ धृ. ॥
येकचि ब्रंह्मा जानुनी जाला तन्मये ॥
येउनी च्यारी मुक्ती वांदिती पाये
ये मनी यमाच्या जेथे न चले उपाये ॥
यवढी प्राप्तदशा हे वोलता न ये ॥ जै० ॥
करुनार्नव जो हारी दासाचा शोक ॥
करूनी दया तारी भजक आनेक ॥
कधीही नलगे तया विषयाचा पंक ॥
कवण जाणे उपमा त्याचा तो येक ॥ जै. ॥ २ ॥

नारायणसेवा करी सांडुनिया माना ।
नाहीं श्रमले देहीं श्रम करीताना ॥
नास्तिकवादयासी ब्रह्मभावना ॥
नानापरी बोधूनियां छेदी कल्पना ॥ जै. दे. ॥ ३ ॥

थरथर कंपे कृतांत अैसा समर्थ ॥
थकल्या च्यान्ही वाचा स्थ (स्त) वितां स्वरूपस्थ ॥
स्थववविरहित भवासिंधुबिंदुव॰ जेथ ॥
थकित होऊनी माधव स्मरे यकनाथ ॥ जैदेव ॥ ४ ॥

मुक्तेश्वरानें आपल्या आदिपर्वाच्या आरंभीच,

मातृजनक जनार्दनी । एकनाथ नमियेला ॥

असें वंदन केलें असल्यामुळें तो नाथांचा नातु होता, याबद्दल शंका घेण्यास जागाच नाहीं. याशिवाय आणखीही विशेष आत्मपर माहिती त्याच्या ग्रंथांत सांपडते. आदिपर्वाच्या उपसंहारांत तो लिहितो—

**प्रसिद्ध महाराष्ट्रदेशीं । गोदावरीतटनिवासी ॥**
**अत्रिगोत्र पवित्र वंशीं । जन्म जाहला जयातें ॥**
**तो चिंतामणी-भूदेव-कुमर । श्रीदत्तांघ्रिपद्मभ्रमर ।**
**श्रोतयां विनवी मुक्तेश्वर । क्षमा कीजे समस्तीं ॥**
**करवीरलक्ष्मी विष्णुभाजा । भैरव सुवर्णपुरींचा राजा ।**
**उभय कुळदेवतीं माझा । मस्तक पायीं स्पर्शिला ॥**

या उताऱ्यावरून या कवीचें ( १ ) गोत्र **आत्रि** ( २ ) वडील **चिंतामणि** ब्राह्मण, ( ३ ) आराध्यदेवता **श्री दत्त,** ( ४ ) कुलदेवता कोल्हापूरची **महालक्ष्मी** व सोनारीचा **भैरव** या गोष्टी स्पष्ट होतात

सभापर्वाच्या उपसंहारांतहि त्यानें कांही आत्मपर माहिती दिलेली सांपडते. काव्यसंग्रहप्रतींत ती अशी आहे:--

**गोदावरी तटनिवासी । अत्रिगोत्री पवित्र ऋषि ।**
**चिंतामणी गुणैकरासी- । पासाव जन्म जयाचा ॥**
**तो मुद्गल चिंतामणिसुत । लीलाविश्वंभर जगविख्यात ।**
**व्यास भारतींचा अर्थ । महाराष्ट्र बोलिला ॥**

यावरून मुक्तेश्वराचा बाप जो चिंतामणि त्याचें दुसरें नांव विश्वंभर व लीला ही मुक्तेश्वरांची आई असा पुष्कळांनीं तर्क केला. मुक्तेश्वराने वनपर्वाच्या उपसंहारांत,

**लीलाविश्वंभर गुरूचरणीं । पुष्पांजली वचनसुमनीं ।**
**मुक्तेश्वरें अर्पूनी मनीं । कृतकृत्यता मानिली ॥**

असें लिहिलें आहे. त्यावरून 'विश्वंभर' हा त्याचा गुरु व 'लीला' ही त्याची गुरुपत्नि असाही कांहीं लोकांचा समज झाला. वास्तविक सभापर्वाच्या उपसंहारांतील काव्यसंग्रहपाठ चुकीचा दिसतो. कारण,

**तो मुद्गल चिंतामणिसुत । लीलाविश्वंभर जगविख्यात ।**

—या ऐवजीं जास्त विश्वसनीय हस्तलिखितांत,

**तो मुद्गल चिंतामणिसुत । लीलाविश्वंभरानुग्रहीत ।**

असा पाठ आढळतो व तोच खरा आहे, असें मला वाटतें. मुद्गल हें कवीचें आडनांव नसून व्यक्तिनाम आहे. जुन्या काळीं आज सारखीं आडनांवें देण्याची विशेष प्रथा नव्हती आणि व्यक्तिनाम न देतां केवळ आडनांव कोणी योजीत नसत. महाभारतापूर्वी मुक्तेश्वरानें रामायण लिहिलेलें दिसतें. त्यांत,

**द्विजवर कविनामा मुद्गलू अत्रिगोत्री ।**
**विमळवचनमुक्तें लेववी संतश्रोत्रीं ।**

असें त्यानें म्हटलें आहे. 'मुक्तेश्वर' हें त्यानें मागाहून धारण केलेलें मुद्रानाम किंवा काव्यनाम–(ज्याला आज आपण टोपणनांव म्हणतों तें) होय. हें मुद्रानाम त्यानें कसें धारण केलें याचा इतिहास आपणास त्याच्या आदिपर्वाच्या आरंभीं सांपडतो. तो लिहितोः—

**म्हणवुनी देवतारूपें वाहिला । येक श्रीगुरू म्यां स्तविला ।**
**अभेदभक्तिचोनि भुलला । आज्ञापितु निजमुखें ॥ ४१**
**म्हणे रे बाळकें घेतला थाया ।**
**तो साच करोनि दाखवी माया ॥**
**तेंवीं त्वां आदरिलें तें वायां । केविं आम्हीं धाडणें ॥ ४२**
**मुक्तेश्वरि जो मी अवधूत । माझेनि नामें मुद्रांकित ।**
**कथा विस्तारीं भारत । महाराष्ट्रपदग्रंथीं ॥ ४ ॥**

अशाप्रकारें आपलें मुद्रा नांव धारण करून तूं महाभारत लिहिण्यास आरंभ कर असें देवतारूपी गुरूनें त्याला सांगितलें हें यावरून उघड दिसतें.

विश्वंभर, लीलाविश्वंभर, मुक्तेश्वर, ही त्याची जी आराध्यदेवता त्या शिवस्वरूपी दत्तात्रयाचीं अन्य नामें होत. या लीलाविश्वंभराचें पंचायतनस्वरूप व

त्रिमूर्ति स्वरूप त्यानें वर्णिलें आहे. त्रिमूर्तिस्वरूपाचें वर्णन करतांना तो आदिपर्वाच्या आरंभी लिहितो—



कां नाभिपादांत कमळासनु। मध्यकंठांत रमारमणु।
स्कंधावरुता त्रिलोचनु।
अंगत्रयीं जो एकु॥

याचा अर्थ असा:—
जो नाभी (बेंबी) पासून पायापर्यंत कमलासन (ब्रह्मदेव), मध्यापासून कंठापर्यंत रमारमण (विष्णु) आणि खांद्यापासून वर त्रिलोचन (शंकर), आणि या तीन अंगांनीं मिळून पुनः एक असा लीलाविश्वंभर म्हणजेच श्रीमुक्तेश्वर.

लीलाविश्वंभर हें नांव मुक्तेश्वरापूर्वी होऊन गेलेल्या दासोपंतांनीं श्रीदत्ताला पुनःपुन योजिलेलें आहे.

योगीजनवल्लभा लीलाविश्वंभरा
श्री दत्ता सद्गुरो कृष्णवर्ण सुरेश्वरा।
विज्ञानसागरा भक्तकरुणाकरा
लीलाविश्वंभरा नमन तूतें॥ वगैरे वगैरे.

स्वतः मुक्तेश्वरानें आदिपर्वांतच अनेक ठिकाणीं लीलाविश्वंभर व दत्तात्रय यांचें अभिन्नत्व निदर्शिलें आहे :-

विशेष लीलाविश्वंभरू। दत्तात्रेया जगद्गुरु।
त्याचेनि प्रसादें मुक्तेश्वरु। निरोपी तें परिसावें॥१२२ अ.२६

**चिन्मूर्ति लीलाविश्वंभरु। दत्तात्रय जगद्गुरु।**
**त्याचेनि नामें मुक्तेश्वरू। कथा बोले भारती॥ ३८ ॥ अ. ३३**

मुक्तेश्वर हें नांव धारण करण्यापूर्वी या कवीनें रामायण लिहिलेलें दिसतें. रामायणाच्या आरंभीं ' मुक्तेशस्य विराजेत मुर्हाचरा वाणी गुणग्राहिणी ' वगैरे तीन संस्कृत श्लोक व शेवटची ' विश्वंभर श्रीगुरूच्या प्रसादें ' ही ओवी मागाहून त्यानें किंवा अन्य कोणीतरी जोडिली असावी, अशी माझी कल्पना आहे. ' मुक्तेश्वर ' हें मुद्रानाम धारण करण्याच्या पूर्वी या कवीनें लिहिलेल्या दोन कविता मला अलिकडेच धुळ्याचें श्रीसमर्थवाग्देवतामंदिर व तंजी-वरच्या सरस्वतीमहाल लायब्ररी यांच्या संग्रहांत उपलब्ध झाल्या.

पहिल्या कवितेच्या शेवटीं,

**सहस्त्र मुखिं माप करितां अमुप लेख जालें।**
**चिंतामणिसुतु मुद्गुलीं तें सुख ठेलें ॥ ४ ॥**

अशा पंक्ती आहेत.

तर दुसऱ्या ' हनुमंताची आरती ' या कवितेंत,

**काळ काम रुळे जया अंकणा। नामस्मरणें तोडी आजन्मरणा।**
**मुद्गल चिंतामणि अनुसरे जाणा। कायावाचामनसा वायोनंदना॥**

असा मजकूर आहे.

मुक्तेश्वराच्या रामायणामध्यें (युद्धकांड, श्लोक ४७५) ' रुळे अंकणा क्रूर तो काळ साचें ' असा जो श्लोकार्ध आहे तो आणि वर उध्दृत केलेल्या हनुमंताच्या आरतींतील पहिला चरण यांची तुलना केल्यास त्या दोनही काव्यांचें कर्तृत्व एकाच व्यक्तीकडे असलें पाहिजे, असें सहज दिसून येतें.

आतां ज्या मुक्तेश्वरानें मुद्गल कवीला आपलें मुद्रानाम धारण करून महाभारत लिही अशी आज्ञा केली ती देवता कुठली हा प्रश्न सोडवणें फार कठीण आहे. श्रीमुक्तेश्वराचीं देवळें हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं आहेत. त्यांत संभवनीय कोणतीं याचा विचार करू. पैठणला श्रीमुक्तेश्वराचें

देवालय होतें, असें प्रो. वि. भि. कोलते यांनीं संपादिलेल्या 'स्थानपोथी' या महानुभावीय ग्रंथावरून दिसतें. हें देवालय आज पैठणला नाहीं, असें चौकशी करतां कळलें. मद्रास इलाख्यांत कांची येथें श्रीमुक्तेश्वराचें एक देऊळ आहे. आदिपर्वाच्या आरंभीं चिदंबर, हंपिविरुपाक्ष, श्रीशैलमल्लिकार्जुन, कांचीचा वरदाज व स्वामी रंगधाम या देवतांना त्यानें नमन केलें आहे, त्यावरून त्याचा दक्षिणशीं संबंध उघड दिसून येतो यावरून कांचीच्या मुक्तेश्वराचा तो भक्त असणें अशक्य दिसत नाहीं. नाशिकला गोदावरीच्या पात्रांतहि श्री मुक्तेश्वराचें एक लिंग आहे. आदिपर्वाच्या अकराव्या अध्यायांत,

**प्रत्यक्ष कासीविश्वेश्वर। स्वल्पाकृति मान्य थोर।**
**विशाळ तिळभांडेश्वर। कोणें प्रथम वंदिजे॥ १०९॥**

असा ज्याचा निर्देश आहे तो जर नासिकचा तिळभांडेश्वर असेल तर नासिकच्या श्री मुक्तेश्वराशींही आपल्या कवीचा संबंध जोडण्यास जागा होईल. परंतु काशीलाही तिळभांडेश्वराचें मोठें लिंग असल्याची अलिकडेच मला माहिती मिळाली आहे. असो.

मुक्तेश्वरानें रामायण लिहिल्याचा उल्लेख वर आलाच आहे. तें रामायण श्लोकबद्ध आहे. महाभारताचीं आदि, सभा, वन, विराट व सौप्तिक अशीं पांचच पर्वें उपलब्ध आहेत. महाभारताचीं अठराही पर्वें मुक्तेश्वरानें लिहिलीं होतीं, पण तीं मूळ संस्कृत महाभारताला मागें टाकणारीं अशीं रसभरीत झाल्यामुळें मूळ महाभारताचें महत्त्व कमी होऊं नये म्हणून गंगेंत बुडवून टाकण्यांत आलीं व पुढें मुक्तेश्वराच्या विनंतीवरून आज उपलब्ध असलेलीं पर्वें गंगेनें त्यास परत केलीं, अशी दंतकथा आहे. यापेक्षां त्या काळच्या मत्सरी व दुष्ट लोकांच्या छळास कंटाळून त्यानें महाभारत लेखनाचा उद्योग अर्ध्यावरच सोडून दिला असावा, असेंही वाटूं लागतें अशा असंत लोकांचें वर्णन त्यानें आदिपर्वाच्या पहिल्या अध्यायांत केलें आहे. तो लिहितो.

**भक्षित परनिंदेची विष्टा। पापदेह पोसिती मोठा।**
**शूकरकुकर्माचे वाटा। कुसंगसर्गी चालती॥ ६६॥**

येका अवगुणाची मासी । दावुनि सत्कविकथारसीं ।
अनंत गुणाचे गोड ग्रासीं । अरुचि आणी भोजना ॥ ६८ ॥
आपुल्या कवित्वाचा कवडा । मिरवी सधन सभेपुढां ।
साटी करीन म्हणे होडां । महंत कविरत्नांसी ॥ ६९ ॥

विराटपर्वाच्या उपोद्धातांत त्यानें आपल्या टीकाकारांसंबंधीं,

मूढ अल्पकें बोले वचनें । तें मत्सरें अथवा नेणतेपणें
गुणग्राहीक जीवेंप्राणें । प्रेम करिती या ग्रंथा ॥

असे उद्गार काढले आहेत. यावरून त्याकाळींही अशा टीकाकारांची महाराष्ट्रांत वाण नव्हती असें दिसतें. मुक्तेश्वरानें भागवतही लिहिलें आहे असा कविचरित्र, नवनीत वगैरे ग्रंथांत निर्देश सांपडतो, पण असा ग्रंथ उपलब्ध नाहीं. यांशिवाय हरिश्चंद्राख्यान, शुकरंभासंवाद, हनुमंताख्यान, गजेंद्रमोक्ष शतमुखरावणवधाख्यान, विश्वामित्रभोजन, दुर्योधनशल्य परिस्फोट, अर्जुनकामपूर्ति, मूर्खांचीं लक्षणें, एकनाथचरित्र, तशींच कांहीं पदें, आरत्या व एक भूपाळी अशीं स्फुट कविता मुद्रित झाली आहे. ‘ कुडी आत्म्याचें भांडण ’ या नांवाचें मुक्तेश्वराचें एक अप्रकाशित प्रकरण मला अलिकडेच सांपडलें आहे. वत्सलाहरणही त्यानें लिहिल्याचें ‘ भरतखंडाच्या अर्वाचीन कोशांत ’ नमूद आहे. नांदेड येथें प्रसिद्ध झालेल्या आख्यानरत्नमालेंत या नांवाचें काव्य प्रसिद्ध झाल्याचें त्याचे प्रकाशक रा. गणेश अनंत सराफ यांनीं माझ्या नजरेस नुकतेंच आणलें; परंतु या काव्याच्या भाषेवरून त्याचा कर्ता निराळाच मुक्तेश्वर दिसतो. असो.

मुक्तेश्वराचा जन्म इ. स. १६०९ सालीं झाला असें मानण्यांत येतें. कुरुंदवाडजवळ तेरवाड येथें त्यानें देह ठेवला. ज्या ठिकाणीं त्याचें वृंदावन होतें ती जागा तेथें दाखविण्यांत येते. नुकतीच मी ती पाहून आलों. जवळच श्री दत्तात्रयाचा पादुका असलेलें देवालय आहे.

जास्त माहितीकरितां मी संपादित केलेली मुक्तेश्वराच्या आदिपर्वाची प्रत पाहावी असें सांगून मी आपली रजा घेतों.

---

# दासोपंत

डॉ. म. अ. करंदीकर

दासोपंत हे श्रीसमर्थ रामदासस्वामी यांच्यापूर्वी होऊन गेले. त्यांची व त्यांच्या ग्रंथांची ओळख प्रथम इतिहाससंशोधक श्री. वि. का. राजवाडे यांनी ग्रंथमालेंत करून दिली. त्यावेळेस त्यांना जीं साधनें मिळालीं त्यापेक्षां फारच थोडीं अधिक साधनें आज आपणांस उपलब्ध झालीं आहेत. श्री. वि. ल. भावे यांनी त्यांच्या 'महाराष्ट्रकवी'मध्यें दासोपंतांचें एक ओंवीबद्ध चरित्र प्रसिद्ध केलें. परंतु त्याची विश्वसनीयता त्यांना तर नाहींच, परंतु धुळ्याच्या समर्थभक्त देवांनासुद्धां पटलेली नाहीं. त्यामुळें केवळ दंतकथा आणि भारूड यांनी भरलेलें हें चरित्रच आज कांहींशा चिकित्सेनें पत्करून दासोपंतांच्या चरित्राचा भाग सजविणे प्राप्त झालें आहे. या चरित्रांत कल्पनेची मनस्वी भर आहे; आणि पुन्हां तें चरित्रहि अलीकडील आहे. तरीहि त्यांतून जो चरित्रपर भाग आपल्यास आढळतो तो येथें आज आपणांपुढें ठेवीत आहें.

या चरित्राचें हस्तलिखित आंबेजोगाई येथील कोणी श्रीधरपंत अवधूत देशपांडे यांजकडून रा. वि. ल. भावे यांना मिळालें. प्रथम थोडासा घोंटाळा होऊन हे श्रीधरपंत म्हणजेच पांडवप्रताप, हरिविजय इत्यादि लोकप्रिय ग्रंथांचे कर्ते श्रीधरस्वामी नाझरेकर होत असा गैरसमज प्रसृत झाला आणि त्या चरित्राची महती थोडी जास्त ठरली. परंतु हें दुसऱ्या कोणा श्रीधराचें आहे असें या श्रीधरपंतानें केलेल्या आपल्या कुलदेवताच्या उल्लेखावरून स्पष्ट झालें. यानें आपलें कुलदैवत मार्तंड असें लिहिलें आहे.

प्रेमपूर नायक। ऐसे वाखाणिती व्यासादिक।
ब्रह्मादिकांचें ध्येय देख। मार्तंड माझें कुलदैवत॥ ५॥

प्रसिद्ध कवि श्रीधरस्वामी यांचे कुलदैवत विठ्ठल होतें तेव्हां हे श्रीधरपंत निराळे अहेत. हे प्रत्यक्ष दासोपंतापासून बारावे वंशज होत. दासोपंतांचे वंशज आंबेजोगाई आणि चांदा येथें आहेत. यावरून आपणांस एवढें तरी निश्चित म्हणतां येतें कीं या चरित्रांतील कांहीं भागाला परंपरागत माहितीचा आधार असावा. प्रसिद्ध झालेलें हें चरित्र अपूर्ण आहे. या चरित्रांत आलेली महत्त्वाची हकीकत पुढीलप्रमाणें आहेः–

नारायणपेठचे देशपांडे दिगंबरपंत या नांवाचे होते. त्यांच्या पत्नीचें नांव पार्वतीबाई. या दिगंबरपार्वतींना दासो दिगंबर हा पुत्र भाद्रपद वद्य ८ मी शके १४७३ (इ. स. १५५१) या दिवशीं झाला; हा श्री दत्तात्रेयांचा अवतार होय. दासोपंतांचें वर्णन चरित्रकार सांकेतिक वर्णनाप्रमाणेंच करितात :–

सुहास्यवदन आकर्णनयन। सरळ नासिक गौरवर्ण।
आजानुबाहु सर्वलक्षणसंपन्न। अनुपम्य जगीं अवतरले॥२०॥

दासोपंत लहान असतांना मोठा दुष्काळ पडला. घरांत दत्तात्रेयाची जुनी उपासना होती. या दुष्काळांत सरकारी पैका पोंचला नाहीं आणि दासोपंतांच्या वडिलांना बेदरास पकडून नेलें. बरोबर दासोपंत होते. एकंदर दोन लक्ष रुपये भरावयाचे होते. ते अर्थात एकदम भरतां येण्यासारखे नव्हते. म्हणून दिगंबरपंतांनीं पुत्र दासोपंत यास निरुपायानें ओलीस ठेवलें. दासोपंत दिसण्यास फार सुरेख होते आणि पादशहा त्यांच्या सुरूपावर अत्यंत संतुष्ट झाला. आपलें द्रव्य बुडालें तरी चालेल; परंतु हा मुलगा सुटून जाऊं नये असा या निपुत्रिक बादशहास मोह पडल्याचें चरित्रकार लिहितो! अर्थातच केवळ एक महिन्याची मुदत दिगंबरपंतांना मिळाली. महिन्याच्या आंत दोनलक्ष रुपये न भरल्यास मुलाला बादशहाच्या यातींत समाविष्ट केला जाईल असा धाक दिगंबरपंताला घालण्यांत आला. दिगंबरपंत माघारीं घरीं आले. त्यांना पैसे मिळून ते भरतां येतील असें मुळींच वाटत नव्हतें. इकडे दासोपंत बादशहाकडे होता तो दरदिवस

बेदरजवळील झरणीनृसिंह या क्षेत्रीं स्नानास जाई. पादशाहा त्याला भोजनास रोजी रुपया देई. दासोपंत तो रुपया ब्राह्मणांना दान करी आणि आपण उपोषण करी. या उपोषणाच्या तपश्चर्येनें दासोपंतास अमृतपान घडलें आणि त्याची कांति हळुहळू अधिक दैदीप्यमान झाली असें हा चरित्रकार मोठ्या आदरानें आपणांस सांगतो! महिना संपत आला तरी दासोपंताच्या वडिलांस जमवाजमव करूनहि ऐवज पुरा करितां येईना आणि हळुहळू तीं आईबापें निराश होत चाललीं! महिना भरत आला आणि शेवटच्या दिवसाची संध्याकाळ आली. त्या दिवशीं द्रव्य आलें नाहीं तर दासोपंताला यवन करणार असें निश्चितपणें सांगण्यांत आलें. त्या सायंकाळीं दासोपंताची स्थिति फार अनुकंपनीय झाली. चरित्रकार लिहितो-

**कोमाइलें मुखकमल। नेत्रीं चाललें अश्रुजळ।**
**चित्त झालें असे व्याकुळ। कांहींच त्यासी उमजेना॥**

बिचारा दासोपंत श्रीदत्तात्रेयाची प्रार्थना करूं लागला. बादशहानें यवन-काजी याला बोलाविलें, गांवांतील प्रतिष्ठित ब्राह्मणांना बोलाविलें आणि त्यांना दासोपंताच्या वडिलांशीं झालेल्या करारांचें स्मरण पुनश्च करून दिलें कोणासच कांहीं करतां येईना. अशी स्थिति आली असतां सद्गुरु श्रीदत्तात्रेय हे पाडेवाराच्या वेषानें हातीं काठी, खांद्यावर कांबळें असे द्रव्याच्या हुंड्या घेऊन तेथें आले. पाडेवारानें आपलें नांव दत्ताजी असें सांगितलें (१३७). ही गोष्ट अर्थातच तत्पूर्वी नुकत्याच होऊन गेलेल्या दामाजीपंताच्या हकीकतीसारखीच आहे हें चाणाक्ष श्रोत्यांना समजलेंच असेल प्रत्यक्ष ग्रंथकारहि दामाजीपंताचें येथें स्मरण करतो (१६२). या वेळेस दासोपंताचें वय बारा वर्षें असावें असें ग्रंथकार म्हणतो (१७५, ५४३). इतरत्र सोळा वर्षांचा उल्लेखहि आहे (२८६). यावरून असें दिसते कीं दासोपंताच्या वडिलावर बेदरच्या राजानें कांहीतरी तोहमत आणली असावी आणि त्याना अविंध करण्याची धमकी दिली असावी. परन्तु कांही युक्तीनें दासोपंताचें कुटुंब या आपत्तीतून वांचलें असावें. एवढा भाग पुन्हां दामाजी-पंताच्या गोष्टीवर कालक्रमानुसार झालेलें संस्करण दाखवितो. महाराष्ट्रांत या वेळेस खूप दुष्काळ पडले होते असें आपणास फेरिष्टाच्या इतिहासावरून

समजतें, एवढेंच नव्हे तर देशाची स्थिती त्या वेळेस किती कष्टाची आणि संकटाची झाली होती याचा जो उल्लेख रशियन व इतर प्रवाशी यांच्या वृतांतांतून आढळतो त्याचा हा आपल्याकडील समकालीन पुरावा होय असें म्हणणेंच योग्य ठरेल. असो.

पुढें दासोपंत श्रीदत्तात्रेयांच्या भेटीसाठीं माहूर येथें गेले (मातापुर ३११). दासोपंत ध्रुवबाळासारखे निघाले असें हा चरित्रकार म्हणतो (३२४). वाटेंत हिलालपुर येथें चिटगोप परगण्यांत ते आल्याचा उल्लेख पुढें सांपडतो. पुढें तेथून प्रेमपूर नांदेड या गांवावरून ते माहूरला गेले. तेथें त्यांनीं बारा वर्षे तपश्चर्या केली (६८२). येथेंच दासोपंतांना पादुकांच्या रूपानें श्रीदत्तात्रेयांचें दर्शन झालें असें आपणांस या चरित्रावरून कळतें (६९७). प्रत्यक्ष श्रीदत्तात्रेयदर्शनहि झालें, पण तें पुढें; व त्यांना महा वाक्याचा उपदेशहि झाल्याचा उल्लेख आहे (६४८). अशी माहिती या दासोपंत चरित्रांत आलेली आहे. या प्रसिद्ध परंतु अपूर्ण चरित्राच्या ७७८ ओंव्या आहेत. दासोपंतांना गुरुपदेश विशीच्या सुमारास झाला असावा असें श्री. भावे म्हणतात. परंतु हें कशाच्या आधारावरून तें समजत नाहीं.

दासोपंतांनीं यापुढें वीस वर्षे आपला काळ एकांतवासांत घालविला आणि यदृच्छापतित पानें व फळें खाऊन तपश्चर्या केली. गुरूपदेशानंतर महाराष्ट्र देश महाराष्ट्रभाषा व महाराष्ट्रधर्म यांविषयीं त्यांनीं आपलें कार्य केलें. दासोपंत फार अबरा लेखक होता असें त्यांच्या आजच्या उपलब्ध ग्रंथसंख्येवरून दिसतें. भाव्यांनीं त्यांना रोज लिहावयास लागणाऱ्या दौतभर शाईचा उल्लेख केला आहे! त्यांचें कांहीं लेखन कापडावर आहे यावरून ही गोष्ट केवळ दंतकथा नसून व्यावहारिक सत्य आहे असें मानावयास चिंता नाहीं.

दासोपंत पठडीचा वेदांती होता. त्याला पुनरुक्तीचा कंटाळा नाहीं. कदाचित ही पुनरुक्ति लोकांचे मनांत तीच तीच गोष्ट ठसावी एतदर्थहि झालेली असेल. परंतु आजच्या छापील ग्रंथांतील ही पुनरुक्ति फार अबर वाटते ही गोष्ट नाकारण्यांत अर्थ नाहीं. त्यांच्या ग्रंथांत वेदांती कल्पना आणि सिद्धांत यांचा वारेमाप वर्षाव आहे आणि त्याखालीं सामान्य वाचक कदाचित गुदमरूनसुद्धां जायचा. दासोपंतांना आध्यात्मिक अनुभव काय

असेल हें आणण्याचें साधन केवळ त्यांच्या पदसंग्रहांत दिसतें. पदसंग्रहा-वरून दासोपंत उत्कृष्ट गवई असावा ही गोष्ट सिद्ध होण्यासारखी आहे. आमच्या आधुनिक काव्यांत तांबे व सोपानदेव चौधरी यांच्या सारख्यांच्या काव्यांत गेयता अतोनात आहे. तशीच दासोपंतांच्या या पदांतून आहे.

दासोपंत हा एखाद्या देशहितदक्ष पक्षांत असावा हें भाव्यांचें अनुमान अगदींच प्रमाणरहित नाहीं. त्यांच्या कित्येक ग्रंथांवरील नमनावरून ही गोष्ट सिद्ध होण्यासारखी आहे. दासोपंतांवर आलेलें परधर्माचें संकट खरें असावें आणि त्यामुळेंहि या पक्षांत तो सामील झाला असेल. पण हा ग्रंथ-कार मनानें आणि लेखनानें चांगला दणकट आहे यांत शंका नाहीं. अशीं दणकट आणि प्रचंड माणसें त्या वेळेस होतीं म्हणूनच निभावलें.

दासोपंतांचें ग्रंथ जोगाईचे आंब्यास आहेत, त्यांतील संस्कृत व प्राकृत मिळून एकंदर पन्नास ग्रंथांची यादी आपणास उपलब्ध आहे, त्यात गीतापर असेः गीतार्णव, गीतार्थबोध, गीताभाष्य, व सार्थगीता असे चार आढळतात. याच्या जोडीला अवधूतराज, ग्रंथराज, प्रबोधोदय ( पूर्वार्ध आणि उत्तरार्ध ), पंचीकरण, अवधूतगीता, अनुगीता, वाक्यवृत्ति, स्थूलगीता, दत्तात्रेय-विषयक व इतर स्तोत्रें, कवचें, नामावळ्या, पूजा, यंत्रें इत्यादि प्रकारचे ग्रंथ आहेत. त्यांचा वाक्यवृत्ति नांवाचा गद्यग्रंथ आहे. हा ग्रंथ मुद्रित होणें आवश्यक आहे, कारण त्या वेळच्या गद्याचा हा उत्कृष्ट नमुना ठरेल, आणि त्यावरून तत्कालीन धार्मिक गद्य कोणत्या प्रकारचें होतें याचें लक्षण ठरवितां येईल.

त्यांच्या एकट्या गीतार्णवाची ग्रंथसंख्या १,२५,००० आहे. अवधूतराजांत ५,००० व पदार्णवांत सवालक्ष पदें आहेत! श्रीदत्तात्रेयसांप्रदायविषयक आगमनिगम असा एक महाग्रंथहि त्यांत आहे. आजच्या छापून सिद्ध अस-लेल्या सामग्रीवरून या प्रचंड ग्रंथकाराचें कर्तृत्व नजरेस येऊन क्षणभर आपण थक्क होतों आणि दमछाक न होतां महाग्रंथ लिहिणाऱ्या या वेदांती हरिदासाचें आपल्यास आश्चर्ययुक्त कौतुक वाटतें.

याच्या व एकनाथांच्या कांहीं आख्यायिका प्रसिद्ध आहेत. त्या कितपत ऐतिहासिक आहेत तें सांगतां येत नाहीं.

दासोपंत आपल्या वयाच्या पासष्टाव्या वर्षी माघ वद्य सप्तमी शके १५३७ अथवा इ. स. १६१५ मध्यें समाधिस्थ झाले.

आतां आपण त्यांच्या ग्रंथांची थोडी माहिती पाहूं या.

## गीतार्णव

दासोपंतांनीं गीतार्णव सवालक्ष लिहिला तो मोरोपंतांनीं पाहिला असावा. ते म्हणतात :

**दासोपंतीं केला गीतार्णव, मानवा, सवालाख ।**
**ग्रंथ परम दुस्तर तो न तयाच, जसें न वासवाला ख ॥**

तो ग्रंथ 'दुस्तर' आहे हें खरेंच ! आज छापून प्रसिद्ध झालेल्या गीतार्णवाचे १, २, १२ व अपूर्ण १३ असे अध्याय कोणालाहि वाचतां येतील. छापलेलीं पृष्ठें एकंदर ७०४ आहेत. म्हणजे सर्व ग्रंथ छापल्यावर केवढा मोठा होईल याची सामान्यपणें कल्पना येईल.

पहिल्या अध्यायांत श्री दत्तात्रेयांना नमन करून ग्रंथारंभ झाला आहे आपलें प्रतिपाद्य 'सगुण पूजा' आहे हें कवि ठिकठिकाणीं सांगतो. उदा.

**तुझें सगुण उपासितां । आगळी मानी निर्गुणता ।**
**तरी पैशिया अभक्ता । दंड न पुरती –१·१३**

हें सगुण प्रेम मोक्षाला उणें आणतें असा याचा विश्वास आहे ते म्हणतात :

**उच्चें घोषें प्रगर्जन । शरीरें करी कीर्तन ।**
**तेणें आनंदें मन । बुडोनि जाय ॥**
**मोक्षातें आणि उणें । हें सगुण प्रेम—१·११**

अर्थात सगुण प्रेमाला नामस्मरणाची अत्यंत आवश्यकता आहे हें दासोपंत जाणत होते. ते म्हणतात :

**तुझिया नामाची आठवण । तें भवरोगियां अमृतपान**
**(पृ. ६)**

याच अध्यायांत समाधीचें आलेलें वर्णन ग्रंथराजांतील वर्णनाप्रमाणेंच आहे. पातंजलयोगाचें वर्णन ठिकठिकाणीं दासोपंत करितात; यावरून त्यांनीं

ज्ञानेश्वरी पाहिली असावी आणि प्रत्यक्ष या योगशास्त्राशीं त्यांचा परिचयहि असावा हें अनुमान दृढ होतें. इतर अध्यायांतहि असे उल्लेख आपणांस सांपडतात.

दासोपंत प्रथम महाभारताचा भीष्मपर्वापर्यंतचा इतिहास अत्यंत संक्षेपानें सांगतात. आणि मग गीताभाष्यास आरंभ करितात. आपण कोणत्याच भाष्याचा आधार घेत नाहीं हें ते अगोदर सांगतात.

**न पाहे श्रोतयांचें वदन । न करीं भाष्याधारें विवरण ।**
**स्वस्वानुभवें हें मन । न म्हणौनि संपाईं ॥ (१.२१९)**

हा उल्लेख महत्त्वाचा आहे. दासोपंत पहिल्या अध्यायांत एक मोठें रूपक करितात. पांडवनंदन धर्म हा स्वात्मधर्म होय, भीम हा भयंकर भेदबुद्धि होय, नकुळ म्हणजे निरभिमान, सहदेव म्हणजे ज्ञानभाव, सारथी (कृष्ण) हा शुद्ध तत्पदार्थ, अर्जुन हा वासनामुक्त जीव, द्रुपदी ही स्वरति, विराट कर्मयोग, कुंतिभोज हा अक्रोध इत्यादि रूपक दासोपंत करितात आणि वेदांतातील कांहीं महत्त्वाच्या गुणांचा परिचय जातांजातां वाचकाला करून देतात. पण हें कंटाळवाणें विवेचन आधुनिक वाचकाला आवडणार नाहीं. अगोदर सर्व भगवद्गीता हेंच रूपक आहे असें आधुनिक वाचक मानण्यास सिद्ध होणार नाहींत. त्यामुळें पहिल्या अध्यायापासून वाचक कंटाळणार यांत आश्चर्य नाहीं. दासोपंतांचें हें विवेचन संथपणें चालू होतें. मग अर्थाचा दुसरा अर्थ, परमार्थपर अर्थ तो सांगूं लागतो. प्रत्येक श्लोक आणि प्रत्येक पद हें अशा भिन्न अर्थाचें आहे अशी दासोपंतांची समजूत आहे. वामन पक्का वेदांती परंतु त्यानें जो अत्याचार भगवद्गीतेवर केला नाहीं तो दासोपंत करतात. सुरवातीपासूनच त्यांचें प्रचंड प्रवचन चालू होतें. भीति म्हणजे काय, निश्चय म्हणजे काय, नामस्मरण म्हणजे काय? यांवर पानेंच्या पानें आपणांस वाचावीं लागतात. 'किमकुर्वत संजय' या पदानें चिंतेचा अर्थ प्रतीत होतो. लागलीच दासोपंत चिंतेवर एक प्रवचन ठोकतात. (१.२६७—२८०). धर्मक्षेत्र कां म्हणतात, त्याचे अर्थ किती यांचेंहि वाचकांस दर्शन घडतें. अधेयांवर दुसऱ्या श्लोकावरील टीके-

तच पांचपंचवीस ओंव्या येतात. 'महतीं चमूं' पद आल्याक्षणीं दासोपंत आपल्या वाचकांसाठीं प्रत्यक्षदर्शी वर्णन करतात. हें वर्णन पुढें दोन पानां-पर्यंत चालतें. पांचव्या श्लोकापुढें प्रत्येक श्लोकांत अनेक वीरांचे उल्लेख येतात. प्रत्येकाचें वर्णन केल्यावांचून दासोपंत पुढें जात नाहीं. परंतु या वर्ण-नांत मौज नाहीं. दासोपंताचे सौभद्र या पदावरचं वर्णन पहावें आणि ज्ञानेश्वरींत थोडक्यांत केलेलें वर्णन पहावें म्हणजे पाल्हाळावाचून आपला भाव सूचित करण्यांत ज्ञानेश्वर किती कुशल आहेत हें आपणास तात्काळ आढळेल. दासोपंतांना असलेलें सर्व ज्ञान वाचकास देण्याचा त्यांचा प्रयत्न त्या दिवसांच्या मानानें स्तुत्य आहे यांत शंका नाहीं. अपर्याप्तं या पदाचा अर्थ " **सामर्थ्यहीन सकळ । भंगलें जे आमुचें दळ । ते भीष्में आपलें बळ । देऊनि रक्षिलें** ' असा दासोपंत करितात. "सर्वेषु अयनेषु" (गीता श्लोक. १·११) येथून दासोपंती नानार्थलाघव सुरूं होतें. १·११ 'पणवानक गोमुखाः' याचे भिन्नार्थ दासोपंत असे देतातः–

**पणवशब्दे ढोल । आनक ते पैं मर्दळ । गोमुखें काहाळा केवळ । कुरंगादिक** ( १·७७२ ). सहदेव हा ज्योतिषी आहे असा दासोपंताचा शोध आहे (१.८३०). पांडवांच्याकडच्या लोकांचें रूपकात्मक वर्णन सद्गुणांनी व्हावयाचें हें आवश्यकच झालें. त्याप्रमाणें (पृ. ४८ पासून) वर्णन आहे. शंखां-वर सुद्धां दासोपंत नाना अर्थ लादतात. तुमुल शब्दाचें वर्णन पृ. ६०-६१ वर आहे. पण त्यांत काव्य कोठेंच नाहीं ! हा शंखनादाचा विषय पृ. ६६ पर्यंत चालू आहे. दासोपंत नवीन शब्दरचना करूनहि अर्थ सांग-तात ( पृ. १२५ पहा ). आपण सामान्यपणें गीता लावूं त्यापेक्षां अधिक असा संस्कृत व्याकरणांतील विभक्तीच्या सामनाधिकरण्याचा फायदा घेऊन ते अर्थ करितात. पण अशीं स्थळें सुदैवानें फार नाहींत. मधूनमधून त्यांनीं अध्ययन केलेल्या इतर ग्रंथांतील, विशेषतः उपनिषदांतील उतारे देऊन दासोपंत आपला अर्थ स्पष्ट करण्याचा प्रयत्न करितात; पण त्यांत पांडित्या-पेक्षां हरिदासीपणाच अधिक आणवतो.

पहिल्या अध्यायांत इतर उल्लेख म्हणजे केवडा, नारळ व फणस यांचे (पृ. ९२–९३ पहा ) व तांदुळाची धारी, गोधूमाची पुरी (पृ. १०३,

१·१९७४ ), आततायी यांचीं लक्षणें (पृ. १२३, १·२३६०–२३७१ ), त्रिकाळ प्रतिमापूजन ( १·२४७८ ), अन्यजातीची वधू, एकगोत्री विवाह ( १·२७८४–८५ ) इत्यादि होत.

दुसऱ्या अध्यायांत दासोपंतांचा पाल्हाळ पहिल्यापेक्षां अधिक दिसून येतो. वेदांतांतील माहिती शब्द येतांक्षणींच असेल तेवढी देणें ही दासोपंतांची प्रतिज्ञाच दिसते. भगवद्गीता २·८ मध्यें 'इंद्रियाणाम्' या शब्दावर दासोपंत प्रदीर्घ वर्णन करतात. 'अशोच्यान्' या ( २·११ ) पदावर असेंच वर्णन येतें. भ. २·१३ मध्यें 'कौमारं' या पदाचा अर्थ केवळ पुरुषांचें बाल्य असा केला आहे. 'मात्रास्पर्शाः' आणि 'आगमापायिनः' (२·१४) वर असेंच मोठें व्याख्यान आहे. वास्तविक २·१९ मध्यें जें महत्वाचें तत्त्व सांगितलें आहे तें ठसविण्याकरितां अधिक लक्ष देणें अगत्याचें होतें, परंतु तसें ग्रंथकाराचें लक्ष नाहीं. यापुढें आत्म्याचें जें वर्णन आहे तें भ. २·२५ पर्यंत आहे. आत्मानुभवी पुरुषाची टीका या स्थळीं दासोपंतांची नाहीं. ती एका रुक्ष वेदांत्याची चर्पटपंजरी वाटते. पृ. ७५ (११८४) मध्यें नाटकांचा उल्लेख आहे. भ. २·३९मध्यें 'सांख्ये' या पदावरील भाष्यांत सांख्ययोगाची—पंचवीस तत्त्वांची माहिती दासोपंत देतात. दासोपंत पूर्वापर संदर्भ पण ठिकठिकाणीं देतात. त्याअनुसार या पदावरील व्याख्यानांत पंधराव्या अध्यायांतील उल्लेख यतात. ( ओंव्या १७९९–१८०३ ). यापेक्षांहि दासोपंतांचें भ. २–४० वरील भाष्य पहाण्यासारखें आहे. यांत आरंभीच पातंजलयोगाची–ध्यानयोगाची माहिती दिली आहे, ती ज्ञानेश्वरींतील सहाव्या अध्यायाप्रमाणें आहे. ज्ञानेश्वरींत येणारीं चक्रें, दळें, कुंडलिनी, मुद्रा इत्यादि सर्व प्रक्रिया येथें वर्णन केलेली आहे ( १८४६–१९२८ ). जिज्ञासूंनीं ती वाचून पहावी. दासोपंतांनीं भ. २–४२ ते २–४४ वर एकदम टीका केली आहे, आणि सर्वांत मोठी टीका 'वेदवाद रताः' या पदावर आहे. 'कामात्मनः' यावरील टीकेंत आत्मकाम, पुत्रकाम, स्त्रीकाम, अर्थकाम यांविषयीं माहिती दिली आहे. 'वेदवादरताः' या एका पदावर २१९४ पासून ३४४३ ओंव्यापर्यंत टीका आहे! त्यांत एका संस्कृत विद्येच्या अभिमान्याची फजिती हरदासी पद्धतीनें

वर्णन केली आहे. हा कथाभाग सजवितांना दासोपंतांनीं आपल्या अध्ययनाचा उत्कृष्ट उपयोग केला आहे. प्राकृत भाषेंत प्राण गेला तरी बोलणार नाहीं अशा अट्टाहासामुळें या संस्कृत शास्त्र्याची काय गति झाली, त्याच्या प्राणावर कशी बेतली, आडरानांत चोरांनीं गांठल्यावर त्यानें अकारापासुन कादितेक्षपर्यंतचे जे वर्ण त्यांच्या अर्थांचा विचार केला आणि अखेरीस शंखध्वनि केलाः—

सविकल्प शंखकर्ते। पूर्वी बहुसाल होते।
परंतु निर्विकल्प बोंबेतें। प्रमाण नाथी ॥ २२४४

सभोंवतीं गांवकरी जमल्यावर 'चुः' 'घें,' 'प्र' इत्यादि शब्दांच्या अर्थानुरोधानें त्यानें आपलें वर्तन केलें; परंतु बोंब ठोकीतच होता. पुढें लोक त्याला ब्रह्मराक्षस म्हणूं लागले, एक वऱ्हाड आलेलें पळालें, त्याच्या-वर त्या वऱ्हाडाच्या चोरीचा आरोप येऊन लोकांनीं त्याला चोपलें;तरीसुद्धां हा बोलेना, इत्यादि गोष्ट पुढें पौराणिक तऱ्हेनें दासोपंत सांगतात. त्याच्या भावानें शोधार्थ येऊन त्याला कोणत्या गमतीनें सोडविलें आणि प्राकृत बोलणें हें वाईट नाहीं हें त्याच्या मनावर ठसवलें ही गोष्ट दासोपंत पाल्हा-ळानें परंतु फार मजेदार अशा पद्धतीनें सांगतात. दुसऱ्या अध्यायांत हा कथाभाग मोठा वाचनीय आहे! दासबोधाची आठवण करून देणारीं कांहीं वर्णनें या अध्यायांत येतात. पुराणाची माहिती थोडीशी (पृ. २४६) ओंव्या ४४२३–४४२६ पर्यंत आहे! दासोपंतांचें व्याख्यान म्हणजे वेदांतसिद्धांताचा ज्ञानकोश आहे. हवी तेथें टीका उघडावी आणि वेदांचा परिचय करून घ्यावा. दासोपंत वर्णनांतसुद्धां कोणत्याहि मराठी कवीला हार जाणार नाहींत. स्त्रीचें सर्व वर्णन त्यांनीं (भ· २·६२) 'विषयान् ध्यायतः' या पदावरील भाष्यांत केलें आहे. 'कामः संजायते' वरलि भाष्यांत बुवाबाजीचें वर्णन आहे. दासोपंतांचें भाष्य कांहीं ठिकाणीं आधु-निक वाचकाला असें रमवील हें खरें असलें तरी तें इतरत्र रडवील हेंच खरें!

बाराव्या अध्यायावरची दासोपंती टीका लहान आहे तरी ९९७ ओंव्यांची आहे. यांत भक्ति हेंच साधन आहे असें दासोपंत सांगतात आणि

इतर उपाय व्यर्थ आहेत असा व्यत्यासहि सांगतात (ओवी २५). ते ब्रह्मांड विवर्तरूप मानतात हें ओवी ६९ वरून स्पष्ट होईल. या अध्याया-वरील टीकेंत ज्ञानेश्वरी टीकेची वाचकाला ठिकठिकाणीं आठवण होईल (उदा. ओंवी १५०-१५१, २०१, २५०, ३३४-३३७, ४८६ इत्यादि). या अध्यायांत सगुणपूजेचें महत्त्व सांगितलें आहे असें दासोपंतास वाटतें, हें "तेपि मामेव प्राप्नुवन्ति" या पदावरील भाष्यांत (१२७-१५६ व ५२८) स्पष्ट होतें. रामदासांच्यासारखेंहि कांहीं लिहिणें या अध्यायांत भासतें; पण रामदास नंतर झाले ही गोष्ट आपण विसरूं नये (२३०, ३४९-३५३, ५१२, ५७० इ.). ' उपासते ' (२७८-३१४) या पदावरील टीका तत्कालीन आचारविचारांसाठीं वाचनयि आहे.

तेराव्या अध्यायावरील टीका पूर्ण प्रसिद्ध नाहीं. या अध्यायांत क्षेत्र-क्षेत्रज्ञ योगांत जहद्‌अजहल्लक्षणेनें दासोपंत अर्थ सांगतात. पट्टीच्या वेदां-त्याला हीं टीका आवडेल हें काय सांगावयास हवें ! ' ब्रह्मसूत्रपदैः ' या प्रसिद्ध पदाचा अर्थ-ब्रह्मज्ञानाचीं सूत्रें, ब्रह्मवाचकें पदें नाना, असा दासोपंत करितात. या अध्यायांत दंभाचें वर्णन 'अदंभित्व' पदाखालीं आहे ( पृ. १५४ पहा ). अहिंसेचें वर्णन ओंवी १९१०-१९३९ पर्यंत आणि ' आचार्यो-पासन ' ओंवी २०००-२१५४ पर्यंत आहे. येथें ज्ञानेश्वरांची आठवण केवळ विषयतुलनेनेंहि होते. ' वैराग्यं ' वरील टीकेमध्यें पुन्हां वर्णनप्रपंच आहेच. पृ. १८१ वर मानवी पिंडाची गर्भावस्थेतील वाढ प्रत्येक महिन्या-गणिक कशी होते याचें वर्णन आहे; येथें वाचकाला दासबोधांतील वर्णनें आठवतील. रोगांच्या नांवाची एक यादी पृ. १८५-१८६ वर आहे ती वाचनीय आहे.

दासोपंतांची गीताटीका वाचून आश्चर्य वाटतें, पण समाधान होत नाहीं. ह्यांत सरसपणा आढळत नाहीं. त्यांत वर्णनाचा बारकावा असला तरी सूक्ष्मदृष्टि नाहीं. पृ. १६ वरील दुर्योधनाचें किंवा पृ. २३ वरील सौभद्राचें वर्णन ज्ञानेश्वरीशीं ताडून पाहिलें तर कवि आणि कर्कश टीकाकार यांतला फरक आपल्याला जाणवतो.

दासोपंतानें आपल्या संस्कृत अध्ययनाचा उपयोग सर्वत्र केला आहे. विशेष स्थळें पुढें देतों. पंचसूना पृ. १०७, आततायिनः पृ. १२३, योग पृ. ११३, कुंडलिनी पृ. ११४. षट्चक्रें पृ. ११४-११५, पुराणें पृ. २४६३. यांखेरीज इतरत्रहि तीं वाचकाला आढळतील. यांवरून त्याचें संस्कृत अध्ययन चांगलें होतें याची शंका राहात नाहीं.

दासोपंताच्या गीतार्णवाकडे तत्कालीन परिस्थिति दाखविणारे उल्लेख त्यांत आहेत काय या दृष्टीनें पाहूं लागल्यास कांहीं कांहीं तशीं स्थळें आपणांस आढळतातः अश्वत्थामा चिरंजीव आहे ही कल्पना,सहदेव भाडळी ज्योतिष (पृ. ४३ ),तत्कालीन पूजाप्रकार (पृ. ९६ ), श्वशुरानें मुलाची स्त्री नेणें (पृ.१२४), प्रत्यक्ष बंधूंनींच बहिणींचा अभिलाष धरणें, सगोत्रविवाह (पृ. १४६), बुवाबाजी (पृ. २८६ ), सोळा उपचार (पृ, १७-१८ ), इत्यादि विषयांवर थोडी थोडी उद्गाररूप माहिती मिळते. तीं अल्प परंतु महत्त्वाची आहे.

फारशी शब्द थोडे आढळतात. त्यात गजब—गजबु ( गहजब ), अदावळ (अदावत), मिराशी (पृ. १०१ ), इत्यादि आहेत. दासोपंतानें शिरगोळा (पृ. १५२ ), घट (पृ. १५५) हरळी (पृ. २९४), नदी, मृत्तिकाभेद, कपडे, कशिदा यांना दिलेले अनेक शब्द पहिले म्हणजे त्याच्या शब्दप्रभुत्वानें आपण आश्चर्यचकित होतों. ही सर्वच स्थळें वाचून पाहाण्याजोगीं आहेत.

आतां आपण दासोपंतांचा दुसरा प्रसिद्ध ग्रंथ जो **ग्रंथराज** त्याजकडे वळूं या. या ग्रंथाचीं एकंदर आठ प्रकरणें आहेत. हा ग्रंथ त्यांच्या तत्त्वज्ञानाचे सार होय. या ग्रंथावरून दासोपंत आणि रामदास यांच्यापैकीं रामदासांनीं दासोपंताचे किती ऋण घेतलें असावें तें कांहींसें स्पष्ट होईल-या ग्रंथांत नामस्मरणानें परमेश्वर मिळतो हें मुख्य प्रतिपाद्य आहे. गुरु कसा असावा—जो रोकडा ब्रह्म साक्षात्कार करतो तो गुरु, जो ज्ञानाचा विचार करतो तो नव्हे—हें सांगून पुढें पहिल्या प्रकरणांत असद्गुरु, (२२-३० ) शिष्य, मूर्ख, (४३—५४ )व सच्छिष्य यांचीं लक्षणें सांगितलीं आहेत. त्या त्या विषयावरील दासबोधांतील भागांशीं हीं ताडून पहावींत. दुसऱ्या प्रकरणांत गुरुशिष्यसंवादानें बंध, बंधमोक्ष, संसार, जन्ममरण, अवस्था जीव इत्यादींचें निरुपण आहे. उपनिषद्वाक्यें समर्थनार्थ देऊन हें विवरण,

दासोपंत करितात. या प्रकरणांत रामदासांच्या दासबोधांत जशा शब्दांवर कोट्या केलेल्या आहेत तशा आढळतात. ( जाणपणाचिया कळा। आत्मज्ञानेंविण विकळा इ.) प्रकरण तीनमध्यें गुरुस्तुति आहे. त्यांत परिग्रह व परित्याग यांवांचून ' योगु न सधे ' ( ३९ ) असें दासोपंत म्हणतात. आश्रमधर्म केलेच पाहिजेत, त्यावांचून धर्मसाधन नाहीं असें ते स्पष्ट सांगतात. यांत पुढें जीवाची दशा वर्णन केली आहे; तिची दासबोधाशीं तुलना करून पाहावी. प्रकरण ४ मध्यें महावाक्यांचें विवरण वेदांती पद्धतीनें ( जहदजहल्लक्षणा इत्यादींनीं ) केलेलें आढळतें. अविद्या, प्रकृतिपुरुष, लिंगशरीर, पंचतत्त्वें इत्यादिकांचें फार उत्कृष्ट असें विवरण आहे. आणि दासोपंत सांगतात : **हें गुरुशिष्यांचें बोलणें। आइकावें गुरुमुखेंचि तेणें॥** ( १९५ ) ग्रंथावरून केवळ विचार कळों येईल. यांतहि उपनिषद्वाक्यें प्रमाणांसाठीं घेतलेली आहेत. प्रकरण पांचमध्यें प्रपंच, देहअवस्था, अभाव, विवर्त इत्याहि भाग आला असून प्रकरण सहामध्यें प्रकृतिगुण, निरास, गुण, उपाधि, कर्मेंद्रियें इत्यादींचें योग्य परंतु आटोपशीर रीतीनें विवरण केलें आहे. प्रकरण सातवें मन स्थिर कसें करावें, योगसिद्धि, संगमोचन, सहजस्थिति, जीवन्मुक्तदशा इत्यादिविषयींच्या प्रतिपादनानें भरलेलें आहे, तर प्रकरण आठमध्यें पुन्हां जीवन्मुक्ति, लयविक्षेप, समाधि, ( संप्रज्ञात, असंप्रज्ञात ), अन्वयसिद्धि, व्यतिरेकसिद्धि इत्यादि बाबी आल्या आहेत. ग्रंथकार सांगतातः "नानाशास्त्रें होती। परंतु अद्वैतशास्त्रा सरी न पवती." हा ग्रंथ लहान असूनहि बहुगुणी आहे. हा दासबोधाचा आरंभ आहे. दासबोधाचे सर्व गुणविशेष यांत आढळतात. यांत पाल्हाळ नसून रेखीवपणा फार आहे आणि भाषा साधी, समर्पक व रोखठोक आहे. लेचेपेचेपणा त्यांत नसून ठामपणा आहे. हा ग्रंथ दासोपंतांच्या ग्रंथामधला अमूल्य ठेवा आहे. या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत श्री. देव यांनीं दासोपंत आणि रामदास यांच्या ग्रंथांची तुलना करून त्यांतील थोडीं साम्यें दाखविलीं आहेत. प्रत्यक्ष ग्रंथ वाचतांना तर वाक्यागणिक दासबोधाचें स्मरण होतें व हा ग्रंथ रामदासांनीं पाहिला असेल यांत संशय उरत नाहीं. गुणवत्तेनें, भाषेनें, ज्ञानानें, प्रतिपादनानें हा ग्रंथ अत्युत्तम, अमूल्य असा आहे आणि त्याची शिफारस करणें म्हणजे प्रत्यक्ष तो वाचण्यासच सांगणें होय.

**दासोपंतांचीं पदें** हा पण फार रमणीय ग्रंथ आहे. यांतील पदें लहान आहेत, परन्तु तीं रसपूर्ण आहेत; आणि काव्यगुणांत इतर कवींच्या पदांना हार जाणारीं नाहींत. त्यांत कांहीं मोठीं पदें आहेत, कांहीं पाळणे आहेत, कांहीं विराण्या आहेत, वेदांती रूपकें (एकनाथासारखीं)आहेत, वीहरांचा प्रीतिकलह आहे, सासुरवास, डांक, देहवर्णन, क्रोधी संन्यासी इ. सर्व प्रकार आहेत. दासोपंतांची पदें गेय आहेत आणि त्यांचें संगीतशास्त्राचें ज्ञान त्यांत ठिकठिकाणीं आढळतें. या पदांची तुलना ( २६४ व १५४० ) नामदेवांच्या पदांबरोबर व कांहीं ठिकाणीं एकनाथांच्याबरोबर (३०७) फार उत्कृष्ट रीतीनें करित येईल. हिंदी पदें पण दासोपंतांनीं केलेलीं आहेत. या पदसंग्रहांतील ७७२ व ७७४ हीं पदें अविस्मरणीय आहेत. तशींच ६०३, ६२७, ९३२, ९४१, १२४३, १२९४, १५६७, १३९४-१३९७ हीं पदें अत्यंत वाचनयि आहेत.

दासोपंतांनीं लिहिलेले सारे ग्रंथ आपणांस केव्हां वाचावयास मिळतील कोणास ठाऊक ! परंतु या उद्योगाच्या प्रचंडपणानें आपण दिपून जातों. गीतार्णवाचा वेदांती पाल्हाळ जरी मनाला संतुष्ट करीत नसला तरीं पदें आणि ग्रंथराज हे ग्रंथ अपूर्व आहेत. त्यांना वाङ्मयीन मोल तर आहेच; परंतु त्यांचें आध्यामिक मूल्य ज्यांचा अधिकार आहे त्यांनाच कळू शकेल !

---

# मो रो पं त

र. वि. हेरवाडकर

## संतकाव्याची कामगिरी

प्राचीन मराठी वाङ्मय केवळ काव्यदृष्ट्याच नव्हे तर वैचारिक दृष्ट्याहि अत्यंत समृद्ध असें आहे. अहेतुकपणें निर्माण झालेल्या या जुन्या काव्याचें स्वरूप कलात्मकच आहे हें विशेष. प्राचीन मराठी काव्याचा पहिला काल-खंड जें संतकाव्य तें आपल्या गुणामुळेंच तत्कालीन समाजजीवनाशीं एक-रूप होऊन अत्यंत लोकप्रिय झालें. ईश्वरभक्तीचा समाजाच्या अठरापगड जातींत प्रसार करून त्यांना स्वधर्माची योग्य शिकवण संतांनीच दिली. इतकेंच नव्हे, तर संस्कृत पंडितांची मिरास झालेलें ज्ञानभांडार बहुजन-समाजासाठीं मराठींतून खुलें करण्याचें लोकोत्तर कार्य महाराष्ट्रीय संता-ळ्यांनीच केलें यांत शंका नाहीं. निवृत्तिमार्गी शिकवण देऊन संतांनीं समाजाचें व देशाचें अकल्याण केलें असें म्हणणारे म्हणोत; पण परचक्राचें आक्रमण होत असतांना स्वधर्म आणि स्वभाषा यासंबधीं अभिमान जागृत करण्याचें श्रेय संतांनाच दिलें पाहिजे.

## पंडित काव्याचें स्वरूप

पुढील कालखंडांत पंडित कवींनींहि संतांची दिव्य परंपरा चालविली; पण त्यांची पद्धती संतांपेक्षां थोडी निराळी होती. लोकांना परिचित असलेल्या आख्यानांच्याद्वारा पंडित कवींनीं बहुजनसमाजांत भक्तीचा डांगोरा पिटला. संतांच्या काव्याची बैठक आध्यात्मिक असल्यामुळें बहुजन-समाजाला तें उच्च ज्ञान पचविणें जरा जड गेलं. परंतु पंडितांचें तसें

झालें नाहीं. पुराणिक, हरिदास, कीर्तनकार यांच्याद्वारा त्यांच्या वाङ्मयाचा प्रसार झाल्यामुळें समाजाला पचेल रुचेल अशाच पद्धतीनें त्यांनी काव्य निर्माण केलें. शिवाय पंडित कवी हे विद्वान्, बहुश्रुत व रसिक असल्यामुळें त्यांचें काव्य संतांच्या काव्यापेक्षां अधिक कलात्मक झालें. बहुतेक पंडित कवी हे संस्कृतज्ञ असल्यामुळें त्यांच्या काव्यांत रचनेचा रेखीवपणा निर्माण झाला आहे. व्याकरणशुद्धता व अलंकार या दृष्टीनें पंडितांचें काव्य हें मराठी भाषेचें उत्कृष्ट लेणें होय.

## मोरोपंतांचें प्रातिनिधिकत्व

मोरोपंत हे पंडित कवि असल्यामुळें त्यांच्या काव्यांत वर उल्लेखिलेली पंडित कवींची वैशिष्ट्यें उतरलीं यांत आश्चर्य नाहीं. साहित्यक्षेत्रांत सामान्यपणें असा एक संकेत आहे कीं, कोणत्याहि लेखकाच्या वाङ्मयाचें मूल्यमापन करतांना त्याच्या चरित्राचाहि विचार होणें आवश्यक होय. वाङ्मय हें जीवनाचें प्रतिबिंब असल्यामुळें भोंवतालच्या परिस्थितीची जी क्रियाप्रतिक्रिया व्यक्तिमनावर होते, त्यालाच संस्कार असें म्हणतात. या संस्काराच्या मुशींतूनच वाङ्मयाचें सुवर्ण निर्माण होत असतें. या संस्कारामुळें व्यक्तिमनाची एक विशिष्ट घडण बनत असते व त्याचाच ठसा प्रामुख्यानें त्या व्यक्तीच्या वाङ्मयावर उमटत असतो. हा त्रिकालाबाधित सिद्धांत आहे. कोणत्याहि देशांतील वाङ्मयाचा आपण विचार केला तर आपणास हीच गोष्ट मुख्यत्वेंकरून आढळते कीं, तें वाङ्मय तत्कालीन परिस्थिति व व्यक्ति यांच्या संघर्षांतूनच निर्माण झालेलें असतें. व्यापक अर्थानें म्हणावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल कीं, तें वाङ्मय तत्कालीन परिस्थितीचें प्रातिनिधिक (Representative of the age) असतें. या दृष्टीनें पाहतां मोरोपंत हे त्या कालांतील एक प्रातिनिधिक कवि होते हें उघड आहे.

## बालपणांतील संस्कार

मोरोपंतांचा जन्म शके १६५१ सालीं कोल्हापूरनजीक पन्हाळगड येथें झाला व तेथेंच त्यांचें सर्व बालपण गेलें. केशव पाध्ये व गणेश पाध्ये या विद्वान बंधूंच्या हाताखालीं त्यांचा सर्व विद्याभ्यास झाला. हा काल मोरो-

पंतांच्या आयुष्यांत अत्यंत महत्वाचा असा होता. कारण या कालांत संस्कृत महाकाव्यें व साहित्यशास्त्र यांचा अभ्यास त्यांनीं केल्यामुळें पुढील ग्रंथरचनेसाठीं आवश्यक असणारी त्याची मनोभूमिका या वयांतच तयार झाली होती. शिवाय त्यांचे वडील रामाजीपंत यांनीं त्यांना स्तोत्रें, रूपावली, समासचक्र इत्यादि शिकविलीं होतीं. लहानपणचें हें संस्कृताध्ययन त्यांना पुढें उपयोगी पडलें. मोरोपंत हे जुन्या धार्मिक वातावरणांत वाढल्यामुळें त्यांच्या मनावर हिंदूधर्माचे पवित्र संस्कार झाले होते व याच कारणामुळें त्यांची स्वधर्मनिष्ठा वाढीस लागली व त्यामुळें त्यांचें पुढील आयुष्य भग-वद्भक्तींत रंगून गेलें. शिक्षणाचें खरें ध्येय उत्कृष्ट संस्कार हें जर मानलें तर मोरोपंतांना खरें शिक्षण लाभलें होतें यांत शंका नाहीं. अशा रितीनें पंतांच्या मानसिक शक्तीच्या विकास पन्हाळगडावर झाला. भक्तमंजरीकार राजाराम प्रासादी यानें पंतांचें वर्णन ' मूस ओतली भक्तीची । वैराग्याची खाणी ते । ' असें केलेलें आहे. पन्हाळगडावर सृष्टिसौंदर्य उत्कृष्ट असल्यामुळें पंतांच्या बालपणाचा हा काळ अत्यंत आनंदांत गेला असला पाहिजे हें-उघड आहे.

## संस्कृत ग्रंथलेखन व वाचन

पंतांचे वडील रामाजीपंत ऊर्फ बापूजी यांनीं लवकरच पन्हाळगड सोडला व तेथून ते आपले मित्र बाबूजी नाईक बारामतीकर यांना भेट-ण्यास बारामतीस गेले. बाबूजी नाईक मोठे श्रीमंत गृहस्थ असून पेशव्यांचे निकटचे आप्त होते. त्यांनीं बापूजी पंतास आपल्या कोठीचे अधिकारी नेमलें. बारा वर्षानंतर म्हणजे शके १६७५ त मोरोपंतांनीं आपल्या वडिलांची भेट घेतली. पन्हाळगडावर असतांना पंतांनीं रघुकिरातादि संस्कृत काव्यें केवळ वाचलीं होतीं असें नव्हे तर त्यापैकीं बरेचसे ग्रंथ त्यांनीं स्वत, लिहून काढले होते. त्याकाळीं छापखान्याची सोय नव्हती म्हणून असोः किंवा ग्रंथ लिहून काढल्यानें तो चांगला समजतो अशी समजूत असो. त्यांनीं अनेक ग्रंथांचें लेखन केलें होतें व विशेष आश्चर्याची गोष्ट अशी कीं, त्यांचें हें लेखन शेवटपर्यंत चालू होतें. या कालांत मोरोपंतांनीं सुमारें ५०

संस्कृत ग्रंथ लिहून काढले अशी माहिती कै. पांगारकरांनीं मोरोपंतांच्या चरित्रांत दिली आहे. मालाकार चिपळूणकरांनीं मोरोपंतांचा संस्कृत काव्यनाटकांशीं चांगला परिचय होता किंवा नाहीं या संबंधी शंका प्रदर्शित केली आहे; परंतु त्याला वरील पुरावा समर्पक उत्तर होय.

## बारामतींतील वास्तव्य

मोरोपंताच्या स्वतंत्र काव्यरचनेला खरी सुरुवात ते बारामतीस आल्या-नंतरच झाली. तेथें बारामतीकरांच्या घरांतील स्त्रियांसाठीं सीतागीत, सावित्री गीत व रुक्मिणी गीत हीं त्यांनीं तयार केलीं. या गीतांनीं बाबूजी नाइकांचें चित्त वेधलें. त्यामुळें खूष होऊन त्यांनीं सालीना ५०० रुपयांवर पंतांची पुराणिक म्हणून नेमणूक केली.

श्रीमंत बाबूजी नाईक हे शिवभक्त असून त्यांना पौराणिक कथांची आवड होती. पंतांची भूमिका पुराणिकाची व कीर्तनकाराची अशी दुहेरी असल्या-मुळें गांवांतील सगळे लोक पंतांवर खूष होते. बाबूजी नाईकांना पंतांच्या बद्दल जितका अभिमान वाटे तितकेंच पंतांना नाईकांविषयीं प्रेम वाटे. इ. स. १७७७ सालीं मोरोपंतास एक घर बक्षीस मिळाल्याचा दाखला सांपडतो. बाबूजी नाईकाप्रमाणें त्यांचें पुत्र पांडुरंगराव हेहि पंतांवर खूष होते.

पंत हे गृहस्थाश्रमी कवि होते. त्यांचा परिवार बराच मोठा होता, त्यांच्या पत्नीचें नांव रमाबाई असून त्यांना तीन पुत्र व तीन कन्या होत्या. पंतांना आनंदीबाई या नांवाची दुसरी स्त्री होती अशी आख्यायिका आहे. मोरोपंतांनी आपल्या भावांचीं मुलें स्वतःच्या मुलाप्रमाणें वाढविलीं. त्यांच्या घरांतील स्त्रिया व पुरुष हीं एकत्र गुण्यागोविंदानें राहत असत. त्यामुळें त्यांचें गृहजीवन अत्यंत आनंददायक होतें. त्यांचा मधला मुलगा रामकृष्ण हा जास्याच हुशार असून त्याचें शिक्षण पंढरपुरास बाबा पाध्ये यांच्याकडे झालें होतें.

मोरोपंतांचें आचरण अत्यंत पवित्र असून त्यांची ईश्वरभक्ति अत्यंत उत्कट अशी होती. त्यांनीं रामोपासना केली. ते रामभक्त होण्यासंबंधी अशी एक आख्यायिका आहे कीं, अहमदनगर येथें एक गृहस्थ रामभक्त होते. वृद्धापकाळ जवळ येत असल्यामुळे व संतति नसल्यामुळें आपल्या

पश्चात् रामाची पूजा कशी चालेल याची त्यांना काळजी वाटे परंतु स्वप्नांत श्रीप्रभुरामचंद्रांनीं त्यांना दृष्टांत दिल्यामुळें बारामतीपर्यंत चालत आऊन त्यांनीं रामाच्या मूर्ती पंतांच्या स्वाधीन केल्या. मोरोपंतांनीं ती प्रभुकृपा समजून तिचा आदरपूर्वक स्वीकार केला. पंतांचा स्वभाव अत्यंत उदार होता. स्वकीयाशी तसेंच परकीयाशीं ते सारखे-पणानेंच वागत. विनयामुळें त्यांचें पांडित्य अधिक खुलून दिसे. पंतांच्या मित्रमंडळींत विठोबादादा चातुर्मासे, विठोबा ताहराबादकर, रामजोशी सोलापूरकर, इत्यादि थोर थोर मंडळी होती. पंतांच्या आर्येचा प्रसार जोशीबुवांनींच केला. पंतांच्या समकालीन कृष्ण दयार्णव, शिवदिन केसरी निरंजनमाधव इत्यादि प्रसिद्ध व्यक्ती होत्या. त्यांच्या काव्याचा पंतांच्या काव्यावर व पंतांच्या काव्याचा त्यांच्यावर बराच परिणाम झाला होता.

काशीयात्रेचें महाभाग्य पंतांना लाभलें होतें. बारामती जवळच असणाऱ्या माळेगांव येथील अमरसिंह जाधव यांचेबरोबर मोरोपंत काशीयात्रेस गेले. अमरसिंहाच्या बरोबर बरेच लोक होते. पांडुरंगराव नाईक यांच्या कुटुंबां-तील कांहीं मंडळी तसेंच त्यांचे आश्रित व बारामतींतील अनेक लोक अशी ही प्रचंड यात्रा होती. या यात्रेंत अनेक सुखसोई होत्या. यात्रेंत पंतांनीं आपल्या कवितेस काशींतील विद्वान लोकांकडून प्रशास्तिपत्रक मिळविलें. मराठी भाषेच्या दृष्टीनें पंतांची ही थोर कामगिरी होय. त्यांनीं प्राकृत भाषे-विषयीं संस्कृत पंडितांचें जें मतपरिवर्तन केलें त्याला इतिहासांत तोड नाहीं. या काशीयात्रेंत त्यांनीं कांहीं काव्येंहि रचलीं. त्यापैकीं गंगावकिली व विष्णुपदवकिली हीं प्रसिद्ध आहेत. यांत बारामतींतील इतर लोक, इष्ट-मित्र व आप्तजन यांचा उद्धार व्हावा म्हणून त्यांनीं परमेश्वरास परोपरीनें विनविलें आहे व आपलें प्रेमऋण त्यांनीं फेडलें आहे. काशीयात्रेनंतर परत येतांना महेश्वर येथें अहिल्याबाई होळकरीण हिनें त्यांचा सत्कार केला. काशीस असतांना अहिल्याबाईबद्दल त्यांनीं गंगेपाशीं वकिली केली होती.

## अखेर

अशा रितीनें मरेपर्यंत विद्यासेवा व भगवद्भजन हीं त्यांनीं चालविलीं. रामायण, महाभारत व भागवत यांतील कथारस प्राकृतांत आणला. शिवाय

कित्येक स्वतंत्र अशीं प्रदीर्घ व लघुकाव्यें लिहिलीं. त्यांच्या अखेरच्या काळांत त्यांनीं केकावली हें उत्कृष्ट काव्य रचलें. केकावली लिहिल्यानंतर त्यांना साक्षात्कार होऊन ते रामरूप झाले अशी आख्यायिका आहे. काव्य हें त्यांच्या भगवद्भक्तीचें प्रमुख साधन होतें. शके १७१६ या सालीं चैत्री पौर्णिमेच्या दिवशीं मोरोपंत रामरूप झाले. मृत्यूच्या दिवशीं त्यांनी प्रान्त-प्रार्थना म्हणून एक हृदयस्पर्शी काव्य लिहिलें. त्यांत त्यांनीं तुळशी, भूमाता गोमाता, आप्तजन इत्यादिकांनीं केलेल्या उपकाराचें स्मरण आदरपूर्वक केलें आहे. पंतांच्या मृत्यूनंतर महाराष्ट्राच्या उत्कर्षालाहि उतरती कळा लागली. कारण महाराष्ट्रांतील महादजी शिंदे, सवाई माधवराव, अहिल्याबाई होळकर इत्यादि सर्व थोर व कर्ते पुरुष याचवेळीं इहलोक सोडून गेले. अशा रितीनें महाराष्ट्र शारदेच्या मुकुटांतील एक दिव्य मणी हरपला.

## मोरोपंतांची कविता

पंतांच्या कवितेची संख्या तीन लाख आहे अशी समजूत आहे· मालाकार चिपळूणकर यांनींहि त्याला दुजोरा दिला आहे. परंतु प्रत्यक्ष पुराव्यावरून ती सुमारें पाऊण लाख आहे असें समजण्यास हरकत नाहीं. त्यापैकीं केवळ आर्याच चाळीस हजारावर आहेत. त्यांची उपलब्ध कविता साठ हजार असून अनुपलब्ध पण नष्ट झालेली अशी १०–१५ हजार कविता गृहीत धरल्यास पाऊण लाख कविता होते.

ब्रह्मोत्तर खंड हा पंतांचा पहिला ग्रंथ होय. व भस्मासुराख्यान हा दुसरा होय. हे दोन्ही ग्रंथ शिवस्तुतीपर आहेत. ब्रह्मोत्तर खंडांत बारा-मतींतल्या विश्वेश्वराची व स्वतःची कुलदेवता असलेल्या शंकराची कीर्ति पंतांनीं गायिली आहे. हा ग्रंथ पहिला म्हणण्याचें कारण या ग्रंथाच्या शेवटच्या भागांत पंतांनीं स्वतःचा ‘ कवि नवीन ’ असा उल्लेख केला आहे. त्या दोन्ही ग्रंथांना स्कंदपुराणाचा आधार आहे. कुशलवचरित हें सुंदर आख्यान त्यांनीं जैमिनीअश्वमेधाच्या आधारें रचलें आहे. त्याशिवाय मदालसा-ख्यान, हरिश्चन्द्राख्यान, इत्यादि आख्यानें त्यांनीं मार्कंडेयपुराणाच्या आधारानें रचिलीं आहेत. प्रल्हादविजय हा त्यांचा ग्रंथ विष्णुपुराणावर

आधारलेला आहे. आपले यजमान बाबूजी नाईक बारामतीकर यांच्या मुलींसाठीं रचलेलीं सीतागीत, सावित्रीगीत व रुक्मिणीगीत हीं काव्यें अत्यंत सुरस आहेत.

मोरोपंतांनीं आपल्या कवितेचा रचनाकाल कोठेंहि दिला नाहीं. याला एकच अपवाद म्हणजे त्यांचा "प्रल्हादविजय" हा ग्रंथ होय. या ग्रंथाचा काल पंतांनीं शके १६८० पौष शु. ८ मी असा दिला आहे. या पुराव्यावरून पंतांनीं आपल्या आयुष्याच्या ऐन तारुण्यांत हा ग्रंथ लिहिला असें सिद्ध होतें. ज्या वयांत सामान्यतः सांसारिक मोह निर्माण होतात त्या वयांत वर उल्लेखिलेला ग्रंथ त्यांनीं लिहिला हें कौतुकास्पद वाटतें. प्रल्हादविजय हा ग्रंथ बोजड आर्यावृत्तांत रचल्यामुळें तो चांगला उतरला नाहीं असा भाव्यांनीं आक्षेप घेतला आहे. त्याला त्यांनीं कडू कार्ल्यांच्या भाजीची उपमा दिली आहे. परंतु भाषेच्या दृष्टीनें पाहिल्यास हा ग्रंथ चांगला आहे असें म्हणावेसें वाटतें. सदर काव्य पंतांच्या उत्तम काव्यांपैकीं एक आहे असा अभिप्राय पांगारकरांनीं दिला आहे. प्रल्हादविजयाप्रमाणें मदालसाख्यान व हरिश्चन्द्राख्यान हीं पंतांचीं दोन्ही काव्यें गोड आहेत. हरिश्चन्द्राची कथा मुळांतच करुणरसात्मक असली तरी लोकप्रिय आहे. अशा लोकप्रिय आख्यानाच्या आधारेंच पंतांनीं स्वतःचें काव्य अधिक लोकप्रिय केलें. मदालसाख्यानातील शब्दचित्रापुढें रविवर्म्याच्या ऋतुध्वज आणि मदालसा यांचें चित्र अधिक बोजड वाटतें.

## कृष्णविजय

पंतांच्या प्रदीर्घ रचनेपैकीं कृष्णविजय हा प्रथम रचलेला दिसतो असें विधान भाव्यांनीं केलें आहे. महाराष्ट्रसारस्वतकारांचा हा तर्क बरोबर वाटतो, कारण या ग्रंथाची भाषा बरीचशी क्लिष्ट असल्यामुळें पुढील ग्रंथांत आढळून येणारा सफाईदारपणा त्यांत नाहीं. कृष्णविजयाला 'बृहद्दशम' असें दुसरेंहि नांव आहे. हा ग्रंथ भागवताच्या दशम स्कंधावर मुख्यत्वेंकरून आधारलेला आहे. हा बाबा पाध्ये यांच्या सांगण्यावरून पंतांनीं रचला अशी आख्यायिका आहे. मुळांतल्या भागवताप्रमाणेंच यांत एकंदर ९०

अध्याय असून पूर्वार्धात ४९ व उत्तरार्धात ४१ अशी त्यांची विभागणी आहे. या ग्रंथाचा पूर्वार्ध हा बराच क्लिष्ट आहे. उत्तरार्ध मात्र चांगला उतरला आहे यांत शंका नाहीं. या ग्रंथासंबंधीं वामनरावजी ओक म्हणतात "पंत स्वप्रतिभाबळानें नूतन अलंकार घडवून ते मूळ ग्रंथकाराच्या सरस्वतीवर घालून तिला कशी साजरी करितात हें पहावयाचें असेल तर तसें करण्यास हें काव्य हें उत्तम स्थळ आहे. यांत पंतांनीं आपले पदरचे नग घालून मूळ ग्रंथकाराच्या वाणीला ठिकठिकाणीं अत्यंत मनोहारित्व आणलें आहे." हा अभिप्राय रसिकमान्य होण्यास मुळींच प्रत्यवाय दिसत नाहीं.

सुदामचरिताची गोड हकीकत यांत आली आहे. तसेंच रुक्मिणीनें स्वतःच्या स्वयंवराची सांगितलेली रम्य कथाहि त्यांत आहे. कृष्णाचा रथ जवळ आल्यावर त्याच्या गळ्यांत माळ घालतांना—

माळा ऊचलितां प्रिय आपणहि रथावरूनिया लघला।
लघ लागेना तो घे अंकीं, करुणासमुद्र कालविला॥

असें सुंदर वर्णन केलें आहे. तसेंच रुक्मिणीहरणानंतर

हंसें मुक्ता नेली मग केला कलकळाट काकांनीं
हाकांनीं नभ भरिलें, जाय सुरांच्याहि नाद हा कानीं॥

असें केलेलें वर्णन उत्कृष्ट आहे.

या ग्रंथांतला सुभद्राविवाहाच्या कथेचा भाग हा फारच सरस उतरला आहे. त्यांत नर्मविनोद असल्यामुळें ती कथा अधिक रम्य झाली आहे सुभद्रा व अर्जुन यांच्या प्रथम भेटीचें वर्णन

यति दर्शना सुभद्रा येऊनि बैसे निजाग्रजाजवळ।
न बळ प्रेक्षी परि यतिहस्तींचा पाहतां गळे कवळ॥

तसेंच सुभद्रेला रथांत बसलेली पाहतांच

तेव्हां धावुनि बैसे पार्थ सुभद्रारथीं, जसा पाटीं।
सुचिर क्षुधित ब्राह्मण हां हां म्हणतांहि बाढल्या ताटीं॥

असें अर्जुनाचें गमतीदार वर्णन केलें आहे. सुभद्राहरणाच्या या आख्यानांत पंतांनीं बळिरामाचें रेखाटलेलें चित्र फारच आकर्षक असें झालें आहे.

जा जा उठा ! मुलीला पाहूं, बांधू वरा, धरा आणा ।
प्राणाधिक तो येना तरि घालाव्या मदंघ्रिच्या आणा ! ॥

या वर्णनावरून रागीट बळरामाच्या प्रेमळ व उदार हृदयाची कल्पना येते. हें आख्यान हरिदासांनीं विशेष लोकप्रिय केलें.

## मंत्रभागवत

दशम स्कंधावर आधारलेला कृष्णविजय हा ग्रंथ विशेष चांगला झाला नाहीं. म्हणून पंतांनीं दशम स्कंधावर पुनः एक नवी रचना केली. त्याच्या आधीचे नऊ स्कंध व पुढील दोन स्कंध अशी त्याला जोड दिली, म्हणजे संपूर्ण भागवत त्यांनीं आर्याबद्ध केलें. याला त्यांनीं मंत्रभागवत असें नांव दिलें आहे. यांत 'नमो भगवते वासुदेवाय' हा मंत्र सर्वत्र साधलेला आहे. या ग्रंथांत वेदांत, कथा इत्यादि सर्व गोष्टी आलेल्या आहेत. यांतील पहिले नऊ स्कंध बरेच आटोपशीर असून दहावा स्कंध अधिक विस्तारात्मक आहे. यांत श्रीकृष्णाच्या बाळपणींच्या अवतारकथा अत्यंत हृदयंगम पद्धतीने सांगितल्या आहेत. कृष्णानें आपल्या मुखांत विश्वरूप-दर्शन यशोदेला कसें दाखविलें त्याचें वर्णन पंत असें करतात–

वासी वदन प्रभु तो, त्यांत ब्रह्मांड पाहती झाली ! ।
त्यांत व्रज, त्यामध्यें आपणही–हें विलोकितां भ्याली ॥

अकराव्या स्कंधांत कृष्णानें उद्धवास केलेला उपदेश वेदांतपर असला तरी पंतांनीं तो अत्यंत सुलभ केलेला आहे. पंतांना हा मंत्रभागवत ग्रंथ इतका आवडला कीं, या ग्रंथाच्या शेवटीं ते आनंदानें म्हणतात–

देऊनि उत्साह मला श्रीभागवतार्थ वदविला साचा ।
आनंद यापुढें तो तुच्छ ब्रह्मादिपद विलासाचा ! ॥

हा ग्रंथ वाचल्यावर तो लिहितांना पंतांची प्रतिभा परिणतावस्थेस पोचली होती असें खात्रीनें वाटूं लागतें.

भागवतांतील कांहीं कथाभाग घेऊन पंतांनीं स्वतंत्र काव्यें रचलीं आहेत. त्यांस भागवतीप्रकरणें असें नांव आहे. त्यांपैकीं वामनचरित, अंबरीषाख्यान, सुदामचरित, ध्रुवचरित, भृगुचरित इत्यादि विशेष प्रसिद्ध आहेत.

हीं सर्व काव्यें सुरस आहेत. या काव्यावरून पंतांच्या स्वतंत्र काव्यशक्तीची कल्पना येते. त्यांत रसाळपणा आहे. 'गोपी गोडवा' या काव्यांत तर गोपींच्या मनोवृत्तीचें शब्दचित्र फारच यशस्वीपणें रेखाटलें आहे. त्यांच्या मनोवृत्तींच्या निरनिराळ्या छटा त्यांत कलात्मकतेनें व्यक्त झाल्या आहेत. मत्सर, राग, निराशा व प्रेम या सर्व भावनांचा गोड संगम प्रस्तुत काव्यांत आढळून येतो.

## मंत्ररामायण

मोरोपंतांच्या रामायणांपैकीं मंत्ररामायण हें प्रदीर्घ आहे. या राम यणांत 'श्रीराम जयराम जयजयराम' हा त्रयोदशाक्षरी मंत्र असल्यामुळें त्यांस मंत्ररामायण असें नांव पडलें आहे. या रामायणांतल्या युद्धकांडांत पंतांनीं वीर रसाचा उत्कृष्ट परिपोष केलेला आढळतो. या कांडांतल्या युद्धांचीं वर्णनें अगदीं हुबेहुब साधलीं आहेत. या काव्यांत विविध अलंकार तसेंच शृंगार, वीर इत्यादि विविध रस असल्यामुळें हें मंत्ररामायण फारच चांगलें उतरलें आहे यांत शंका नाहीं. या काव्यामुळें संस्कृताभिमानी व प्राकृताभिमानी या उभयतांचें समाधान झालें. या ग्रंथांत कांहीं सुंदर दृष्टांत दिले आहेत ते पाहण्यासारखे आहेत. उदाहरणार्थ–

रामाचें रचिलें चरित्र मुनिनें वाल्मीकिनें संस्कृतीं।
नाहीं हानि कदापि अन्य कविहीं तें वर्णितां प्राकृतीं
मुक्तांचा रचिलाचि हार पहिला जो रेशमाच्या गुणें
तो कार्पासगुणें करूनि करितां काय प्रभेला उणें ? ॥

प्रस्तुत काव्यांत पंतांचें प्राकृत भाषेविषयीं अलोट प्रेम दिसून येतें. या रामायणाच्या उत्तरकाण्डांत पंतांनीं सर्व रामरक्षा आणली आहे. ही एक अजब कामगिरी होय. या ग्रंथांत एकूण १८८० आर्या असून १४६ मंत्र आहेत. या रामायणांत आर्यागीति वृत्ताचाच पंतांनीं आश्रय केलेला आहे.

## अष्टोत्तरशतरामायणें

मंत्ररामायणात श्रीरामांचें चरित्र गायिलें परंतु त्यांचें समाधान झालें नाहीं. तें पुनः गावें असें पंतांना वाटूं लागलें म्हणून त्यांनीं अनेक रामायणें

लिहिलीं. हीं रामायणें अष्टोत्तरशत म्हणजे १०८ आहेत अशी एक एक समजूत आहे. याला एक पुरावा सापडतो, तो म्हणजे पंतांच्या एका खाजगी पत्रांत रामायणाची अष्टोत्तरशत संख्या झाली पाहिजे असें लिहिलेलें आहे. या रामायणापैकीं ८०–९० रामायणें उपलब्ध आहेत. बाकीचीं सर्व-भक्षक कालाच्या उदरांत गडप झालीं असावींत असा तर्क करण्यापलीकडे तूर्त कांहींच करतां येणें शक्य नाहीं. पंतांनीं मराठींतल्याप्रमाणें संस्कृतांतहि एक रामायण लिहिलें आहे. त्यांत त्यांचें संस्कृत भाषेवरील केवळ प्रेमच नव्हे तर अगाध प्रभुत्व दिसून येतें. या रामायणांचा काल उपलब्ध नसल्यामुळें तीं केव्हां रचिलीं हें सांगणें महत्प्रयासाचें आहे. मंत्ररामायणानंतर पंतांनीं हीं अष्टोत्तरशतरामायणें रचिलीं व त्यांचा काल शके १७०८ –१७०९ हा असावा असा महाराष्ट्रसारस्वतकार भावे यांचा तर्क आहे. अष्टोत्तरशतरामायणांपैकीं नामांक रामायण, परंतु रामायण, धन्य रामायण, हुं रामायण, निरोष्ठ्र रामायण, दामरामायण इत्यादि विशेष प्रसिद्ध आहेत. या रामायणांत पंतांनीं अक्षर कौशल्य दाखविल्यामुळें कांहीं विद्वानांच्या मतें तीं केवळ चित्रकाव्यें होत. परंतु सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास त्यांत अक्षर चमत्कार असला तरी त्याला चित्रकाव्य संबोधणें हें योग्य नव्हे. कारण त्यांत कित्येक प्रसंग अत्यंत बहारीचे आहेत. कथानकाच्या ओघांत कोठेंहि अर्थहानि न होऊं देतां अक्षरचमत्कार साधल्यामुळें हीं रामायणें मोरोपंतांच्या केवळ पांडित्याचाच नव्हे तर उज्ज्वल प्रतिभेचाहि साक्षात्कार घडवितात; आणि म्हणूनच त्यांना उत्तम काव्याच्याच सदरांत घालणें समंजसपणाचें होईल. या रामायणांत कवीनें कांहीं संस्कृत व कांहीं हिंदी वृत्तें वापरलीं आहेत, हा एक नवीनच प्रयोग होय. भाव्यांनीं म्हटल्याप्रमाणें "ही कसरत साधण्यास आमच्या कवीचे श्रम म्हणजे हत्तीस आपल्या शुंडादंडावर पुष्पमाला खेळविण्याचे जितके श्रम तितकेच बहुधा होत। असें जें कित्येक पंतभक्तांचें म्हणणें आहे तें यथार्थ नाहीं असें कोण म्हणेल?" 'हीं रामायणें आमच्या कवीच्या वाग्देवतेची केवळ स्वतंत्र लीला आहे' असा मालाकार चिपळूणकरांचाहि अनुकूल अभिप्राय आहे. या रामायणांत पंतांच्या बौद्धिक तेजाबरोबरच त्यांचा रामभक्तिविषयक हळुवार हृदयाचा

प्रेमळपणाहि दिसून येतो. शिवाय हीं रामायणें त्यांनीं स्वयंस्फूर्तीनें लिहिलीं असल्यामुळें त्याला एक निराळेंच तेज चढलें आहे.

## महाभारत

महाभारत हा मोरोपंतांच्या प्रतिभेचा कळसच होय. मोरोपंतांच्या सर्व वाङ्मयकृतींत आर्याभारत हा श्रेष्ठ दर्जाचा ग्रंथ होय. पंतांनीं हा ग्रंथ शके १६९४ ते १७०४ या दहा वर्षांच्या कालांत रचला असें भावे म्हणतात. यावेळीं पंतांचें वय चाळीशीचे पुढें असून त्यांचें शरीर व मन हीं उन्नतावस्थेंत होतीं. पंतांच्या काव्यकमलाचा सुवास या पूर्वींच सगळीकडे दरवळला होता. कारण हा ग्रंथ रचीत असतां त्याच्या नकला करून घेणाऱ्यांच्या उड्यावर उड्या पडत असत,

महाभारत हा ग्रंथ मुळांतच आबालवृद्धांचा प्रिय. त्याचा पंतांनीं मराठींत उत्कृष्ठ अनुवाद केल्यामुळें तो अधिकच लोकप्रिय झाल्यास नवल नाहीं. मात्र हा ग्रंथ मराठींत, आणतांना मुळांतील बराचसा तात्विक भाग गाळून पंतांनीं त्यास स्वतंत्र ग्रंथाची योग्यता आणून दिली. सामान्य जनांना आवडतील अशींच आख्यानें त्यांनीं घेऊन तीं आकर्षक स्वरूपांत रसिकांपुढें मांडलीं आहेत. विविध प्रसंगाची शब्दचित्रें त्यांनीं इतक्या कलात्मकतेनें रेखाटलीं आहेत कीं, ते प्रसंग आपणासमोर घडत आहेत कीं काय असें वाटूं लागतें. या शब्दचित्रांत चित्रगुण (Pictorial Value) असल्यानें तीं वाचकाच्या हृदयाला भिडतात. हीं शद्बचित्रें अत्यंत मार्मिक, निवडक व आटोपशीर अशीं आहेत. उदारणार्थ कर्णपर्वातील कर्णशल्यसंवाद हा अत्यंत बहारदार असा उतरला आहे. त्यांतील एकमेकांनीं दिलेली प्रत्युत्तरें उत्कृष्टच आहेत. कर्णपर्वांत कर्णाच्या रथाचें चाक पृथ्वीनें गिळलें त्यावेळचें वर्णन पंत करतात–

**बहु यत्न करी प्रार्थी परि धरिलें सोडिनाचि चाक रसा।**
**द्विजशापमान्य पतिसा गुरु कर्ण न मान्य तीस चाकरसा॥**

या आर्येंतील करुणरसात्मक विनोद हा उत्कृष्ट दर्जाचा आहे हें निःसंशय होय. सूर्यास्ताच्या आंत शल्याला ठार करीन ही अर्जुनाची प्रतिज्ञा.

आजि पहाशील सख्या मच्छरशकलीकृतांग कर्णातें।
तदसृक्कणसिक्तातें आकाशातेंहि शोणवर्णातें ॥

अशी किती सूचकतेनें व्यक्त झाली आहे ती पहा. अर्जुन व कर्ण हे दोघे आपल्या रथासह समरांगणात समोरासमोर आले असतां त्यांना–

उत्साह तेज विद्या शिक्षा बळ धैर्य शौर्य दोघांचें।
तुल्यचि ज्यापरि गंगायमुनांच्या पावनत्व ओघांचें ॥

अशी गंगायमुनांची उपमा किती मार्मिकतेनें दिली आहे!

वीररसाच्या वर्णनाप्रमाणें करुण रसाचें वर्णन पंत अत्यंत हळूवारपणें करतात. उदाहरणार्थ अभिमन्यूच्या मृत्यूनंतर त्याचें प्रेत मांडीवर घेऊन उत्तरा शोक करते.

हा जन सखीं समाजीं तुमचा सोडूनि काय पद रमला?।
चुकल्यें. क्षमा करावी, पसराया उशिर काय पदर मला? ॥
नेत्रें उघडूनि पहा दासी तुमचीच, हे नव्हे अन्या।
भलती स्पर्शील कशी? मी सत्य विराट नृपतिची कन्या ॥
हा सातवा परिचय मास, पहा! गणुनि लोटले साच।
इतुक्यांत कसें विटलां? साधु म्हणति
"सख्य साधुशीं साच" ॥

हा शोक पाहून डोळ्यांना पाणी येणार नाहीं तो पुरुष विरळा.

उत्कृष्ट व स्वतंत्र कल्पना, उत्तम अलंकार या दृष्टीनें पाहतां हा ग्रंथ केवळ भाषांतर म्हणतां येणार नाहीं. या ग्रंथाचा कोठलाहि भाग पाहिला तरी त्यांत पंतांच्या नवनवोन्मेषशाली प्रतिभेचा विलास दिसून येतो. मूळ महाभारताप्रमाणें याचे अठरा पर्वे असून प्रत्येक पर्वाच्या सुरवातीच्या आर्यांच्या प्रथमाक्षरांनीं 'श्रीपांडवसहायो भगवानरविंदाक्षो जयति' हा अष्टादशाक्षरी मंत्र साधला आहे. तसेंच दुसरी एक मौज या ग्रंथांत आहे. ती अशी कीं, प्रस्तुत ग्रंथाची कविता संख्या १७१३६ (पराडकर प्रत) ही आहे. यांतील आकड्यांची बेरीज अठराच आहे.

भारतीय युद्ध अठरा दिवस चाललें होतें. गीतेचे अठरा अध्यायच आहेत. शिवाय कौरव व पांडव यांचें सैन्य अनुक्रमें अकरा अक्षौहिणी व सात अक्षौहिणी मिळून एकंदर अठरा अक्षौहिणी होतें. या ग्रंथांत प्रसंगानुसार विशिष्ट रस रंगविण्यांत तसेंच पात्रपरिपोष उत्कृष्ट प्रकारें करण्यांत पंतांनीं उच्चांक गांठला आहे. पंतांच्या आर्याभारतांतील पात्रें जिवंत व टसठशीत अशींच वाटतात. कर्णपर्व हा भाग इतर पर्वांच्या मानानें विशेष चांगला आहे. कर्णाचें मृत शरीर पाहून कर्णपत्नी पृथ्वीवर रागावून म्हणते—

**मज कां गिळिलें नाहीं? पापे! रथचक्र गे कसें गिळिलें?।**
**दे उत्तर, ऐकों दे! कां न वदसि? तोंड काय गे खिळिलें?।।**

यांतील सवाल रोकडा नाहीं काय?

## हरिवंश

मंत्रभागवतांत श्रीकृष्णचरित्र लिहूनहि पंतांनीं पुनः एकदां श्रीकृष्ण चरित्र लिहिलें. हा ग्रंथ म्हणजे हरिवंश होय. श्रीव्यासांनीं महाभारत रचलें परंतु त्यांत श्रीकृष्ण चरित्र मुख्यतः नसल्यामुळें त्यांनीं हरिवंश हा ग्रंथ महाभारताची पुरवणी म्हणून श्रीकृष्णचरित्रपर स्वतंत्र ग्रंथ लिहिला. पंतांनीं हरिवंश हा ग्रंथ पांडुरंगराय बारामतीवर यांच्या विनंतीवरून लिहिला. कारण हरिवंशाच्या सुरुवातीसच पंत म्हणतात—

**श्रीपांडुरंगरायें असकृत्प्रेमें करूनि सांगावें।**
**भगवन्निदेश जाणुनि सुयश यथाबुद्धि मग न कां गावें?।।**

या ग्रंथांत कृष्णचरित्रांतील उत्तरभाग आलेला आहे. मात्र यांतील कृष्णकथा त्यांच्या इतर ग्रंथापेक्षां अधिक विस्तारात्मक आहे. यांत एकंदर ५४ अध्याय असून आर्यासंख्या सुमारें साडेपांच हजार आहे. हा ग्रंथ सुमारें शके १७०८ मध्यें रचला असावा असें भाव्यांचें मत आहे. हा ग्रंथ पंतांच्या इतर ग्रंथांच्या मानानें तितकासा लोकप्रिय नाहीं. तरी देखील त्यांत कांहीं सौंदर्यस्थळें आहेत. विशेषतः ग्रंथाच्या उत्तरार्धांत तीं अधिक आहेत. तेराव्या अध्यायांत—

हांसति, बहु हांसविती, परम मधुर वदति बोबडे बोल ।
वाजाविति पर्णवाद्य श्रुतिसुख, जन करिति सर्वाहि लोल

असें कृष्णबलरामांच्या बालपणींच्या क्रीडेचें सुंदर वर्णन केलें आहे.

तेहतिसाच्या अध्यायांत पिंडारकास गेलेल्या सर्व यादववीरांच्या जल-क्रीडेचें वर्णन कसें सुरस केलें आहे तें पहा—

जळवाद्यें वाजावती उडविति जळयंत्रहस्त नीरातें ।
गाती भागगीतें ताडिति सिंधूंत वीर वीरांतें ॥
जरि चन्द्र सहस्त्रातें निर्मळ आकाश एकदां धरिल ।
तरि वृष्णि सुरवधूमुखरम्य जलधिची बरोबरी करिल ॥

प्रद्युम्नाच्या कथाचरित्रांतील भाग यांत आला आहे. राजकन्या प्रभावती प्रद्युम्नाच्या अलौकिक सौंदर्यानें मोहून गेली असतां आपली दासी हंसी हिच्यामार्फत प्रद्युम्नाला तिनें बोलाविलें तेव्हां—

राजात्मजा सलज्जा होवुनि उभी अधोमुखी राहे ।
साहे तेज न बाला मदनानन तिर्यगीक्षणें पाहे ॥

असें तिच्या अवस्थेचें शृंगारिक वर्णन अत्यंत सरस केलें आहे.

पंतांच्या काव्यांत शृंगाररसास फारच कमी वाव आहे; पण अशा कांहीं ठिकाणीं तो प्रकर्षानें असला तरी त्याचें स्वरूप संयमित असल्यामुळें कलेच्या दृष्टीनें तें वर्णन अतिशय रम्य झालें आहे. हा ग्रंथ विस्तारात्मक असला तरी त्यांत आटोपशीरपणा बराच आहे. विस्ताराचें पंतांना भय वाटत असावें असें दिसतें; कारण ‘ परि बहुविस्तर होतां भाषाग्रंथीं न गोड लागावा ’ ही जाणीव त्यांनीं ग्रंथलेखन करीत असतांना बाळगली होती.

## स्फुटकाव्यें

मोरोपंतांचीं स्फुटकाव्यें बरींच आहेत. त्यापैकीं ब्राह्मणमाहात्म्य, गीतार्या, भगवद्गीतास्तुति, अहल्योद्धार, केकावलि हीं विशेष प्रसिद्ध आहेत. पंतांनीं वामनाच्या अनुष्टुभ वृत्ताच्या समश्लोकींचें आर्यावृत्तांत रूपांतर केलें आहे. किंबहुना पंतांच्या गीतार्या त्या वामनपंडिताच्या समश्लोकीच्या आधारें रचल्या आहेत. पंत म्हणतात—

> श्रीमद्वामनविरचित गीताटीकोत्तमा समश्लोकी।
> आर्याटीका तेचि, च्छंद निराळे, विचित्र हे लोकीं॥

अशा रीतीनें पंतांनीं वामनपंडितांचा अधिकार मान्य करण्यानें त्यांची शालीनता अधिकच खुलून दिसते. भगवद्गीतास्तुति यांत १५ आर्या असून अहल्योद्धार यांत ५१ पदें आहेत. अहल्योद्धार हें साकी आणि आर्या या दोन वृत्तांत लिहिलें आहे. मात्र या दोन्ही वृत्तांतल्या कथा परस्परांना पूरकच आहेत–

## केकावलि

केकावलि हें पंतांच्या स्फुटकाव्यापैकीं अत्यंत लोकप्रिय व उत्कृष्ट असें काव्य आहे. या काव्यांत स्वतःच्या उद्धारासाठीं प्रभूला त्यांनीं परोपरीनें आळविलें आहे. हें काव्य त्यांनीं काशीयात्रेहून परत आल्यानंतर आयुष्याच्या अखेरच्या कालांत लिहिलें आहे. पंत म्हणतात.

> कृतांतकटकामलध्वजजरा दिसों लागली।
> पुरःसरगदांसवें झगडतां तनू भागली !

यावरून बरेंच वय झाल्यावर हें काव्य रचलें आहे हें सिद्ध होतें. य काव्यांत स्वतःला मयूर कल्पून दयामृतघन अशा प्रभूला त्यांनीं आर्ततेनें हाक मारली आहे. केकावलि हें नांव या दृष्टीनें सार्थ ठरतें. हें काव्य अत्यंत प्रासादिक असून काव्यगुणांच्या दृष्टीनें तें सर्वोत्कृष्ट आहे. त्यांत पंतांच्या अव्याज अशा प्रभुभक्तीचें उदात्त चित्र प्रतिबिंबित झालें आहे. त्यांत भक्ताच्या प्रेमळ हृदयाचें दर्शन घडतें. या काव्यासाठीं पृथ्वी हें अत्यंत योग्य असें वृत्त वापरलें आहे. यांत एकदर १२१ श्लोक आहेत. परमेश्वराला पंतांनीं 'मदुद्धरण मात्र कां जड तुम्हा दिसे' असे निरुत्तर करणारे कांहीं सवाल यांत टाकले आहेत. कित्येक टीकाकारांच्या मतें केकावलि हें एक उत्कृष्ट ध्वनिकाव्य आहे. केकावलीनंतर पंतांनीं फारसें लेखन केलें नसावें असें अनुमान करण्यास बरीच जागा आहे.

मोरोपंतांच्या स्तोत्रकलापापैकीं संशयरत्नमाला व आर्याकेकावलि हीं महत्त्वाचीं होत. संशयरत्नमालेंत आपणास परमेश्वर लवकर कां प्रसन्न होत

नाहीं यासंबंधीं त्यांनीं अनेक शंका घेतल्या असून त्यांचें निराकरण त्यांनीं स्वतःच केलें आहे. त्यांच्या या काव्यांत व्यक्त झालेल्या शंका तर्काधिष्ठित असल्या तरी त्या बुद्धिवादी मनाला पटण्यासारख्याच आहेत. एखाद्या पट्टीच्या वकिलाला शोभणारा असा कोटिक्रम त्यांनीं यांत केला आहे. या काव्याचा शेवट मात्र अत्यंत गोड आहे. शेवटीं ते म्हणतात–

**कीं मागें गुप्त उभा असासि प्रेमें उभारुनी बाहे।**
**तरि काय बाळकाचे तूं सादर बोल ऐकशी बा हे॥**

शेवटच्या या शंकेंत त्यांचा विनय हा त्यांतील सूचित विनोदामुळें उत्कृष्टपणे शोभून दिसतो.

आर्याकेकावलि हें केकावलि इतकेंच गोड काव्य आहे. या काव्याची रचना पंतांवर एखादें भयंकर संकट आलें असतांना झाली असावी असें त्यांतील अंतर्गत प्रमाणावरून वाटतें. पंत सांगतात–

**संकट वारुनि रामा! निज गुण कीर्तन करावया योजीं!**
**आपुलिया थोरपणें रामा मजला स्वकिंकरी माजी॥**

हें संकट नक्की कोणतें असावें हें सांगणें कठिण आहे. एवढें मात्र खरें कीं आर्याकेकावलि या काव्यांत उत्कृष्ट काव्यगुण आहेत. आर्याकेकावलीच्या एकंदर १७४ आर्या आहेत. यांतील करुणभाव अत्यंत हृदयंगम आहे. आर्याकेकावलि व संशयरत्नमाला यांप्रमाणेंच पंतांच्या नामार्या, नामसुधाचषक, नामरसायन इत्यादि लघुकाव्यें चांगलीं उतरलीं आहेत.

पंतांचीं संतवर्णनपर प्रकरणें एकूण ३२ आहेत. या संतवर्णनात पंढरी-माहात्म्य, विठ्ठलस्तुति, विठ्ठलस्तोत्र इत्याहि आहेत. तसेंच प्रसिद्ध साधुकवींवरहि त्यांच्या कांहीं आर्या आहेत. ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, रामदास, संतचरित्रकार महिपतिबाबा ताहराबादकर, वामन-पंडित, मुक्तेश्वर इत्यादि थोर पुरुषांचा गुणगौरव करून त्यांनीं आपलें वाङ्मयऋण फेडलें आहे. या सर्व कवींचें वाङ्मय त्यांनीं संपूर्णपणें वाचलें असलें पाहिजे असा तर्क करण्यास बराच बळकट पुरावा आहे. वामनपंडितासंबंधीं ते म्हणतात–

नमिला साष्टांग श्रीपतिभक्तिरसज्ञ वामनस्वामी।
रसभवना तत्कवना मानीं या तेंवि धाम न स्वामी॥

तसेंच मुक्तेश्वरासंबंधीं ते लिहितात–

श्रीमुक्तेश्वर कविवर, यातें कोण न शुभेच्छु वंदील?
बंदी लक्ष जयाचे, ज्याचें यश भव्य जेंवि मंदील॥

सर्वांशीं सुहृद्‌भाव बाळगणाऱ्या पंतांनीं केलेला हा गुणगौरव त्यांच्या यशांत अधिकच भर घालतो.

## मोरोपंतांच्या काव्याचें मूल्यमापन

पंतकाव्याचें अंतरंग जितकें मनोहर आहे तितकेंच त्याचें बहिरंगहि मनोहर आहे. मोरोपंतांची कविता सारी यमकबद्ध असली तरी इतर कोणीहि कवीपेक्षां त्यांनीं यमकें अधिक लोकप्रिय केलीं. यमकांचें विविध प्रकार मोरोपंती काव्यांत जितके दिसतात, तितके इतर कवींच्या काव्यांत क्वचितच दिसत असतील. व्याकरणदोष व अर्थहानि न होऊं देतां यमक, अनुप्रास, श्लेष इत्यादि अलंकारांनीं नटलेली त्यांची कविता सुंदर आहे. यमकप्राचुर्य हा पंतांचा दोष सांगणाऱ्या टीकाकारांचें लक्ष त्यांच्या काव्यांतील अर्थ-सौंदर्याकडे गेलें नाहीं हें उघड आहे.

पंतांच्या काव्याचें स्वरूप संस्कृतनिष्ठ असल्यामुळें त्याला प्रौढपणा आलेला आहे. संस्कृत काव्यांचे संस्कार त्यांच्या मनावर झाले असल्यामुळें संस्कृत पद्धतीची रचना, संस्कृत काव्यांतले संकेत हे त्यांचे दोष मानणें अयोग्य ठरेल; किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं संस्कृताच्या अतिपरिचयामुळेंच त्यांचें काव्य भारदस्त व व्याकरणशुद्ध असें झालें आहे. संस्कृत भाषेशीं परिचय असणाऱ्यांना त्यांचें काव्य क्लिष्ट वाटणार नाहीं. ज्या टीकाकारांनीं त्यांचें काव्य क्लिष्ट आहे असा आरोप केला आहे त्यांना पंतांच्या काव्य-शक्तीची घडण समजली नाहीं असेंच म्हणावें लागेल. पंतांनीं मराठी भाषेवर संस्कृत भाषेचा संस्कार घडविला, एवढेंच केवळ नव्हे तर कित्येक परकीय म्हणजे यावनी शब्द मराठींत आणून ते रूढ केले व अशा रीतीनें

त्यांनीं मराठी भाषा समृद्ध केली. त्यांनीं केलेले भाषेचे हे प्रयोग यशस्वी झाले आहेत.

पंतांची भाषा कमावलेली असल्यामुळें त्यांच्या आख्यानकाव्यांत प्रसंगानुरूप व पात्रानुरूप अशी भाषा त्यांनीं वापरली आहे. त्यांच्या आख्यानांत बहुतेक प्रसंग नाट्यात्मक असल्यामुळें ते आकर्षक झाले आहेत. केवळ भाषेमुळें त्यांची पात्रें अमर झालीं आहेत असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. या गुणामुळेंच त्यांचें काव्य उच्च दर्जाचें झाले आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं, त्यांचें काव्य संपूर्णपणें निर्दोष आहे. परंतु त्यांच्या काव्यगुणांच्या तेजामुळें त्यांच्या दूरान्वय, यतिभंग अप्रयोजक समास इत्यादि किरकोळ दोषांकडे लक्षच जात नाहीं. दुर्दैवानें पंतकाव्यावर आजवर इतके आक्षेप घेतलेले आहेत कीं, ते इतर कोणत्याहि कवीवर घेतले गेले नाहींत. 'मोरोपंत हे कवीच नव्हते,' 'मोरोपंतांचें काव्य म्हणजे प्रेतावरील शृंगार होय' अशा प्रकारचे अरसिकत्व निदर्शक दुष्ट आक्षेप घेण्यासहि टीकाकारांनीं सोडलें नाहीं; परंतु असें असूनही कालाच्या ओघांत निर्दय टीकाकाराच्या माऱ्यांत पंतांचें काव्य आजवर टिकून राहिलें आहे हा पंतांच्या काव्याचा उज्ज्वल विजय नव्हे काय ?

## कविभूमिकेचा अभ्यास

कोणत्याहि काव्याचें वाचन करतांना कवीच्या मनोभूमिकेचा अभ्यास करणें अत्यंत आवश्यक आहे. कै. तात्यासाहेब केळकरांनीं म्हटल्याप्रमाणें 'काव्यसृष्टींत काव्यदृष्टीशिवाय प्रवेश करणें म्हणजे जेवायला जाऊन तोंड विसरण्यासारखें होय' सहृदयता हा गुण टीका करतांना किती महत्त्वाचा आहे हें मालाकार चिपळूणकरांनीं निबंधमालेंत सांगितलें आहे. ग्रंथकाराची भूमिका, त्याच्या भोंवतालचें वातावरण, त्याचें चरित्र इत्यादि बाबींचा संबंध त्याच्या वाङ्मयकृतीशीं अत्यंत निगडीत असतो; किंबहुना ग्रंथ आणि ग्रंथकार हीं एका दृष्टींनें अभिन्न असतात. या दृष्टीनें कोणत्याहि ग्रंथाचें वाचन एका विशिष्ट दृष्टिकोनांतून न होतां व्यापक दृष्टीनें झालें पाहिजे. ग्रंथनिर्माण करणारी ग्रंथकाराची प्रवृत्ति हीच महत्त्वाची होय व तिचाच सूक्ष्म अभ्यास करणें इष्ट आहे.

## उपसंहार

कोणत्याहि ग्रंथावर आक्षेप घेतांना त्याचें रसग्रहण करूनच आक्षेप घेणें रास्त होईल. यथार्थ रसग्रहण झाल्यानंतर आक्षेप घेण्यास जागाच राहत नाहीं, असा चांगल्या ग्रंथकारांच्या बाबतींत नेहमींच अनुभव येतो. पंतांच्या काव्याचा आस्वाद घेतांना त्यांच्या काव्यप्रवृत्तींचा अभ्यास केल्यास त्यांचें काव्य उच्च दर्जाचें वाटेल यांत तिळप्राय संदेह नाहीं. पांडित्य व कवित्व यांचा गोड संगम त्यांच्या काव्यांत दिसून येतो. पांडित्य हें काव्यास मारक नसून तारकच आहे हें त्यांच्या काव्यावरून स्पष्ट दिसतें.

याप्रमाणें निस्वार्थीपणानें हयातभर काव्यरचन[1] करून पंतांनीं एक थोर राष्ट्रकार्य केलें आहे. त्यांचें हें कार्य केवळ त्यांच्या भक्तांसच नव्हे तर प्रत्येक मराठी भाषिकास अभिमानास्पद असेंच आहे. या सर्व दृष्टीनें पाहतां त्यांचे चिरंजीव रामकृष्णपंडित यांनीं–

> **श्रीमन्मयूरकविची देते संतोष मानवां कविता।**
> **असता जरि भूमिवरी सुरगुरु तरि तोहि मान वाकविता॥**

असें त्यांच्या काव्याचें जें वर्णन केलें आहे तें अयथार्थ आहे असें कोण म्हणेल ?

—:०:-:०:—

# लेखक परिचय



**डॉ. हरि रामचंद्र दिवेकर :**

यांचा जन्म इ. स. १८८५ मध्यें झाला. त्यांचें सारें शिक्षण ग्वाल्हेरलाच झालें. अलाहाबाद विश्वविद्यालयाची बी. ए. ची परिक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर काशी येथील हिंदु कॉलेजातून ते एम्. ए. झाले. त्यानंतर अलाहाबाद येथील म्यूर सेंट्रल कॉलेजांत त्यांनीं प्राध्यापकाचें काम केलें. नंतर ते हिंगणें येथील महिला विद्यापीठांत आजन्म सेवक होऊन समाजकार्य करूं लागले. पुढील अभ्यासासाठीं त्यांनीं पॅरिसला प्रयाण करून तेथें डी. लिट्. ही पदवी घेतली. हिंदुस्थानांत परत आल्यानंतर त्यांनीं हिंगणें सोडून पुन्हाः ग्वाल्हेर येथें आपल्या सार्वजनिक कार्यास आरंभ केला. या काळांत ते ग्वाल्हेर येथील व्हिक्टोरिया कॉलेजांत मराठीचे प्राध्यापक होते. नंतर ते तेथील सरकारी शाळेचे हेडमास्तर झाले व पुढें आपल्या कर्तृत्वानें उज्जयिनी येथील माधव कॉलेजचे प्रिन्सिपॉल झाले. शालेय वातावरणांत व सामाजिक कार्यांत त्यांनीं अत्यंत लोकप्रियता मिळविली. त्यांनीं चांगदेव

तत्त्वसार आणि व्यंकटेश स्तोत्र या ग्रंथांचें संशोधन करून त्यांची संशोधित आवृत्ति प्रसिद्ध केली आहे. वैदिक वाङ्मयाचा त्यांनी विशेष अभ्यास केला असून उत्कृष्ट वक्ते, चतुरस्र लेखक व आस्थेवाईक समाजसेवक या दृष्टीनें त्यांची विशेष प्रसिद्धी आहे. हल्ली त्यांचें वास्तव्य ग्वाल्हेरास आहे.

### श्री. जनार्दन सखाराम करंदीकर :

यांचा जन्म इ. स. १८७५ मध्यें जमखंडी संस्थानांत झाला. इ. स. १८९७ सालीं फर्ग्युसन कॉलेज मधून बी. ए. झाल्यावर त्यांनीं मुधोळ येथील शाळेंत मुख्याध्यापकाचें काम केलें. त्यानंतर एल्. एल्. बी होऊन त्यांनी धारवाड येथें अध्यापकाचें काम केलें. इ. स. १९०७ मध्यें समर्थ विद्यालयांत शिक्षक व वसतिगृहाचे ते प्रमुख होते. या कालांत "समर्थ" साप्ताहिक व "ग्रंथमाला" मासिक यांचे ते सहसंपादक होते. कांहीं काल त्यानी पुण्याच्या चित्रमयजगतचेंहि संपादन केलें. इ. स. १९११ पासून त्यांनीं केसरींत लेखन सुरू केलें. सुप्रसिद्ध मुळशी सत्याग्रहांत त्यांनी भाग घेऊन सश्रम कारावास पत्करला. पुण्याच्या टिळक महाविद्यालयांत अर्थशास्त्र व इतिहास या विषयांचें त्यांनी अध्यापन केलें. १९२७ मध्यें वाई शिक्षण परिषदेचे व झाशी येथील बृहन्महाराष्ट्र परिषदेचे ते अध्यक्ष होते. इ. स. १९३१ त त्यांची केसरीचे संपादक म्हणून नेमणूक झाली.

इ. स. १९३२ मध्यें कायदेभंगाच्या चळवळीत त्यांनीं भाग घेतल्यामुळें ते दोन वर्षे तुरुंगांत होते. त्यांनीं श्री. हिंवरगांवकर ( नगर ) यांच्या सहकार्यानें कौटिलीय अर्थशास्त्राचें भाषांतर केलें आहे. त्यांचा दुसरा भाषांतरित ग्रंथ म्हणजे जगांतील क्रांतिकारक लढाया (डिसायसिव्ह बॅटल्स ऑफ दि वर्ल्ड ) हा होय. शिवाय त्यांचे स्वतंत्र ग्रंथ म्हणजे हिंदुत्ववाद, भारतीय युद्धाचा कालनिर्णय व भारतीय युद्धाचा तिथिनिर्णय अथवा गीता अर्थतिनिर्णय हे होत.

राजकारण, अर्थशास्त्र, रामदासी वाङ्मय, फलज्योतिष, गीतार्थचर्चा, इतिहास संशोधन, पंचाग संशोधन इ. विषयांवर त्यांनीं बरेंच स्फुटलेखन केलें असुन त्यांचे कांहीं निवडक लेख पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेले आहेत. " गीतातत्व मंजरी " हा त्यांचा ग्रंथ अलिकडेच प्रसिद्ध झाला आहे.

### श्री. कमलाबाई देशपांडे :

सुप्रसिद्ध सव्यसाची लेखक कै. न. चिं. केळकर यांच्या या कन्या होत यांचा जन्म १८९८ मध्यें झाला. १९१७ सालीं मॅट्रीक होऊन त्या १९२१ सालीं कर्वे युनिव्हर्सिटीच्या जी. ए. झाल्या. इ. स. १९२१–१९४१ पर्यंत त्या हिंगणे येथील अनाथ बालिकाश्रमाच्या आजन्म सेविका होत्या व पुढें सेवानिवृत्त झाल्या. इ. स. १९२२ ते १९२८ या कालांत सातारा येथील सुप्रसिद्ध कन्याशाळा स्थापन करून त्या तेथील सुपरिंटेन्डेन्ट झाल्या. पुढें १९२९ ते १९३१ या कालांत युरोपांत प्राग येथे उच्च शिक्षण घेऊन त्यांनीं पी. एच. डी. ही पदवी संपादन केली. परदेशांतून आल्यावर त्यांनीं इ. स. १९३१ ते १९४१ पर्यंतच्या काळांत एरंडवणे येथील श्री. ना. दा. ठाकरसी कॉलेजमध्यें प्रिन्सिपॉलचें काम केलें. त्यांनीं विविध प्रकारचें लेखन केलें आहे. त्यांचा "गीतद्विदल" हा पहिला काव्यसंग्रह १९२४ सालीं प्रसिद्ध झाला. पी. अेच्. डी. साठी लिहिलेला " The Child In Ancient India " हा निबंध त्यांनी इ. स. १९३६ सालीं प्रसिद्ध केला. १९४१ सालीं त्यांचें "चिमण्या" हें आश्रमांतील आठवणीविषयक पुस्तक प्रसिद्ध झालें. इ. स. १९४२ सालीं त्यांनीं 'स्मरण साखळी' हा आत्मचरित्रपर ग्रंथ लिहिला. १९४३ सालीं त्यांचें 'चिमण्या' व 'दुसरा निर्माल्य' हें पुस्तक प्रसिद्ध झालें. १९४८ सालीं त्यांनीं 'अपौरुषेय वाङ्मय' हा स्त्रीगीतविषयक ग्रंथ प्रसिद्ध केला. 'नव महाराष्ट्र' भा. २ मध्यें त्यांनीं " महाराष्ट्रांतील स्त्रीजीवन " हा–माहितीपूर्ण व सुंदर लेख प्रसिद्ध केला. शिवाय त्यांचे इतर प्रासंगिक लेखनही बरेंच आहे.

## प्रा. अ. का. प्रियोळकर :

महाराष्ट्रांतील सुशिक्षित व विद्वान लोक श्री. प्रियोळकर यांना एक चिकाटीचा संशोधक म्हणून ओळखतात. श्री. प्रियोळकर यांचें प्राथमिक शिक्षण गोमंतकांतील अस्नोडी या खेडेगांवी झालें. १९१८ सालीं मॅट्रिकच्या परीक्षेंत उतीर्ण झाल्यावर त्यांनीं कर्नाटक कॉलेजमध्यें प्रवेश केला व इंटरपर्यंतचें शिक्षण पूर्ण केलें. मराठी भाषेच्या सर्वांगीण अभ्यासाची सोय कर्नाटक कॉलेजांत होऊं न शकल्यामुळें त्यांनीं सांगलीस विलिंग्डन कॉलेजांत नांव दाखल करून ते पदवी परीक्षा पास झाले.

कॉलेजमध्यें असतांनाच त्यानीं लेखन कार्यास सुरवात केली. त्यांचें विद्वत्तापूर्ण व विवेचक लेख 'मनोरंजन' 'चित्रमयजगत्' व 'विविधज्ञान-विस्तार' आदि मासिकांत छापून येऊं लागले.

श्री. प्रियोळकर यांचा पहिलाच विद्वत्तापूर्ण व संशोधनात्मक ग्रंथ रघुनाथ पंडितकृत 'नलदमयंती स्वयंवराख्यान' हा होय. त्या ग्रंथास मुंबई विद्यापीठानें तर्खडकर पारितोषिक देऊन गौरविलें आहे. श्री. प्रियोळकर यांचा दुसरा ग्रंथ "दादोबा पांडुरंग–आत्मचरित्र व चरित्र" या ग्रंथासही मुंबई विद्यापीठानें "तर्खडकर पारितोषिक" बहाल केलें आहे. ह्या दोनही ग्रंथांची महाराष्ट्राच्या मार्मिक टीकाकारांनीं मुक्तकंठानें स्तुति केली आहे.

श्री. प्रियोळकर मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या वतीनें चालविलेल्या मराठी संशोधन केंद्राचे अधिकारी आहेत. नुकताच त्यांनीं संशोधन केलेला 'मुक्तेश्वर' हा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. मुंबई विश्वविद्यालयाच्या पी. एच. डी. च्या विद्यार्थ्यांचे ते मार्गदर्शक आहे.

१९५१ सालीं कारवार येथें भरलेल्या मराठी साहित्यसंमेलनाचे ते अध्यक्ष होते. मराठी भाषेचे जाज्वल्य अभिमानी, एक विद्वान संशोधक ह्या दुहेरी नात्यांनीं महाराष्ट्रांत श्री प्रियोळकर चांगले परिचित आहेत.

## आचार्य शंकर वामन ऊर्फ सोनोपंत दांडेकर :

प्रसन्न मुद्रा, मधुर भाषण आणि गोड स्वभाव यांमुळें सोनोपंत दांडेकर हे कोणाचेंहि मन आपल्याकडे तात्काळ वेधून घेतात.

ठाणें जिल्ह्यांतील पालघर शहराला दांडेकरांच्या घराण्यामुळें प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. सोनोपंतांचें शालेय शिक्षण पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयांत झालें. पुढें एम्. ए.ची परीक्षा उत्तीर्ण होतांच शिक्षण-प्रसारक-मंडळीच्या सेवेंत तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून त्या वेळेच्या न्यू पूना कॉलेजांत ते दाखल झाले. तेव्हांपासून सेवा निवृत्त होईपर्यंत त्यांनी आपलें आयुष्य विद्यादानाला वाहून विद्वान् आणि छात्रप्रिय प्राध्यापक म्हणून स्पृहणीय लौकिक संपादन केला. मुंबईच्या रुईया कॉलेजचे आणि पुण्याच्या सर परशुरामभाऊ कॉलेजचे प्राचार्य म्हणून त्यांची कामगिरी शिक्षण-संस्थेला अत्यंत उपकार टरली. पुणें विद्यापीठाशींहि त्यांचा अधिकार परत्वें निकटचा संबंध आला.

सोनोपंत हे वारकरी सांप्रदायांतील आहेत. भजन पुराण प्रवचन आणि व्याख्यान या वक्तृत्वाच्या आणि विद्वत्तेच्या क्षेत्रांत त्यांचें विशाल व्यक्तिमत्व ठसठसीतपणें प्रकट होतें. ते वारकरी सांप्रदायांतील असूनहि अंधश्रद्ध नाहींत. पाश्चिमात्य आणि भारतीय तत्त्वज्ञानाच्या सूक्ष्म अध्ययनामुळें त्यांच्या विद्वत्तेला सव्यसाचित्व प्राप्त झालें आहे. 'ज्ञानेश्वर चरित्र', 'ईश्वरवाद', 'वारकरी पंथाचा इतिहास', 'अधात्मविद्येची मूलतत्त्वें' हे त्यांचे ग्रंथ त्यांच्या चिकित्सक विद्वत्तेची उत्तम साक्ष देतात. 'प्रसाद' मासिकाच्या संपादक मंडळांतील एक संपादक म्हणून त्यांच कार्य त्या मासिकाचा लौकिक वाढविण्यास कारणीभूत झालें असल्यास नवल नाहीं. सारांश आपल्या व्यासंगानें विद्वत्तेनें आणि व्यक्तिमत्त्वानें सोनोपंत दांडेकर हे विद्वानांच्या आदरास पात्र झाले आहेत.

## प्रा. गंगाधर बाळकृष्ण सरदार :

जन्म २ आक्टोबर १९०८. बालपण व प्राथमिक मराठी शिक्षण जव्हार संस्थान (विलीन), दुय्यम शिक्षण–छबिलदास हायस्कूल दादर, कॉलेज शिक्षण–सर परशुराम भाऊ कॉलेज, पुणें. १९३० मध्यें सत्याग्रह चळवळींत भाग. १९३४ सालीं ते एम्. ए. झाले. १९४१ पासून श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी कॉलेज फॉर वुइमेनमध्यें मराठीचे प्राध्यापक.

गेलीं ४–५ वर्षें प्रा. सरदार हे सामाजिक व सांस्कृतिक क्षेत्रांतील एक विचारवंत म्हणून महाराष्ट्रास परिचित आहेत. त्यांचे "मराठी गद्याची पूर्वपीठिका" (१९३७), "महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी" (१९४१) व "संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति" (१९५०), हे तीन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. शिवाय कांहीं नियतकालिकांमधून त्यांचे लेख प्रकाशित झाले आहेत. त्यांचा पिंड वस्तुतः लेखकापेक्षां वक्त्याचा आणि तत्त्वचिंतकाचा आहे. बालपणापासून रामतीर्थ–विवेकानंदांच्या वाचनानें त्यांची वृत्ती पूर्ण तया आध्यात्मिक बनली होती. पुढें गांधीवादाच्या संस्कारामुळें तिला अधिक दृढता आली. बी. ए. होण्याच्या आधीं १९३० मध्यें त्यानीं सत्याग्रहांत भाग घेतला. नंतर एम्. ए. पर्यंत शिक्षण पूर्ण केलें. "३४ ते ४१" पर्यंतचा काल सरदारांना विनाव्यवसायाचा काढावा लागला. घरची सुस्थिति असली तरी वैयक्तिक आकांक्षांच्या कुचंबणेमुळें या कालांत अध्यात्मिक वृत्तीचा अपुरेपणा त्यांना उमगला. १९४३ मध्यें त्यांनीं मार्क्सवादाच्या अभ्यासास सुरवात केली. वैचारिक स्थिरता येईपर्यंत (१९४८) त्यांच्या विचारांत आणि आचारांत अंतर्बाह्य फरक पडत गेला. जसजसें दृष्टीसमोरचें क्षेत्र वाढलें तसतसें विचारांना वजन आलें. त्यांचे ग्रंथ उत्तरोत्तर आकारानें लहान पण विचारदृष्ट्या भरीव होत गेले आहेत. प्रा. सरदारांना तत्त्वज्ञान, इतिहास आणि संत वाङ्मयांची विशेष गोडी आहे. ज्ञानेश्वरीवर त्यांचा अधिकार असून तुकाराम हा त्यांचा आवडता संतकवि आहे. राजकीय दृष्ट्या भूमिका पक्षातीत असून त्यांचें कार्यक्षेत्र विचारापुरतेंच मर्यादित

असलें तरी मार्क्सवादावरील श्रद्धेमुळें राजकारणांतील डाव्या प्रवृत्तीकडे त्यांचा कल आहे.

## डॉ. महेश्वर अनंत करंदीकर :

श्री. करंदीकर हे एम. ए. पीएच. डी. असून त्यांनी चिपळूणकर पारितोषिक व वा. ह. वाडेगांवकर (नागपूर)हीं विद्यालयांत उच्च बक्षिसें मिळविलीं आहेत. सध्यां ते एलफिन्स्टन कॉलेज (मुंबई) येथें मराठीचे प्राध्यापक आहेत. " मराठी शब्द मीमांसा " हा त्यांचा पी एच. डी. साठीं लिहिलेला प्रबंध होय. त्याशिवाय त्यांनीं अनेक नियतकालिकांत टीकात्मक व विविध प्रकारचें स्फुट लेखन केलें आहे. ऋग्वेद, ज्ञानेश्वरी, व भागवत यांचा त्यांनी विशेष अभ्यास केला आहे.

मुंबई विद्यापीठ प्राध्यापक मंडळाचे ते संयुक्त चिटणीस असून ते मुंबई विद्यापीठाचें कांहीं काल फेलो होते. आग्रा, अजमीर, व मुंबई या विद्यापीठांत त्यांनी मराठी अभ्यासक्रम मंडळाचे सभासद या नात्यानें यशस्वी काम केलें आहे. इतर विद्यापीठाचे संस्कृत व मराठीचे परीक्षक म्हणूनहि त्यांनी काम केलें आहे.

## श्री. रघुनाथ विनायक हेरवाडकर :

यांचा जन्म इ. स. १९१५ मध्यें झाला. इ. स. १९३६ सालीं आग्रा विश्वविद्यालयाची बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजांतून इ. स. १९३८ सालीं एम्. ए. ची परीक्षा ते दुसऱ्या वर्गांत उत्तीर्ण झाले. नंतर येथील श्रीमती ताराबाई टीचर्स ट्रेनिंग कॉलेजांतून इ. स. १९३९ सालीं बी. टी. झाले. पुढे पुणें येथील प्रख्यात न्यू इंग्लिश स्कूल मध्यें अध्यापनाचें काम केल्यानंतर इ. स. १९४१ सालीं

ग्वाल्हेर संस्थानांतील शिक्षण खात्यांत इ. स. १९४४ पर्यंत सरकारी नोकरींत होते. त्या कालांत त्यांनीं तेथील सरकारी हायस्कुलांत व नंतर व्हिक्टोरिया कॉलेजांत मराठीच्या प्राध्यापकाचें काम केलें. इ. स. १९४२ सालीं ते पुण्याच्या महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या साहित्य-विशारद परिक्षेंत दुसऱ्या श्रेणींत यशस्वी झाले. विद्यार्थीदशेपासूनच त्यांनीं स्वतंत्र लेखनास सुरुवात केली. आतापर्यंत त्यांनी प्रमुख मराठी नियतकालिकांत बरेंच स्फुटलेखन केलें आहे. साहित्य व शिक्षणशास्त्र यांची त्यांना विशेष आवड आहे. साहित्यांत "सौंदर्यशास्त्र, टीकाशास्त्र" हे त्यांचे आवडीचे विषय आहेत. ग्वाल्हेर येथें मराठी रंगभूमीच्या शतसांवत्सरिक उत्सवांत प्रसिद्ध झालेल्या "नाटयचर्चा" या ग्रंथाचे ते एक संपादक होते. मुंबई नभोवाणीवर त्यांचीं वाङ्मयविषयक भाषणें नेहमीं होत असतात. हल्लीं ते मुंबई येथील बालमोहन विद्यामंदिर, या संस्थेंत अध्यापकाचें काम करीत असून मराठी विषय घेऊन पी. एच्. डी. चाहि अभ्यास करीत आहेत.

———